# प्रतिज्ञा

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )




लेखक

ना. सी. फडके





प्रथमावृत्ति

मार्च १९४२





रामकृष्ण बुक डेपो,

प्रकाशक :

शंकर बापू रानडे,
रामकृष्ण बुक डेपो,
गिरगांव, मुंबई ४.



२ ही कादंबरी ता. १७ ऑक्टोबर १९४१ ते १ मार्च १९४२ पर्यंत लिहिली गेली, व "झंकार"मध्यें प्रसिद्ध झाली.

किंमत रु. ३

मुद्रक :

श्री. र. राजगुरु,
राजगुरु प्रेस,
कॉमनवेल्थ कॉलनी,
४०५ नारायण, पुणें २.

# १

१९३७ सालीं पावसाळ्यानं मोठा लहरीपणा केला. सुरुवातीला मृगनक्षत्राचा पाऊस सतत पांचसहा दिवस असा झाला, कीं 'बाबा आतां उघडीप देतोस कीं नाहीं ?' अशी प्रार्थना लोक करूं लागले. मग त्यानं जी दडी मारली ती जवळ जवळ दीड दोन महिने ! पिकं बुडणार म्हणून लोक चिंतातुर झाले, महाराष्ट्राच्या बहुतेक जिल्ह्यांत दुष्काळाची चाहूल ऐकूं येऊं लागली. पण मग वरुणराजाची स्वारी जी परत आली ती बरसातीचं वैभव चौफेर उधळीतच ! पूर्वा नक्षत्र मुसळधारेनं पडलं, आणि उत्तराच्या सरींनीं बहार करून टाकली. कांहीं ठिकाणचीं भाताचीं शेतं गेलीं परंतु बाकीचीं सारीं पिकं भरघोस आलीं, शेतकरी लोक सोळा आण्याच्या गोष्टी करूं लागले, अन् नवरात्र आलं तें हर्षानं व उत्साहानं फुललेलं ! दसऱ्याचा सण जिकडे तिकडे आनंदांत साजरा होत होता.

बेळगांव-खानापूर रस्त्यावरचं चांदणी गांव जात्याच सुपीक अन् समृद्ध होतं. पाऊसपाणी बेताचं झालं तरी त्या गांवच्या पंचक्रोशींतली बागाइती व शेती बहुधा सुस्थितींत असे. बेळगांव-खानापूर सर्व्हिसची मोटार त्या टापूंतून जाऊं लागली कीं, उतारूंच्या दृष्टीला आजूबाजूंस जिकडे तिकडे गडद हिरवा-गार रंग पसरलेला दिसे, आणि शेतांच्या व पानमळयांच्या दाटीं-तून उठणाऱ्या वाऱ्याची सळसळ किंवा रस्त्यापासून कमीअधिक अंतरावर चाललेल्या मोटांच्या चाकांचा कुइकुइ असा आवाज त्यांच्या कानीं पडत असे.

१९३७ सालच्या भरपूर वृष्टीमुळें तर चांदणीच्या आसमंतांतले पानमळे अन् शेतं समृद्धीनं डोलूं लागलीं होतीं. अशीं पिकं दहा वर्षांत घेतलीं नाहींत असं लोक बोलत होते. शेतांत अन् मळयांत राबायला लोकांना विलक्षण उत्साह चढला होता. सणासुदीच्या वेळचे षोक करतांनाही त्यांना सुगीच्या दिवसांतलं स्फुरण चढलं होतं. चांदणी गांवापासून तीन मैलांवर असलेल्या टेकडीवरच्या देवीची जत्रा नऊ दिवस अन् नऊ रात्रीं पूर्वीं कधीं नव्हे अशी गाजली होती. आणि चांदणी गांवचे सिनाप्पा इनामदार यांच्या वाड्या-पासून दरवर्षीं दसऱ्याच्या दिवशीं निघणारी शिलंगणाची मिरवणूक यंदा भलत्या थाटानं काढण्याचा बेत गांवकऱ्यांनीं केला होता.

चार वाजल्यापासून गांवांतलीं पांचपंचवीस पोरं सिनाप्पांच्या वाड्याच्या पुढच्या अंगणांत जमलीं होतीं. कमरेला जाडींभरडीं लांडीं कोरीं धोतरं, अंगांत मांजरपाटाच्या कोऱ्या पैरणी, डोक्याला ठेवणींतले जुनेपाने मंदील, क्वचित् हातात चांदीचं कडं, अशा वेषांत जमा झालेल्या त्या पोरांचा किलकिलाट ऐकून वर दिवाण-खान्यालगतच्या खोलींत वामकुक्षी करणाऱ्या सिनाप्पांची झोपमोड

झाली होती. खिडकींतून वाकून पाण्याची चूळ भरून टाकल्यावर त्यांनीं आपल्या घोगऱ्या आवाजांत ओरडून त्यांना दटावलं होतं, " काय रे ए बेट्यांनो, एव्हांपासून काय रे आहे इथं ? जेवणं तरी झालीं का रे तुमचीं ? जा जा, घरीं जा ! अजून दोन तास अवकाश आहे !"

मनांतल्या मनांत मात्र ते ओळखून होते, कीं तीं पोरं कांहीं तेथून जाणार नाहींत.

दोन अडीच घटकांनंतर तर वाड्यासमोर दीडदोनशें माणूस जमा झालं. इनामदारांचा भाऊ कारकून व गांवचे पाटील-कुळकर्णी लोकांना शिस्तींत उभे करूं लागले. कुणाच्या हातांत भरघोस कणसांचीं ताटं, कुणाच्या हातांत भाले, चार पांचजणांच्या हातांत जुन्या तरवारी अशा त्या माणसांच्या रांगा त्यांनीं तयार केल्या. इनामदारांचा लाल घोडा अंगावरचा साज व गळ्यांतल्या झेंडूच्या गेंदबाज माळा मिरवीत उभा राहिला. गांवांतल्या लेजीम खेळणाऱ्या पठ्ठयांनीं रंगण तयार केलं. आणि मिरवणुकीच्या आघाडीवर ताशेवाले, वाजंत्री, शिंगवाले खडे झाले. मिरवणूक हालायला उशीर होऊं लागला तेव्हां मंडळींना स्वस्थ बसवेना. ताशेवाल्यानं ताशावर छडी धरली, सनईचे उंच स्वर हवेंत उठले, अन् शिंगवाल्यानं अस्मानांत नेम धरून "तु...तु...तु..." अशी रणगर्जना ठोकली. तिचा अखेरचा नाद विरतो न विरतो तोंच लेजीमवाल्यांच्या कोंडाळ्यांत मध्यभागीं असलेल्या धिप्पाड ढोलवाल्यानं ढोलावर थाप दिली, व तो इशारा मिळतांच कपाळीं गुलाल लावलेले भोंवतालचे पठ्ठे फेर धरून नाचूं लागले, व त्यांच्या हातांतल्या लेजिमांचा " खळ्ळ्! खळ्ळ्!" असा लयबद्ध रुण-झुणाट सुरू झाला !

भाऊ कारकून धावत वाड्यांतल्या वरच्या दिवाणखान्याकडे गेला व मालकांना म्हणाला,

" आमची तयारी आहे. लोक आपल्यासाठीं थांबले आहेत."

पोटरीवर तंग बसवलेल्या पांढऱ्या सफेत परीटघडी सुरवारीची सुरकुती साफ करीत सिनाप्पा म्हणाले,

" माझ्याकडून खोटी नाहीं. पण उषाक्का अन् श्यामाताई आल्या पाहिजेत. त्या दोघी आज कितीक वर्षांनीं दसऱ्याला हजर आहेत."

भाऊ म्हणाला, " पण त्या आतां शिकल्या सवरल्या, बी. ए. सुद्धां झाल्या. आमच्या या खेडवळ शिलंगणांत यायची त्यांना लाज वाटेल, नाहीं का ? "

" चुकतोस तूं." सिनाप्पा म्हणाले, " अरे, त्या बी. ए. झाल्या तरी इथेंच लहानाच्या मोठ्या झाल्या ना ! आपल्या जन्म-गांवचे उत्सव त्यांना प्रिय कसे नसतील ? त्या खात्रीनं येतील. दोघींनींही काल कबूल केलं आहे. श्यामा तर गेल्या आठ दिवस या शिलंगणाच्याच गोष्टी माझ्याजवळ बोलत होती. मोठी हुषार अन् उत्साही पोर आहे. पुरेपूर बापाच्या वळणावर गेली आहे..."

भाऊ म्हणाला, " होय ! आम्हांला कसं कळणार ! आम्हीं आनंदरावांना कधीं पाहिलंच नाहीं..."

यावर सिनाप्पा कांहीं तरी बोलणार होते. बहुधा सतरा वर्षांपूर्वी दसऱ्याच्याच दिवशीं त्यांचा समवयस्क प्रिय मित्र आनंदराव एका-एकीं नाहींसा कसा झाला, तीच हकीगत सांगायचा त्यांचा हेतु असावा. कारण त्यांची मुद्रा एकदम गंभीर झालेली दिसली. परंतु तितक्यांत जिन्यांत पावलांचे आवाज झाले, व कुणी तरी ओरडून विचारलं,

" काका, उशीर झाला म्हणून रागवलां नाहीं ना ? "

" रागावलों नाहीं, पण किती ग उशीर ! "

असं सिनाप्पा म्हणतात तोंच जिना चढून वर आलेल्या त्या दोघी बहिणी दाराच्या चौकटींत येऊन क्षणभर थबकल्या.

त्या दोघींपैकीं श्यामा थोरली असावीसं पाहणाराला वाटे, पण ती धाकटी होती. ती वर्णानं सांवळी, मोठ्या हाडापेराची, सडक पण भरदार बांध्याची, व निर्भय तेजस्वी मुद्रेची होती. तिच्या नजरेंत भावनोत्कटता अगदीं कांठोकांठ भरल्यासारखी दिसे, व ओठ सदा हास्यासाठीं उत्सुक असल्यासारखी तिच्या जिव्हणीची ठेवण वाटे. ती फिकट निळ्या रंगाचं जरीच्या किनारीचं पातळ विकच्छ पद्धतीनं नेसली होती, व आपल्या काळयाभोर लांब सडक केसांची वेणी तिनं पाठीवर मोकळी सोडली होती.

उषा वयानं मोठी पण दिसण्यांत लहान होती. तिचा वर्ण गोरा अन् बांधा कृश होता. एखाद्या सुंदर बाहुलीसारखीच ती चटकन् पाहिल्याबरोबर वाटण्यासारखी होती, पण तिच्या डोळ्यांकडे पाहिल्यावर मात्र तो भास दूर होई. कारण त्यांत विचारांचा खोलपणा व कांहीसं गांभीर्य भरलेलं दिसे. ती गडद चॉकोलेट रंगाचं जरीच्या काठ्या असलेलं पातळ नेसली होती, व तिनं आपल्या केसांचा साधा अंबाडा घातला होता.

सिनाप्पांनीं दोघींकडे पाहिलं, पण तेवढ्या क्षणार्धांत त्यांची नजर श्यामावर स्थिरावली. दोन चार मिनिटांपूर्वींच त्यांनीं भाऊ कारकुनाजवळ जे उद्‌गार काढले ते त्यांच्या मनांत अजून घोळत होते; व आज सतरा वर्षं परागंदा झालेल्या आपल्या मित्राच्या त्या तरुण कन्येकडे पाहतां पाहतां, त्याची तीव्र आठवण झाल्या-मुळें कांहींशा खेदानं पण तिचं सौंदर्य व तेज समोर दिसत असल्या-

मुळें अभिमानानं, ते पुन्हा मनाशीं म्हणाले 'मोठी हुषार अन् उत्साही पोर आहे. पुरेपुर बापाच्या वळणावर गेली आहे...'

सिनाप्पांच्या मनांतल्या या विचारांची श्यामाला काय कल्पना असणार? ती आपलं जिन्यांतलंच बोलणं पुढें चालूं करून म्हणाली,

"पांच वाजले तेव्हांच मीं आक्काला म्हटलं कीं, चल बाई, आटपलं पाहिजे. तुमचा दुसरा निरोप आला तेव्हां आम्ही निघा-लोंच होतों."

हें बोलतां बोलतां ती आपल्या बहिणीच्या हातांत हात घालून सिनाप्पांच्याजवळ आली. तोंपर्यंत कोचावरून उठून लगतच्या आरशासमोर उभे राहिलेले सिनाप्पा आपल्या डोक्याचा साफा उजव्या डाव्या हातांनीं व्यवस्थित करीत आरशांतल्या तिच्या प्रतिबिंबाकडे पाहत म्हणाले,

"जाऊं दे ग, उगीच कशाला सांगतेस? तुम्हां शिकलेल्या मुलींचे इंग्रजी फॅशनचे नट्टेपट्टे आटपायचे म्हणजे इतका उशीर व्हायचाच."

"बघा बाई! आमच्या पोषाखांत कुठली इंग्रजी फॅशन दिसते हो तुम्हांला काका?" असं डोळे थोडेसे वटारून आरशांतल्या काकांकडे पाहत म्हणून श्यामा थोडीशी वळली, व उजव्या बाजूला भाऊ कारकून उभा होता त्याला तिनं विचारलं, "काय हो भाऊ, तुम्ही सांगा मडमेसारख्या का आम्ही दोघी नटलों आहोंत?"

त्या प्रश्नाचं गमतीदार उत्तर देण्याइतका चतुरपणा भाऊच्या ठिकाणीं होता कीं नाहीं कोण जाणे! त्याच्या वाक्चातुर्याच्या कसोटीची वेळच आली नाहीं. कारण तितक्यांत खालीं शिंग-वाल्यानं पुन्हा एकदां गगनभेदी सुरांची ललकारी दिली, व ती

सुरू होतांच भाऊ सर्वांनाच उद्देशून म्हणाला, “आतां खालीं गेलंच पाहिजे.”

सर्वजण जिन्याकडे वळले तेव्हां तेवढ्यांतही उषाची व श्यामाची चेष्टा करण्याची सिनाप्पांना लहर आली व भाऊला विचारल्यासारखं करून ते म्हणाले,

“अरे, या दोघींचीं घोडीं तयार आहेत ना?”

तें ऐकतांच श्यामानं चपापून विचारलं,

“म्हणजे काका, आम्ही घोड्यावर बसून मिरवणुकींत यायचं कीं काय?”

चेहरा निर्विकार ठेवून सिनाप्पा म्हणाले, “अर्थात्! तुम्हांला आठवण नसेल, पण आक्का पांच सहा वर्षांची आणि तूं तीन चार वर्षांची होतीस तेव्हां तुमच्या वडिलांनीं तुम्हां दोघींसाठीं दोन छोट्या करड्या तट्टांची जोडी ठेवली होती, आणि एकदां तुम्ही तांबड्या मखमलीचे विजार-कोट अन् जरीच्या टोप्या घालून तट्टांवर बसून शिलंगणाला आला होतांत. आज किती वर्षांनीं तुम्ही आपल्या गांवच्या दसऱ्याच्या छोट्या स्वारींत येणार, तेव्हां पूर्वीच्याच त्या थाटानं नको न्यायला तुम्हांला?”

आतांपर्यंत गप्प राहिलेली उषा आपल्या बहिणीला म्हणाली,

“काकांची एकेक हौस मुलखावेगळी! आतां घोड्यावर का ग बसायचं आपण?”

परंतु हें सारं बोलणं ऐकतांना भाऊ कारकून आपलं हसूं दाबीत आहे हें श्यामानं पाहिलं होतं, व ही सारी काकांची मस्करी चालली आहे हें तिनं ओळखलं होतं. म्हणून ती डोळे मिचकावून आपल्या बहिणीला म्हणाली,

“अग बसूं घोड्यावर, त्याचं काय मोठंसं? घोडा म्हणजे कांहीं

वाघ सिंह तर नाहीं. शिवाय काकांनीं आपल्यासाठीं घोडे आणले असतील ते चांगले गरीबच पाहून आणले असतील! त्याचा काय नेम, ती करड्या तट्टांची जुनी जोडीच त्यांनीं शोधून आणली असेल. होय काका ?"

आपली मस्करी अशा प्रकारें गळ्यांत आलेली पाहून सिनाप्पा मनापासून हसले. श्यामाकडे नजर करून ते हसत म्हणाले,

"अशी वस्ताद आहेस!"

आणि मग क्षणभरानं त्यांना काय वाटलं कोणास ठाऊक, ओटीच्या पायऱ्या उतरतां उतरतां त्यांनीं म्हटलं,

"करड्या तट्टांची ती जोडी पुढें सर्कसवाल्या देवलांनीं विकत घेतली, श्यामा..."

त्यांचं मन पुन्हा सतरा वर्षांपूर्वींच्या काळाकडे वळलं होतं. तिच्याकडे पाहून ते बोलूं लागले,

"तुमच्या बापाला घोड्यांची फार परीक्षा होती, आणि दक्षिणी संस्थानांच्या या सबंध टापूंत घोड्यावर बसण्यांत त्याच्यासारखा बाका माणूस नव्हता...तो आणि मी बेळगांवला शाळेंत शिकत असतांना तो एकदां घरांतून पळून गेला तो छत्र्यांच्या सर्कस-बरोबर फिरत असलेला म्हैसूरला सापडला! माहीत आहे तुला ?"

श्यामानं फक्त मान हलविली, व नजरेनं आश्चर्य व्यक्त केलं. ती सुमारें चार वर्षांची असतांना तिचे वडील कुठल्या तरी राजकीय खटल्याचं संकट टाळण्यासाठीं एकाएकीं नाहींसे झाले होते, व त्यापूर्वींचं त्यांचं चरित्र मोठ्या चित्रविचित्र घटनांनीं भरलेलं होतं येवढी सामान्य कल्पना तिला होती. परंतु त्यांच्या पूर्वचरित्राचा तपशील तिला फारच थोडा कळलेला होता. तिचे वडील आनंद-

राव आज सतरा वर्षें हिंदुस्थान सोडून परदेशांत कुठं तरी हिंडत होते, ही तिच्या घरच्या जीवनावर कृष्णछाया टाकणारीच एक गोष्ट होती. तिची वहिनी—आईला त्या दोघी वहिनी म्हणत असत— त्या गोष्टीबद्दल व एकंदरींत आनंदरावांबद्दल अबोलाच धरून असे. मुंबईस डॉक्टरीचा धंदा करणारे तिचे सख्खे चुलते किंवा लहानपणापासूनच ज्यांना त्या दोघी काका म्हणत असत ते हे. सिनाप्पा कधींमधीं तिच्या वडिलांच्या कांहीं आठवणी सांगत, त्या ऐकून साधारण समज अंगीं आल्यापासून श्यामाला इतकंच मनाशीं वाटूं लागलं होतं कीं, आपला बाप म्हणजे एक तेजस्वी व कर्तृत्व-वान् पुरुष म्हटला पाहिजे व आपण आपल्या आयुष्यांत पुढें जें कांहीं करूं तें अशा तेजस्वी पित्याच्या कन्येला साजेसं असलं पाहिजे- पांच सहा वर्षांपूर्वी शाळेंत असतांना एका राजकीय पुढाऱ्याच्या अटकेचा निषेध करण्यासाठीं शाळेंतल्या मुलींचा संप घडवून आण ण्यांत तिनं पुढाकार घेतला तेव्हांपासून ही कल्पना तिच्या मनांत विशेष स्पष्टपणानं उद्भवली होती; आणि नंतर तिच्या वडिलांसंबंधीं जी जी गोष्ट तिच्या कानीं क्वचित् प्रसंगीं पडली होती तिच्या योगानं तिची ती भावना बळावतच गेली होती.

आत्तां ओसरीच्या पायऱ्या उतरतां उतरतां सिनूकाकांनीं तिच्या वडिलांची जी आठवण तिला सांगितली तिचाहि परिणाम असाच झाला. विखुरलेले सुटे सुटे तुकडे एकत्र करून सबंध चित्र बनवण्याची खटपट करणाऱ्या माणसाप्रमाणें श्यामाची आपल्या वडिलांच्या बाबतींत स्थिति होती. कुणाच्या तोंडून सहजगत्या आठवणीचा एखादा उद्गार निघाला, कीं एक नवा तुकडा हातीं आल्यासारखं तिला वाटे, व ती आठवण अगदीं हळुवार भावनेनं ती आपल्या हृदयांत जपून ठेवी.

आपल्या बहिणीच्या हातांत हात घालून वाड्यापुढचं अंगण ओलांडून मिरवणुकीच्या मागच्या बाजूस ती जाऊन उभी राहिली तेव्हां कल्पनेनं तयार केलेलं घोड्यावर ऐटदार मांड ठोकून बसलेल्या आपल्या बापाचं चित्रच तिच्या डोळ्यांपुढें तरंगत होतं...

परंतु तितक्यांत मिरवणुकीच्या आघाडीला ठोदिशीं बंदुकीचा बार निघाला, आणि त्याबरोबर आपल्या विचारांच्या तंद्रींतून ती जागी झाली.

तिनं पाहिलं तों मिरवणूक चालूं लागली होती आणि पुढेंमागें धावणाऱ्या बहिरू पाटलाला सिनूकाका ओरडून सांगत होते, 'अरे, रामाच्या देवळाला उजवी घालून जायचं बरं का.' तिनं मान किंचित् खालीं करून आपल्या बहिणीकडे पाहत हास्य केलं, व तिचा हात अधिकच प्रेमभरानं दाबून ती सावकाश पावलं टाकूं लागली.

  

शिलंगणाची स्वारी संपून परत येईपर्यंत रात्रीचे जवळ जवळ नऊ वाजले.

वाड्याच्या दाराशीं आल्यावर सिनूकाका म्हणाले, "ए पोरींनो, तुम्हीं इतक्यांत घरीं जायचं नाहीं बरं का. वर चला. दूध देणार आहे मी तुम्हांला. तें घ्या, जरा गप्पा मारा अन् मग—"

परंतु उषाचं डोकं फार दुखूं लागलं होतं व ती आणखी थांबायला बिलकुल तयार नव्हती. म्हणून सिनूकाकांनीं तोड

काढली कीं, तिनं भाऊबरोबर घरीं जावं आणि श्यामाताई जरा मागनं येते आहे असं वहिनींना सांगावं. त्या दोघी दुसऱ्या दिवशीं मुंबईस आपल्या डॉक्टरकाकांकडे जावयास निघणार होत्या ना ! मग त्या चांदणीला पुन्हा परत केव्हां येतील त्याचा कुठं नेम होता ! श्यामाबरोबर घटकाभर गप्पा मारायची त्यांना लहर आली होती आणि ते तिला सोडायला तयार नव्हते. ते श्यामाकडे वळून म्हणाले,

" का तुझंहि डोकं दुखायला लागलंय् ग ! "

श्यामानं हसत मान हलविली. सिनूकाकाहि हसले.

उषाक्काला नीट घरापर्यंत पोंचविण्याबद्दल भाऊला पुनः पुन्हा बजावून ते श्यामाला घेऊन वाड्याच्या चौकांत शिरले. अर्धवट स्वतःशीं ते उद्‌गारले, " उषाक्काची तब्येत मोठी नाजुक नाहीं ग ! ती आपल्या आईच्या वळणावर गेली आहे. देखणी, नाजुक अन् एखाद्या भावलीसारखी लहानशी ! मघांशी तिला एकदां पाठमोरी पाह्यली, आणि तुझ्या आईला मीं प्रथम पाहिलं तो दिवस मला एकदम आठवला."

श्यामा कांहीं बोलली नाहीं. ती मुकाट्यानं त्यांच्या मागोमाग जिन्याच्या पायऱ्या चढत होती.

दिवाणखान्यांत गेल्यावर मालकांच्या अंगावरचे कपडे उतरण्यासाठीं गडी पुढें आला तेव्हां ते म्हणाले,

" थांब, थांब जरा. श्यामाताईकडून सोनं घेऊन तिला आशीर्वाद द्यायचा आहे मला. उषाक्का तशीच गेली ! मला सुचलं कसं नाहीं कोण जाणे. बरं आतां तिच्यावाटचं सोनं तूंच दे म्हणजे झालं."

" हो, रगड सोनं आणलंय् मीं लुटून, हें पाहा कीं " असं

म्हणून हसत हसत श्यामानं आपल्या हातांतली आपट्याची भली मोठी फांदी उंच करून दाखवली.

तिनं त्या फांदीची पांच सहा पानं खुडून घेऊन फांदी कोचावर टाकली आणि सिनूकाकांपुढें ओंजळ करून ती म्हणाली, "हें उषाक्काचं सोनं."

मग कोचावरची फांदी पुन्हा हातीं घेत ती म्हणाली,

"आतां माझं सोनं देऊं ना तुम्हांला?"

ती ओंजळ करून पुढें उभी राहिली तेव्हां सिनूकाका म्हणाले,

"हें ग काय? सोनं म्हणून आपट्याचीं पानंच का देणार तूं मला?"

"मग खरं सोनं हवं तुम्हांला? मला कांहीं आक्कासारखी मास्तरणीची नोकरी नाहीं काका. बी. ए. झाल्यापासून आज पांच महिने मी वहिनीजवळ इथें खेडेगांवांत चैनींत राहिलें आहे, तुम्हांला माहीतच आहे कीं."

सिनूकाका मान हलवीत म्हणाले, "तुला नोकरी नसली म्हणून काय झालं? तुझ्या गोष्टी प्रसिद्ध होतात त्या? त्यांचे नाहीं का पैसे मिळत?"

मान वेळावून मोठ्यांदा हसत श्यामा म्हणाली, "गोष्टींचे पैसे? झालं! अहो काका, बहुतेक गोष्टी फुकटांत द्याव्या लागतात. अन् एखादीचे मिळाले तरी किती मिळतात? फार तर पांच रुपये. पण काका पुढच्या वर्षीच्या दसऱ्याला मात्र माझ्या मिळकतीची सोन्याची पुतळी करून देईन हं तुम्हांला. कारण तंवर माझी एक कादंबरी प्रसिद्ध होईल."

"असं?"

"हो."

"मग यंदा चालेल तर आम्हांला हें सोनं," असं म्हणून सिनूकाकांनीं हात पुढें केले व त्यांच्या हातीं सोनं ठेवून श्यामा जेव्हां नमस्कारासाठीं वाकूं लागली तेव्हां त्यांनीं विचारलं,

"ताई, तुला काय आशीर्वाद देऊं? सगळ्यांत कसली अधिक इच्छा आहे तुला? तूं विद्या तर मिळवली आहेस, तेव्हां त्या आशीर्वादांत अर्थ नाहीं. सुंदर पति मिळावा असा—"

"शीः! कांहीं तरीच काय काका?" असं म्हणून श्यामानं लाडिकपणानं हात उगारला; परंतु असा अभिनय करण्यांत आपल्या हातून थोडा अतिक्रम झाला हें लक्षांत येतांच तिनं हात चटकन् खालीं केला व वरमलेल्या मुद्रेनं खालीं जमिनीकडे पाहत ती म्हणाली,

"ही काय हो थट्टा तुमची काका?"

"बरं आमची थट्टा राहूं दे. खरंच तुला काय आशीर्वाद देऊं? कोणत्या गोष्टीची तुला अगदीं तीव्र इच्छा आहे?"

"सांगूं?" असं विचारतांना खालीं लावलेली नजर तिनं एकदम वर केली; व किंचित् थांबून ती म्हणाली,

"माझे वडील परत येतील व मला भेटतील असा आशीर्वाद द्या मला."

ती खालीं वाकली तेव्हां तिच्या डाव्या स्कंधावर प्रेमानं आपला उजवा हात दाबून सिनूकाका म्हणाले,

"भेटतील, भेटतील. खचित लवकरच भेटतील. आनंदरावाच्या वाटेकडे मी देखील डोळे लावून बसलों आहे."

त्यांचा स्वर सद्गदित झाला होता येवढं श्यामाला कळलं, परंतु त्यांनीं आपल्या डाव्या हाताचीं बोटं डोळ्यांच्या कडांवरून फिरविलीं तें तिला कोठून दिसणार?

# २

दुसऱ्या दिवशीं दुपारीं साडेतीन वाजतां सिनूकाका आपल्या आवडत्या लाल घोड्याच्या टांग्यांत बसून उषाक्का व श्यामाताई यांच्या घराच्या दाराशीं येऊन थांबले.

घरासमोर एक जुनं मोठं वडाचं झाड होतं त्याच्या छायेखालीं टांगा उभा करून घोड्यापुढें घास गवताची पेंढी टाकायला मागच्या बाजूस बसलेल्या गड्याला त्यांनीं सांगितलं, आणि ते घरांत शिरले. ते स्वतः आपल्या मानलेल्या पुतण्यांना बेळगांव स्टेशनवर घेऊन जाणार होते.

बाहेर ओसरीवर सामान तयार होऊन पडलं होतं. दोन वळकट्या, दोन ट्रंका, पितळेचा टिफिन कॅरिअर, आणि दोन साधारण मोठाल्या करंड्या इतके डाग पाहून दारालगतच मोलकरणीशीं कांहीं बोलत असलेल्या श्यामाच्या आईला त्यांनीं विचारलं,

" काय वहिनी, मुलींची जगप्रवासाचीच तयारी केलेली दिसते

आहे तुम्ही! मुंबईच्या डॉक्टरकाकांनीं मुलींना दिवाळीसाठीं बोलावलं आहे, अन् फराळाच्या सामानाचे करंडे भरून तुम्हीच इकडनं त्यांना पाठवतां होय? चांगलं!"

श्यामा तितक्यांत आंतल्या खोलींतून बाहेर आली ती त्यांचं तें अखेरचं वाक्य ऐकून म्हणाली,

"फराळाचं सामान कांहीं सारं मुंबईच्या डॉक्टरकाकांसाठीं नाहीं. त्यांतली एक करंडी पुण्याच्या स्टेशनावर उतरायची आहे."

सिनूकाका म्हणाले, "उषाक्काचे वसंतराव यायचे आहेत वाटतं तुम्हांला पुण्याच्या स्टेशनवर भेटायला? मग बरोबर आहे. बायकांना आपला जावई म्हणजे काय परमदैवत वाटतं कुणास ठाऊक. आज उषाक्काचं अन् वसंतरावचं लग्न जमूं पाहत आहे तर इतकी सरबराई, मग लग्न झाल्यावर वहिनी काय काय करतील कोण जाणे!"

दारांत अजूनही उभ्या राहिलेल्या वहिनींनीं नुसतं हास्य केलं. फारसं बोलण्याचा त्यांचा स्वभावधर्म नसावा. त्या आंत गेल्या तेव्हां सिनूकाकांनीं श्यामाला म्हटलं,

"तयारी आहे ना ग सारी? चार वाजायला आले बरं का? निघालंच पाहिजे."

"आमची अगदीं तयारी आहे." असं श्यामा म्हणते न म्हणते तोंच उषाक्का आंतून तिला ओरडून म्हणाली,

"ताई, वहिनी तुला आंत बोलावते आहे; देवापुढें नारळ ठेवायचे आहेत ना?"

श्यामा आंत गेली, व सिनूकाका मुद्दामच बाहेर ओटीवर उभे राहिले.

थोड्याच वेळांत दोघी बहिणी बाहेर आल्या, आणि त्यांच्या मागोमाग वहिनी चौकटींत येऊन उभ्या राहिल्या. त्यांच्या पाठीशीं म्हातारी सखू मोलकरीण अन् तिची मोठी मुलगी चंद्रा दिसली. सगळ्यांचेच डोळे आसवांनीं ओले झालेले दिसत होते. श्यामा सिनूकाकांच्या पुढें वाकूं लागली तेव्हां ते म्हणाले,

"अग, मी स्टेशनपर्यंत येणार आहे कीं तुमच्याबरोबर. इथेंच निरोप घेतां कीं काय माझा ?"

"पण वहिनीच्या देखत तुम्हांला नमस्कार केला पाहिजे. शिवाय स्टेशनवर मग संकोच वाटतो."

असं म्हणून श्यामानं चट्कन वाकून नमस्कार केला. उषानंही केला. परंतु सिनूकाकांनीं फक्त श्यामाच्याच खांद्याला चटकन् स्पर्श केला.

श्यामानं त्याच्याकडे नजर टाकली, आणि त्या क्षणार्धाच्या नजरभेटींत तिला त्यांच्या दृष्टींत स्पष्ट अभिप्राय आढळला, "तुला काल रात्रीं जो आशीर्वाद दिला तोच मी पुन्हा देतों असं समज."

इतर कुणाच्याही लक्षांत न येणाऱ्या त्या आशीर्वादाचं रहस्य आपल्यांत व काकांच्यांत आहे या भावनेनं श्यामाचे आधींच डबडबलेले डोळे आणखी भरून आले. तिला सिनूकाका लहानपणापासूनच विशेष प्रिय होते, परंतु काल रात्रीपासून त्यांच्यांत व आपल्यांत एक नवीनच निकटपणा उत्पन्न झाल्यासारखं तिला वाटूं लागलं होतं...

काल रात्रीं तिला घरीं परत यायला पुष्कळच उशीर झाला होता. आणि ती घरीं आली तेव्हां तिची मनःस्थिति भावनाविवश झालेली होती. कारण सिनूकाका तिच्या वडिलांच्या किती तरी

आठवणी तिला सांगत राहिले होते. बोलतां बोलतां ते मधेंच म्हणाले होते,

" श्यामा, तूं लेखिका होते आहेस नाहीं का ? तुझ्या गोष्टी मला आवडतात. तुझ्यासारखं कांहीं मला लिहितां येत नाहीं. पण एक गोष्ट मला येईल तशी मीं लिहून ठेवली आहे, ती तूं वाचून पाहशील ? "

श्यामानं जिज्ञासेनं विचारलं होतं, " होय ? कशावर लिहिली आहांत गोष्ट ? "

" अग कशावर कसली ? तुझ्या वडिलांची जेवढी हकीगत मला माहीत आहे तेवढी मीं आपला सवडीचा चाळा म्हणून लिहून ठेवली आहे. जसं सुचलं तसं लिहिलं आहे. मला थोडंच चांगलं लिहितां येणार ? पण—"

" कुठं आहे ? पाहूं या तरी." श्यामानं अधीरतेनं म्हटलं होतं.

सिनूकाका उठून एका कपाटाजवळ गेले होते व तेथून पोथी-प्रमाणें एका रेशमी फडक्यांत गुंडाळलेले कागद बाहेर काढून त्यांनीं ते श्यामाच्या हातीं दिले होते.

मग रात्रीं तिनं तें सारं लिखाण वाचून काढलं होतं. १९२० सालच्या दसऱ्याच्या दिवशीं आनंदराव एकाएकीं नाहींसे झाले ती अखेरची हकीगत वाचून तिच्या मनाची स्थिति विलक्षण झाली होती. तिनं उठून खिडकीशीं जाऊन बाहेर पाहिलं तों चंद्र पश्चिमेकडे किती तरी खालीं सरकला होता, आणि बाहेरची सृष्टि अगदीं विलक्षण स्तब्ध होती. खिडकींतून समोर कित्येक मैलांच्या अंतरावरचे डोंगर अस्पष्ट दिसत होते. त्यांच्याकडे पाहतां पाहतां तिच्या मनांत आलं होतं, आपले वडील त्या क्षितिजापलीकडे कित्येक हजारों मैलांच्या अंतरावर कुठल्या देशांत अन् कुठल्या

वेषांत या घटकेला काय करीत असतील ? ... जीवनाची काय ही विचित्र तऱ्हा, कीं एखाद्या व्यक्तीच्या आयुष्यांत विचित्र घटना घडून आपल्या प्रियजनांपासून सातासमुद्रापलीकडे वावरणं तिला भाग पडावं ! ...

ती मग तशीच किती तरी वेळ खिडकीच्या कट्टयावर कोपरं टेकून उभी राहिली होती.

तिनं अखेर आंत वळून पाहिलं तों उषा स्वस्थ निजलेली होती. वडिलांच्या चरित्राचं जें रहस्य एका बहिणीला माहीत झालं होतं त्याची दुसरीला कल्पना नव्हती !...

श्यामाच्या क्षणभर मनांत आलं होतं कीं उषाला जागं करावं आणि काकांच्या त्या लिखाणावरून आपल्याला जें समजलं तें सारं—! पण पुन्हा तिला वाटलं होतं, नको. मग तिनं आवाज न करतां ते कागद आपल्या ट्रंकमध्यें ठेवले होते.

आतांही गड्यानं सामान उचलतां उचलता जेव्हां तिची ट्रंक खांद्यावर घेतली तेव्हां तिच्या मनांत आलं, कीं त्या ट्रंकेमध्यें काकांनीं दिलेले ते कागद आहेत याची उषाला काय कल्पना ! आणखी कांहीं काळ तरी ते कागद म्हणजे तिच्यांत व सिनू-काकांच्यांत प्रेमाची विशेष दृढभावना उत्पन्न करणारं एक गुप्त रहस्य राहणार होतं. त्या अभिप्रायानं तिनं काकांच्याकडे चटकन् दृष्टि टाकली, व आपल्या मनांतला अभिप्राय त्यांना समजला असं त्यांच्या नजरेवरून वाटतांच ती किंचित् हसली. तिनं वहिनीकडे पाहिलं तेव्हां त्या म्हणाल्या,

" मुंबईस पोंचल्याबरोबर पत्र टाका हं."

" होय " असं उत्तर देतांना श्यामाला वाटलं वहिनीनं हीच गोष्ट गेल्या अर्ध्या घटकेंत कितव्यांदा सांगितली असेल त्याची

कांहीं गणती आहे ? पण ती तरी बिचारी अशा वेळीं आपल्याशीं दुसरं काय बोलूं शकणार ? ...

आणि मग सुमारें तासाभरानं जेव्हां स्टेशनवर गाडी सुटण्यापूर्वी सिनूकाकानीं देखील पुनः पुन्हा "लगेच पत्र टाक बरं का" हेंच वाक्य उच्चारलं, तेव्हां मनुष्य सुशिक्षित असो अशिक्षित असो प्रेमाच्या व्यक्तीला निरोप देतांना स्वतःची गहिंवरलेली मनःस्थिति झाकण्यासाठीं त्याच्या तोंडून असेच शब्द बाहेर पडायचे असा विचार श्यामाच्या मनांत आला. गाडी अगदीं सुटायला झाली तेव्हां सिनूकाका म्हणाले,

"तुम्ही दोघी आतां गाडींत आपल्या जागीं बसा. आज इंटरच्या डब्यांत इतकी गर्दी कां आहे कुणास ठाऊक ? आपण जरा लवकर आलों म्हणून बरं झालं; तुम्हांला दोघींना एकाच जागचीं दोन खालचीं बाकं मिळालीं."

त्या दोघी आंत बसल्या तेव्हां त्या कंपार्टमेंटमधल्या वरच्या दोन बर्थ्सकडे पाहत सिनूकाका म्हणाले, "मिरजेच्या स्टेशनावर येणारच या जागीं कोणी तरी. बाकी येईना का ? तुम्हांला उत्तम झोप मिळणार. बायकांच्या इंटरच्या डब्यांत बसा म्हणणार होतों तुम्हांला, पण तिकडे सोबतीला कुणीच नाहीं. सबंध डबा रिकामा. तेव्हां म्हटलं— "

बाकावरची वळकटी सरकवून खिडकीपाशीं बसत असलेली उषा म्हणाली, "नको बाई. इथेंच बरं आहे. त्या बायकांच्या डब्यांत आम्ही दोघीच राहिलों म्हणजे मग रात्रीं कसं व्हायचं ?"

त्यांचा असा संवाद होत होता तोंच गाडीची शेवटची शिटी वाजली, आणि सिनूकाका म्हणाले, "संभाळून जा ग."

दोघी बहिणी जवळ जवळ एकदमच म्हणाल्या, " काका येतों हं. वहिनीला सांगा काळजी करूं नकोस."

हलकेच सुरू झालेल्या गाडीबरोबर पावलं टाकीत सिनूकाका चटकन श्यामाकडे पाहून म्हणाले,

" आणि मीं दिलं आहे तें जपून ठेव बरं का."

" अगदीं जपून ठेवीन." श्यामा उलट म्हणाली.

उषाला तीं उत्तरं प्रत्युत्तरं कळलीं नाहींत, व दोघीजणी खिडकींतून दूर होऊन जेव्हां खालीं बसल्या तेव्हां तिनं श्यामाला विचारलं,

" काय जपून ठेव म्हणाले ग काका ?

श्यामाच्या मनांत आलं तिला सांगून टाकावं सारं.

पण पुन्हा तिला वाटलं, आणखी कांहीं काळ त्या गोष्टीं तिला न सांगितलेल्याच बऱ्या. वडिलांच्या पूर्व चरित्रांतल्या हकीगती वाचून तिच्या स्वतःच्या मनांतल्या त्यांच्याविषयीं शुद्ध आदराच्या आणि कौतुकाच्या भावना दृढ झाल्या होत्या. पण उषाची वृत्ति तशीच असेल याची तिला खात्री नव्हती. किंबहुना आपल्या वडिलांच्याबद्दल उषा क्वचित् प्रसंगीं जे उद्गार काढी ते ऐकून श्यामाला वाटत गेलं होतं, कीं स्वरूपाच्या अन् शरीरप्रकृतीच्या बाबतींत ज्याप्रमाणें ती आपल्या आईच्या वळणावर गेली होती, त्याप्रमाणेंच आईच्या मनांतली एक विचित्र अविवेकी हट्टी अढीदेखील तिनं उचलली होती. आनंदराव संसारांत कधींच रमले नव्हते, त्यांच्या साहसी स्वभावामुळें व राजकीय उलाढालीमुळें त्यांनीं पत्नीकडे बरंचसं दुर्लक्ष केलेलं होतं, व अखेर तर तिचा अथवा आपल्या लहान मुलींचा विचार न करतां ते एकदम नाहींसे झाले होते.

त्यामुळें त्यांच्या कर्तृत्वाचं कौतुक करण्याला मनानं असमर्थ असलेल्या आपल्या आईला त्यांच्या सर्व वागण्यांत आततायीपणा आणि अन्यायच दिसला होता हें श्यामानं किती तरी दिवसांपासून ओळखलं होतं; आणि आपल्या आईची ही वृत्ति उषाच्याही ठिकाणीं असल्याचं तिला आढळून आलं होतं.

म्हणून सिनूकाकांकडून नव्यानं कळलेल्या गोष्टी उषाला सांगाव्या असं श्यामाला वाटेना, तिच्या प्रश्नाला तिनं हसत हसत उत्तर दिलं,

" कुठल्याशा खटल्याचे कागद सॉलिसिटरला दाखवण्यासाठीं डॉक्टरकाकांच्या जवळ द्यायला म्हणून काकांनीं काल रात्रीं माझ्याजवळ दिले आहेत. ते जपून ठेवायला सांगितलं त्यांनीं."

" असं होय ! " असं म्हणून उषा वळकटीवर मान टेकून लवंडली.

गाडी एव्हांना बेळगांवची हद्द ओलांडून वेगानं धावूं लागली होती. श्यामानं खिडकींतून बाहेर पाहिलं. रेलवेच्या कुंपणाला येऊन भिडलेलीं पिकं, मळे, मधेंच जंगलाचा छोटासा भाग, पुन्हा शेतं, असं दृश्य तिच्या दृष्टीपुढून सरकत गेलं. मधेंच एके जागीं तिळाच्या फुलांचा विस्तीर्ण पिवळा धमक गालिचा एका उंचवट्याच्या पायथ्याशीं पसरलेला दिसला. वांझोटया जमिनीही पुरुष पुरुष उंच वाढलेल्या रानगवताच्या पिवळसर हिरव्या रंगानं झाकलेल्या होत्या. लहान मोठ्या खळग्यांत साचलेल्या गढूळ लाल पाऊसपाण्यांत कांठावरच्या झाडाझुडपांचीं प्रतिबिंबं वाईट काचेच्या आरशांत पडावीं तशीं पुसट पुसट पडलेलीं होतीं. आणि वर ढगांची धावफळ चालू होती त्यामुळें छायाप्रकाशांचे केवढाले

तरी पट्टे चपळ, खेळकर मुलाप्रमाणें जमिनीवरच्या त्या रंगीबेरंगी गालिचावरून पुढें पुढें सरकत होते !

कांहीं वेळानं खिडकीशीं टेकल्या टेकल्या श्यामानं डोळे मिटून घेतले. थंड वाऱ्याचा झोत तिच्या अंगावरून वाहत राहिला. गाडीचा वेग मंदावला तेव्हां कोणतं स्टेशन आलं तें पाहावं असं तिच्या मनांत आलं. पण तिच्या जागृत मनाचा तो शेवटचा विचार होता. "...पूऽऽर!" असा स्टेशनवरच्या पोर्टरचा हेल ऐकूं आल्यासारखं तिला वाटलं. दुसऱ्याच क्षणीं ती बसल्या बसल्याच झोपेच्या स्वाधीन झाली !

  

मिरज स्टेशनांत गाडी शिरली तेव्हां तिचा वेग पुरता बंद होण्यापूर्वींच एखाद्या किल्ल्यावर सैन्य तुटून पडावं त्याप्रमाणें इंटरच्या डब्यावर उतारूंचा हल्ला झाला. वळकट्या, पेट्या कशा-बशा सावरून चार सहा माणसं दारांत चढलीं. कुणी तरी दोघा इसमांनीं उषा व श्यामा यांच्या डोक्यावरच्या बर्थसेवर वळकट्या टाकल्या, व धापा टाकीत ते आपापसांत कानडींत म्हणाले, "हुश्! काय गर्दी ! ए हमाल, त्या ट्रंका आण इकडे !"

मग डब्यांत एकही रिकामं बाक उरलं नाहीं. ज्यांना जागा मिळाली नाहीं ती मंडळी आपले बोजे घेऊन खालीं उतरली, व संतापानं रेलवे कंपनीला शिव्या देत मागें पुढें येरझारा घालूं लागली.

ती झुंबड जराशी ओसरल्यावर उषा बहिणीला म्हणाली, "फराळ करूं या का ग ?"

जांभई देऊन श्यामा म्हणाली, "थांब बाई, गाडी सुटून जरा निवान्तपणा मिळाल्यावर करूं फराळ."

वरच्या बर्थसवर चढलेल्या गृहस्थांनीं विड्या पेटवल्या होत्या, आणि जमखंडी संस्थानच्या राजकारणासंबंधीं त्यांची कानडी चर्चा मोठ्यानं सुरू झाली होती.

"पाणी मात्र पितें थोडं" असं म्हणून श्यामा तांब्याचं फिरकीचं झाकण फिरवूं लागली.

भांड्यांत थोडं पाणी घेऊन तिनं तें विसळल्यासारखं केलं, अन् मागें पुरतं न पाहतां तिनं खिडकींतून तें फेकलं—

आणि फेकण्याची क्रिया पुरती होते न होते तोंच ती जीभ चावून उद्गारली "अगबाई !"

खिडकींतून डोकावून पाहण्याच्या बेतांत असलेल्या कुणा तरी उतारूच्या सरळ अंगावर पाणी फेकलं गेलं होतं !

तिनं खिडकीबाहेर तोंड काढून म्हटलं, "माफ करा हं. मीं पाहिलं नव्हतं."

तो मान हलवून हसला तेव्हां तिला अधिकच वरमल्यासारखं झालं.

त्या तरुणाच्या रेखीव नाकाडोळ्यांपेक्षांहि अधिक चटकन् नजरेंत भरण्यासारखी गोष्ट श्यामाला पहिल्याच सरळ दृष्टिक्षेपांत वाटली ती त्याची उंचनिंच मजबूत शरीराची ठेवण अन् उभं राहण्यांतली ऐट.

तिची कल्पना होती तो पुढें जाईल. तो दोन पावलं खिडकी-कडेच आला तेव्हां तिला आश्चर्य वाटलं. त्यानं विचारलं,

"सारीं बाकं भरलीं आहेत ना?..."

तिनं मानेनं हो म्हटलं.

तो म्हणाला, "तुम्हांला एक विनंति केली तर ऐकाल? तिकडे बायकांसाठीं राखून ठेवलेला इंटरचा डबा अजीबात रिकामा आहे. तिकडे कां जात नाहीं तुम्ही?"

वरच्या बर्थवरचा एक कानडी गृहस्थ मराठींत म्हणाला,

"खरंच, तुम्ही बायका इकडे बसतां अन् आमची किती गैरसोय करतां बघा..."

त्या तरुणानं श्यामाला विचारलं,

"तुमच्याबरोबर पुरुष-माणूस कोण आहे?"

"कुणी नाहीं. आम्ही दोघीच आहोंत."

"दोघी आहांत ना? – मग तिकडे त्या डब्यांत जाऊन बसायला..."

"पण डबा रिकामा आहे म्हणतां ... सबंध डब्यांत रात्रभर आम्ही दोघीच राहिलों तर भीति वाटेल..."

बर्थवरचे कानडी गृहस्थ म्हणाले,

"अहो भीति कसली दोघी असल्यावर? आमच्या बायका केव्हां धीट होणार कुणास ठाऊक? युरोपिअन बायका खुशाल एकेकट्या जातात सेकंड क्लासांतून. त्यांना कांऽहीं भय वाटत नाहीं..."

श्यामानं मान किंचित् तिरपी करून पाहिलं. तिच्या भुवयां-मधली आठी दिसल्यामुळें वरच्या कानडी बडबडीला ब्रेक लागला.

खिडकीला टेकलेला तो तरुण त्या वरच्या बर्थकडे पाहून म्हणाला, "हें मात्र मी म्हणणार नाहीं हं. युरोपिअन बाई एकटी प्रवास करते ती अंगीं मोठं धैर्य असतं म्हणून नव्हे. सबंध राजकीय सत्ता आपल्या पाठीशीं आहे अन् आपल्या नखाला धक्का लागला

तरी पोलिस अन् न्यायखातीं गुन्हेगाराला हुडकून काढतील व शासन करतील असा तिला विश्वास असतो म्हणून. गोऱ्या बायकांच्या शौर्याच्या गोष्टी सांगून आमच्या स्त्रियांना हिणवण्यांत काय अर्थ आहे ?..."

"हो...हो...तेंही खरंच म्हणा" असं कांहीं तरी पुटपुटून वरची बर्थ स्तब्ध झाली.

श्यामानं त्या तरुणाकडे मान वळवली. त्याचं तें बोलणं तिला फार आवडलं होतं. तिच्या तोंडावर हास्य खेळत होतं. तिला वाटलं तो हसेल. पण तो हसला नाहीं. त्यानं फक्त विचारलं,

"मग? तिकडच्या डब्यांत जाणार का?"

"हो, जातों." ती झटकन् म्हणाली.

"थँक यू ..."

"पण हमालाला बोलावलं पाहिजे. आमचं बरंच सामान आहे तें तिकडं नेलं पाहिजे ना ?..."

"काय आहे ? ... त्या ट्रंका, त्या वळकट्या, ते करंडे ... येवढंच ना ? ... तुम्ही जाऊन बसा. मी घेऊन येतों सारं ..."

"तुम्ही ?... नको." श्यामानं मान हालवली.

"त्याला काय झालं!" तो किंचित् हसला, "तुम्ही तिकडे चला. सामानाची नको काळजी."

त्यानं मोठ्या तत्परतेनं त्या दोघींना बायकांसाठीं राखून ठेवलेल्या डब्याकडे नेलं. आधीं आंत चढून त्यानं एका कंपार्टमेंटच्या खिडक्या खडाखड उघडल्या, व दिव्याचं बटण ओढून तो खालीं उतरत म्हणाला,

"बसा, मी सामान घेऊन येतों."

तो गेल्यावर उषाक्का बहिणीला म्हणाली, "तूं कांहीं म्हण मला इथें भीति वाटते बाई. तूं इकडे यायचं कबूल केलंस मला नाहीं आवडलं. काय तुझ्या मनांत आलं कोणास ठाऊक ?"

त्या प्रश्नांत उपरोधाचा जो ध्वनि होता तो श्यामाच्या ध्यानांत आल्यावांचून राहिला नाहीं. ती चटकन् म्हणाली,

"इश्श, माझ्या मनांत कसलं आलंय काय ? मला खरंच वाटलं इतका काय भित्रेपणा करावा आपण."

"तूं दाखविलंस शौर्य, पण मला आतां झोप नाहीं यायची."

"अग दारं खिडक्या लावून घेऊं..."

"तरी मला भय वाटेल बाई..."

तितक्यांत तो परत आला. एखादं पुस्तक उचलावं त्याप्रमाणें त्यानं ट्रंक सहज हातीं धरली होती असं श्यामाला वाटलं. त्याची मनगटं किती मजबूत होतीं !...

त्यानं सारं सामान आणून ठेवलं, व मग उतरण्यापूर्वी तो श्यामापुढें थोडा थबकला तेव्हां ती म्हणाली, "तुमचे फार आभार मानले पाहिजेत."

"वा ! हें उलटं कसं ? मींच तुमचे आभार मानले पाहिजेत. मीं तुम्हांला फार तसदी दिली."

त्यानं दाराकडे पाऊल टाकल्यासारखं कलं, पण लगेच थबकून विचारलं,

"झोप येईल ना तुम्हांला चांगली ? — का भीति वाटते आहे मनांतल्या मनांत ?..."

"छे !" असं श्यामा म्हणाली, पण तें म्हणतांनाच तिनं उषाकडे अशा अभिप्रायानं पाहिल्यासारखं केलं, कीं मला नाहीं पण हिला भीति वाटत आहे त्याला काय करावं ?

तिच्या नजरेंतला तो अर्थ त्यानं ओळखला. तो प्रथम उषाकडे व नंतर श्यामाकडे पाहून म्हणाला,

" तुम्हांला अगदीं पुरतं निर्भय वाटत नाहीं असं दिसतं... तसं असेल अन् रात्रीं तुम्हांला स्वस्थ झोप मिळाली नाहीं तर तुमच्यावर इकडे यायची ही सक्ती केल्याबद्दल माझं मन मला खात राहील. अजून तुम्हांला परत जायचं असलं तर मी—"

" छे छे!" श्यामा हसत म्हणाली, " तसं कांहीं नाहीं..."

पण श्यामाच्या मुद्रेवर जसं त्याला निश्चित प्रसन्न हास्य दिसलं तसं जरा पलीकडे उभ्या राहिलेल्या तिच्या बहिणीच्या चेहऱ्यावर दिसेना. त्या गोऱ्यापान सुंदर मुखावर भीतीची अन् चिंतेची स्पष्ट छटा होती.

तो श्यामाला म्हणाला,

" भ्यायचं कांहीं कारण नाहीं असं मला वाटतं. पण संकट आलं तरी तुम्हांला आपलं रक्षण करतां यावं यासाठीं...हें ठेवा तुमच्याजवळ..."

त्यानं आपल्या कमरेचा वीतभर जंबिया काढला व श्यामापुढें धरला.

हें त्याचं करणं फारच अनपेक्षित होतं.

श्यामा क्षणभर गोंधळली. एक अपरिचित तरुण आपल्या हातीं शस्त्र देत आहे ही घटना किती अद्‌भुतरम्य आहे असंही तिच्या मनांत आलं. पण " घ्या ना, ठेवा " असं तो पुन्हा म्हणणार तोंच अधिक न घोटाळतां तिनं तें शस्त्र घेतलं. त्याच्या झाकणाऱ्या काळ्या मखमलीवरची कलाबतू दिव्याच्या झगझगीत उजेडांत चमकली.

तो हसला, व " अस्सं. आतां तुम्हांला झोप येईल. अन्

मलाही!" असं म्हणून दारांतून झेपदार उडी टाकून तो निघून गेला. त्यानं वळून पाहिलं नाहीं.

मग श्यामा बाकावर आपली वळकटी सोडूं लागली तेव्हां एकीकडे उषाच्या प्रश्नांना ती उत्तरं देत होती खरी, परंतु त्या बोलण्याकडे तिचं खरं लक्ष नव्हतं.

  

दुसऱ्या दिवशीं सकाळीं श्यामा जागा झाली ती कुणी तरी खिडकीवर खटखट आवाज करीत आहे व "उषा!" "श्यामा-ताई!" अशा हाका मारीत आहे असं वाटल्यामुळें.

तिनं डोळे उघडून पाहिलं तों खिडकीशीं वसंत उभा होता. "अय्या!" असा उद्गार काढून तिनं चादर फेकली व उषाला हालवीत ती म्हणाली,

"ए! ऊठ! पुणं आलं!"

"कमाल झाली तुमची!" वसंत म्हणत होता, "मला यायला उशीर झाला, अन् मला तर वाटलं होतं या गाडीवर तुम्हांला पाहण्याऐवजीं मुंबईच्या गाडीवरच पाहावं. सारे पॅसेंजर निघून जाऊन प्लॅटफॉर्म रिकामा झाला आहे. पण इथें येऊन पाहतों तों तुम्ही दोघी खुशाल निजलां आहांत..."

"इतकी कशी आम्हांला दोघींनाही झोप लागली!" उठून उभी राहिलेली उषा म्हणाली. तिनं केस नीट करतां करतां तिरपी मान करून वसंतकडे पाहिलं, व तिला हसूं आलं.

वसंत हसला व म्हणाला,

"या, तुम्ही दोघी खालीं या. मी काढतों सामान. ए हमाल! ए..."

श्यामा लगबगीनं खालीं उतरली, व इंटरच्या डब्याच्या दुसऱ्या भागाकडे गेली.

तो जंबिया परत द्यायला हवा होता.

पण ती डब्यापाशीं जाऊन पाहते तों डब्यांत एकही माणूस नव्हतं!

एक रेलवे कारकून वहींत डब्याचा नंबर नोंदीत होता, व तेलकट काळे कपडे घातलेला एक कामगार खालीं चाकावर हातोड्यानं मारून पाहत होता!

श्यामानं दूरवर पाहिलं. प्लॅटफॉर्मवर शुकशुकाट झाला होता. पलीकडच्या जिन्यावरदेखील कोणी दिसत नव्हतं!

ती गोंधळून उभी राहिली.

आतां काय करायचं? ...पुणें स्टेशन आल्यावर तो उतरून आपल्याकडे आला असला पाहिजे, पण आपण गाढ झोपीं गेल्याचं पाहून तो तसाच गेला असावा...

तो कोण, त्याचं नांव काय, तिला कांहींच माहीत नव्हतं. जंबियावर नांव नसल्याचं तिला कालच आढळून आलं होतं... आणि आतां तो निघून गेला होता!... तें शस्त्र तेवढं तिच्या-जवळ राहिलं होतं! ...जणूं त्याची व कालच्या गमतीदार प्रसंगाची आठवण म्हणून!

श्यामा स्वतःशींच किंचित् हसली, व परत फिरली.

# ३

माटुंग्याच्या इमारती झरकन मागें सरकतांना दिसतांच खिडकी-जवळ बसलेली श्यामा वहिणीला म्हणाली,

" दादर आलं बरं का. "

" होय ?—" असं म्हणून उषानं हातांतलं वर्तमानपत्र दूर टाकलं, व बाकावरची दोन पुस्तकं, टॉवेल इत्यादि वस्तु ट्रंकमध्यें घालून तिचं झाकण ती बंद करूं लागली.

मग वर्तमानपत्राची घडी करीत तिनं श्यामाला विचारलं, " हें ठेवायचं काय ग ?—"

" तें कशाला ? आहे काय त्यांत ? " श्यामा उठत साडी नीट करीत म्हणाली. " आतांशा मराठी वर्तमानपत्रांतल्या बातम्या झाल्या आहेत ठरीव सांच्याच्या. नागपूरच्या डॉ. खऱ्यांनीं अमक्या बाजूला दौरा काढला, गोविंद वल्लभपंत तमक्या बाजूला फिरतीवर निघाले, नामदार खेरांनीं अमक्या संस्थेला भेट दिली, अन्

तमक्या संस्थेचं शिष्टमंडळ नामदार मुनशींच्या भेटीला गेलं—याखेरीज दुसरं कांहीं घडतच नाहीं जसं कांहीं. कॉंग्रेसचीं मंत्रिमंडळं झाल्यापासून या चार महिन्यांत वर्तमानपत्रांना दुसरा विषय नाहींसा झाला आहे."

"अग लोकांना उत्सुकता वाटते मुनशी-खेरांच्या हालचाली समजाव्या म्हणून, मग वर्तमानपत्रांनीं बातम्या दिल्या तर त्यांचं कसं चुकलं म्हणतां येईल?"

"लोकांना कुठली वाटते आहे उत्सुकता? वर्तमानपत्रं ती मुद्दाम उत्पन्न करतात मोठाले मथळे अन् वर्णनं देऊन!"

असं श्यामा म्हणाली तोंच वळकटीवर पडलेलं तें वर्तमानपत्र वाऱ्याच्या झोतानं उडालं तें तिच्या अंगालाच बिलगलं अन् फडफडत राह्यलं. तें दूर करतां करतां त्यांतला एक मोठा मथळा वाचीत ती हसून म्हणाली,

"सोलापूर येथें पंतप्रधान बाळासाहेब खेर यांचें आगमन! रुग्णपरिचर्यापदार्थ-संग्रहालयास भेट!...इश्श..."

तिनं तें वर्तमानपत्र बाकावर टाकून दिलं.

तिनं वाचलेला मथळा ऐकून व ज्या अभिनयानं तिनं पत्राची घडी करून टाकली तो पाहून उषाला हसूं आलं. पण ट्रंकला कुलूप लावून किल्ली बॅगमधें ठेवतां ठेवतां ती म्हणाली,

"तुला कॉंग्रेसवाल्यांच्या साऱ्याच गोष्टींत दोष दिसायला लागलाय आतांशा. आतां डॉक्टरकाकांच्या घरीं तुझ्या अन् त्यांच्या चकमकी उडालेल्या पाहाव्या लागणार मला."

"नाहीं बाई. काकांशीं मी कशी वाद घालीन ग?"

असं म्हणून श्यामानं खिडकीबाहेर तोंड काढलं.

ज्या काकांच्याकडे त्या जात होत्या ते गांधींचे अगदीं

निस्सीम चाहते व अनुयायी होते. ते मुंबईत प्रॅक्टिस करूं लागल्याला आतां पंधरा वर्षं झालीं होतीं, अन् या अवधींत त्यांनीं जसा खूप पैसा केला त्याप्रमाणें गांधींच्या चळवळीला केंव्हांही सढळ हातानं मदत करणाऱ्यांत प्रमुख स्थानहि मिळवलं होतं. 'खार रोड'वरच्या त्यांच्या राहत्या बंगल्याकडे पाहतांच त्यांचा डॉक्टरीचा धंदा किती उत्तम चालत असला पाहिजे तें जसं सहज कळण्यासारखं होतं, तशीच बंगल्यावर उंच फडकणारा तिरंगी झेंडा दिसला कीं डॉक्टरांची कॉंग्रेसनिष्ठा लक्षांत येण्यासारखी होती...पण म्हणून त्यांच्या व आपल्या वादाच्या चकमकी उडतील ही उषाक्काची आपली कांहीं तरीच कल्पना !...

असे विचार तिच्या मनांत येत आहेत तोंच रूळ बदलल्याचे खाडखाड आवाज झाले, गाडी स्टेशनांत शिरली, 'क्रानिकेऽऽल' असा हेल अंगावरून गेला, हमालांची रांगच्या रांग मागं सरकत गेली अन् अखेर गाडी थांबली तेंव्हां साऱ्या डब्यांना हिसका बसून त्यांचे लंगर खळाळले.

एव्हांना उषा आपल्या बहिणीजवळ येऊन खिडकींतून अंग काढून उभी राहिली होती, ती प्लॅटफॉर्मवरचीं माणसं न्याहाळीत उद्गारली,

"काय ग, अशोक कुठें दिसत नाहीं कीं !"

डॉक्टरकाकांचा एकुलता एक मुलगा अशोक त्यांना उतरून घेण्यासाठीं घरची मोटर घेऊन दादर स्टेशनवर येणार होता. तो कोठें दिसतो का म्हणून श्यामाहि निरखून पाहत होती. ती उषाचे उद्गार ऐकून म्हणाली,

"काकांनीं अगदीं वेळेवर निघायला लावलं असेल त्याला घरून, पण वाटेंत कुठें रमला असला तर आपल्याला स्टेशनावर

जायचं आहे ही गोष्ट तो विसरला देखील असेल. अशोकचा स्वभाव आपल्याला माहीत का नाहीं ?"

"समजा, तो आलाच नाहीं तर ग काय करायचं ?" उषा जरा त्रासून म्हणाली.

"उंः! त्याचं काय येवढं. टॅक्सी करून खारला जातां येणार नाहीं कीं काय आपल्याला ? चल, आपण डब्याखालीं उतरूं तर खऱ्या." असं म्हणून श्यामा खिडकींतून दूर झाली, व तितक्यांत आंत आलेल्या हमालाला तिनं सामान दाखवून तें काढायला सांगितलं.

त्यांचं सारं सामान खालीं काढलं गेलं तरी त्यांना अशोक कुठें दिसेना. गाडींतून उतरलेले बाकीचे उतारू आपापले बोजे हमालांच्या डोक्यावर देऊन घाईनं बाहेर पडूं लागले होते. स्टेशनच्या कुंपणावर टेकून दोघे तिघे व्हिक्टोरियावाले रंगीबेरंगी गोंड्यांनीं सजविलेले आपले चाबूक उंच करून त्या दोघींना उद्देशून ओरडत होते, "बाईसाहेब, आपली गाडी आहे ना !" "कुठं जायचं बाईसाहेब ?" त्या आरोळ्या ऐकून उषा मान फिरवून म्हणाली,

"काय ः ाच्छाद आहे मेल्यांचा. अन् हा अशोक तर अजून येईना. इथें प्लॅटफॉर्मवर उभं तरी किती वेळ राहायचं ?"

श्यामाचं तिच्या बोलण्याकडे नीटसं लक्ष नव्हतं. ती ज्या डब्यांतून उतरली होती त्याच्या जवळच्याच एका सेकंड क्लासच्या डब्याकडे तिचं लक्ष वेधलं गेलं होतं. खादीचे सदरे व टोप्या घातलेले पांच दहा लोक डब्याच्या दारापाशीं जमले होते. तीन चार पट्टेवाले डब्यांतून सामान बाहेर काढण्यासाठीं धावपळ करीत होते. चार पोलिस शिपाई खडी ताजीम देऊन उभे होते. डब्यासमोर

प्लॅटफॉर्मवर बघ्यांची गर्दी झाली होती. कुणी तरी बडा माणूस त्या डब्यांत असला पाहिजे. तो खालीं उतरतांना दिसेल अशा अपेक्षेनं श्यामा लक्ष देऊन पाहत राहिली होती. अशोक आला नाहीं तर इथेंच अधिक न थांबतां आपल्याला गाडी करून खारला जाणं भाग आहे या गोष्टीचा तिला क्षणभर विसरच पडला होता.

थोड्याच वेळांत त्या डब्याच्या दाराशीं खादीचा पोशाख केलेली व डोळयांवर चष्मा चढविलेली एक व्यक्ति दिसली, आणि त्याबरोबर प्लॅटफॉर्मवरच्या बघ्या लोकांनीं 'गांधीमहाराज की जय' अशी आरोळी ठोकली.

कॉंग्रेसच्या मंत्रिमंडळांतील एक मंत्री प्रवास करून येऊन दादर स्टेशनवर उतरतो यांत गर्दी करून बघत उभं राहण्यासारखं अन् 'गांधीमहाराज की जय' म्हणून ओरडण्यासारखं काय आहे! एखाद्या बऱ्या वाईट कीर्तीच्या नटाला अगर नटीला पाह्यसाठीं दाटी व्हावी त्यांतलाच हा प्रकार नव्हे काय!...असे विचार श्यामाच्या मनांत आले, व त्यांच्या अनुरोधानं ती उषाकडे वळून कांहीं तरी विनोद करणार होती इतक्यांत उषा बोट दाखवून आनंदानं म्हणाली,

"आला बाई आला अशोक–तो बघ—"

श्यामानं पाहिलं तों अशोक फाटकांतून आंत शिरायला अन् भोंवतालच्या झुंबडीबरोबर मंत्रीसाहेब तिथें पोंचायला एकच गाठ पडली. "अरे अशोक! तमे अहीं...?" असं हसत विचारून मंत्र्यांनीं अशोकशीं हस्तांदोलन केलेलं त्यांनीं पाहिलं, व त्यांच्याशीं इंग्रजींत कांहींसं बोलून अशोक पुढें झटकून त्यांच्याकडेच येतांना त्यांना दिसला.

'नमस्कार असो आपल्यापुढें' अशा अर्थानं हात जोडून श्यामा म्हणाली, " चांगलं ! "

जवळ आलेला अशोक सिगरेट तोंडावेगळी करून म्हणाला, " तुम्हीं द्याल तितक्या शिव्या ऐकून घेणं भाग आहे. माफ कर. बरं चला आतां, येवढंच सामान ना ? Good. ए हमाल, ती जांभळी मोटार दिसतेय ना? हां ती. तिच्यामागं बांधायचं सामान. त्याचं असं झालं ताई, घरून अगदीं वेळेवर निघालों होतों बघ. पण—"

"वाटेंत रमलास ना कुठें तरी ?" श्यामा टाळी वाजवून हसली व म्हणाली, "मीं म्हटलंच उषाला. बाकी बरं झालं. उशीर केलास म्हणूच गेटापाशीं गाठ पडली तुझी अन् मुनशीसाहेबांची, अन् शेंपन्नास बघ्या लोकांना कळलं कीं मुनशींनीं हस्तांदोलनासाठीं हात पुढें करावा इतका बडा माणूस तूं आहेस. आतां तुझ्याबरोबर जातांना आम्हांला पाहून हे लोक आम्हांलाहि बड्या कोणी तरी समजतील ! "

तीं तिघं स्टेशनांतून बाहेरच्या आवारांत आलीं त्या वेळीं मुनशींची मोटार निघाली; व लोकांनीं पुन्हा आरोळी ठोकली " महात्मा गांधी की जय!" एकदोघे ओरडले, "नामदार मुनशी की जय ! "

श्यामाकडे पाहून डोळा मिचकावीत अशोक म्हणाला, " काय मूर्ख आहेत बेटे. महात्मा मुनशी म्हणायचं सोडून नामदार मुनशी म्हणताहेत !"

श्यामा हसली.

मोटारींत शिरतां शिरतां उषा तिला म्हणाली, " तुला अशोक मिळाला आतां, मग काय ? कॉंग्रेसची चेष्टा ऐकावी लागणार मला

आतां वाटभर. पण अशोक, जें जें बोलशील तें काकांना सांगेन हं मी, लक्षांत ठेव."

अशोक हमालाला पैसे देऊन गाडी हाकण्याच्या जागीं बसत होता तो म्हणाला,

"हात्तिच्या, मी कॉँग्रेसची चेष्टा करतों हें काकांना माहीतच नाहीं जसं कांहीं. माझ्या सगळ्या 'जोक्स' ऐकलेल्या आहेत काकांनीं. 'बाप इतका गांधीभक्त पण मुलगा अगदीं वेगळा हं!' असे आमच्या बंगल्यावरून जाणारे लोक एकमेकांत उद्‌गार काढतात ते काकांना ऐकूं येतात पुष्कळदा. पण आपल्या मतांचा जुलूम त्यांनीं माझ्यावर कधींच केला नाहीं. He is such a nice father!"

त्यानं सिगरेट शिलगावून गाडी सुरू केली, व मागं वळून म्हटलं,

"अक्का, आमच्या घरांतल्यासारखं मतस्वातंत्र्य फार थोड्या घरांत दिसेल. काय ताई, मी म्हणतों तें खोटं का?"

त्याचं म्हणणं किती खरं होतं याची त्या दोघींनाही पूर्ण कल्पना होती. अशोक जवळ जवळ उषाच्याच वयाचा होता व डॉक्टरकाकांनीं त्याला कसं वाढविलं तें प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहूनच त्यांना माहीत होतं. अशोकची असामान्य बुद्धि त्याच्या अगदीं बालवयांतहि दिसून आली होती. तो तीन चार वर्षांचा असतांना त्याला लहानपणापासुन इंग्लंडमध्यें ठेवण्याचे बेत त्याचे वडील कौतुकानं बोलून दाखवीत असत. पण १९२० सालीं गांधींच्या चळवळीची अजस्र लाट उठली, आणि डॉक्टरांच्या मनोवृत्तींत एकदम जी विलक्षण क्रांति झाली तिच्या योगानं त्या वेळीं सहा वर्षांच्या असलेल्या अशोकला त्यांनीं इंग्लंडला पाठविण्याऐवजीं गांधींच्या साबरमती आश्रमाच्या नमुन्यावर निघालेल्या एका

आश्रमांत ठेवला. अशोकनं त्या आश्रमांत पांच वर्षे काढलीं होतीं. परंतु तिथल्या वातावरणांत तो मुळींच रमला नव्हता. गांधीवादाचे संस्कार मुलावर व्हावेत अशी डॉक्टरांची कितीहि जबर इच्छा असली तरी त्याच्यावर ते जुलमानं लादायची त्यांची तयारी नव्हती. त्यामुळें अशोकच्या अकराव्या वर्षानंतर त्याच्या इच्छेनुसार शिक्षण घ्यायची परवानगी त्यांनीं त्याला दिली होती. मॅट्रिक झाल्यावर अशोक मुंबईच्या आर्ट स्कूल-मध्यें शिरला होता, व तिथला शिक्षणक्रम उत्तम प्रकारें संपवून आज एक नामांकित चित्रकार व नृत्यसंगीताचा दर्दी षोकी म्हणून त्यानं चांगलीच प्रसिद्धि मिळविली होती. या कर्तबगारीच्या जोडीला त्याच्या अंगीं गांधीनिष्ठा असती तर डॉक्टरना विशेष आनंद झाला असता, पण ती नव्हती म्हणून त्याच्या हुशारीचं कौतुक ते कमी करीत असं मुळींच नव्हे, अगर त्याच्या भिन्न राजकीय दृष्टिकोणाविषयीं ते असहिष्णुता दाखवीत असंही नव्हे. देशांतल्या आजच्या परिस्थितींत एकाच कुटुंबांतल्या वेगवेगळ्या माणसांचा वेगवेगळ्या राजकीय पक्षांकडे ओढा असणं कसं संभवनीय आहे याबद्दल कधीं कुणाशीं बोलतांना विषय निघाला कीं श्यामा म्हणे, आमच्या डॉक्टरकाकांची अन् अशोकची गंमत सांगतें तुम्हांला. आणि मग त्यांच्या भिन्न मतांच्या गोष्टी सांगतांना एकाच बंगल्यांतल्या बाप-लेकांच्या खोल्यांची सजावटसुद्धां किती वेगळी त्याचं मोठं मनोरंजक वर्णन ती करी...

आत्तां पुढें बसलेल्या अशोकच्या ऐटबाज मानेकडे पाहतां पाहतां तिला त्या वर्णनांची आठवण झाली, व तिनं अकस्मात् विचारल्याप्रमाणें प्रश्न केला,

" तुझ्या म्यूझिअममधें आणखी किती चित्रांची भर पडली आहे अलीकडे, अशोक ? "

" माझ्या म्यूझिअममधें ? " त्यानं विचारलं.

" म्हणजे तुझ्या खोलींत रे ! " ती हसली.

" असं असं." तोहि मनःपूर्वक हसला व म्हणाला, " पुष्कळ. आतां दिसेलच कीं तुला. त्यांतलं कलेच्या अन् कल्पनेच्याहि दृष्टीनं सगळ्यांत उत्तम चित्र आहे एका जर्मन चित्रकारानं काढलेलं. त्याचं नांव मीं ठेवलं आहे 'अबला नव्हे सबला !' हातांत शस्त्र घेतलेल्या तरुण मस्त जर्मन मुलीचं चित्र आहे तें. It's simply lovely ! Marvellous ! "

गर्दीचा रस्ता लागला म्हणून तो तेवढेच उद्गार काढून गप्प झाला. पण नंतर जेव्हां खूपच प्रशस्त अशा डांबरी सडकेवरून गाडी निर्बंध वेगानं जाऊं देतां आली तेव्हां तो म्हणाला,

" ताई !—"

" हं..." श्यामानं विचारलं.

" त्या चित्राच्या नमुन्यावर मला करायचंय एक हिंदु मुलीचं चित्र तयार..."

" हं..."

" हं काय ? तुझ्यावरून काढणार आहे मी. 'लवकर ये' म्हणून काकांच्या पत्राखालीं मीं तांबड्या शाईनं लिहिलं होतं तें याचसाठीं."

" इश्श, माझ्यावरून ? मी का सुंदर, का गोरी, का—"

" तें मला जास्त कळतं. सशस्त्र हिंदु मुलीचं चित्र माझ्या कल्पनेपुढें उभं राहिलं तें चटकन तुझंच ! इथलं प्रदर्शन जवळ

आलं आहे. त्यांत या चित्रावर बक्षीस मारायचा निश्चय केला आहे मीं. कसं काढतों बघ तरी."

" शस्त्र कोणतं हातांत देणार आहेस माझ्या चित्र काढतांना? ...जांबिया?"

" सारं सोडून जंबियाच कां विचारलास?" अशोक आश्चर्यानं म्हणाला.

" कांहीं नाहीं. उगीच."

" तरी पण?"

" मग केव्हां तरी सांगेन तुला." ती म्हणाली.

कसल्या तरी विचाराची प्रसन्नता तिच्या चर्येवर पसरली, तिचे ओंठ विलग झाले, खिडकीबाहेर कुठें तरी शून्य दृष्टीनं ती पाहत राहिली.

  

मोटार थांबली तेव्हां श्यामानं दचकून विचारलं, " का रे, काय झालं?"

" कुठें काय झालं? आपला बंगला आला कीं."

" हा आपला बंगला?"

खरोखरच क्षणभर तिला बंगल्याची ओळख पटेना. पण मग मात्र तिच्या लक्षांत आलं कीं, बंगल्याच्या पुढच्या बाजूस पूर्वी जें खूपच विस्तीर्ण मोकळं आवार होतं तें नव्या दुमजली इमारतीनं झाकलं गेल्यामुळें तिला बंगला चटकन् ओळखतां आला नव्हता.

अशोकचे वडील पूर्वी खारला फक्त राहत असत, आणि त्यांचा दवाखाना मुंबईस लॅमिंग्टन रोडवर असे. परंतु गेल्या पांच सात वर्षांत मुंबईच्या उपनगरांतहि त्यांचं प्रॅक्टिस इतकं वाढत गेलं होतं कीं, खारलाच दवाखाना थाटण्याचे विचार त्यांच्या मनांत येऊं लागले होते. त्याप्रमाणें त्यांनीं हलके हलके आपलं मुंबईतलं प्रॅक्टिस डॉक्टर पेंडसे नांवाच्या एका हुशार तरुण डॉक्टरच्या स्वाधीन केलं होतं; व स्वतःच्या उद्योगासाठीं आपल्या बंगल्याच्याच पुढच्या बाजूस मोठी इमारत बांधली होती. तळ-मजल्याचा उपयोग हॉस्पिटलसारखा व्हावा, आणि वरच्या मजल्यावर दवाखान्याचे सारे भाग राहावेत अशा धोरणानं ती इमारत बांधण्यांत आली होती.

मोटारींतून उतरल्यावर श्यामा व उषा दोघीहि कांहीं वेळ त्या इमारतीकडे पाहत राहिल्या. श्यामा अशोककडे वळून म्हणाली, " फार छान झाली आहे रे इमारत."

आपला डावा हात मुडपून तळहातानं पाठ थोपटल्यासारखं करीत हसून अशोक म्हणाला,

" माझी शाबास आहे म्हण. कारण इमारतीचे सारे नकाशे मीं करून दिले होते काकांना. ही इमारत बांधायचं काकांनीं ठरविलं तेव्हां मीं त्यांना म्हटलं, कॉंग्रेसचे मंडप सजविणारा कुणी तरी गांधीपंथांतला आर्किटेक्ट आणाल इमारतीचे प्लॅन्स तयार करायसाठीं, आणि एका सुंदर इमारतीऐवजीं शिल्पशास्त्राचं एक सोंग कायमचं उभं राहील आपल्या राहत्या बंगल्यापुढें. तेव्हां ही नवी इमारत माझ्या आवडीप्रमाणें माझ्या देखरेखीखालीं तयार झाली पाहिजे."

" तुझं म्हणणं ऐकलं म्हणायचं काकांनीं."

" ऐकलं म्हणजे ? मनांतल्या मनांत ते ओळखून नाहींत कीं काय आपल्या मुलाची योग्यता ? "

" वा वा, तें काय विचारावं ? " असं म्हणत श्यामानं चटकन् त्याची पाठ थोपटली.

तेवढ्यांत त्यांची मोटार येऊन दाखल झाल्याची वर्दी डॉक्टरांच्यांपर्यंत पोंचली होती. ते गळ्याभोंवतालचा स्टेथॉस्कोप सावरींत पुढच्या गॅलरींत आले व वाकून ओरडून म्हणाले,

" आलांत का ग ? छान ! तुमची दोघींची तब्येत चांगली दिसते आहे. आतां उन्हांत उभ्या राहूं नका फार वेळ. अशोक, ए गप्पाड्या, त्यांना आंत ने. चहा तयार होईल तंवर इथल्या कामांतनं सवड काढून मीं येतोंच. ताई, वहिनी खुशाल आहे ना ? "

श्यामा वर मान करून हसत त्यांच्याकडे पाहत होती तिनं होकारार्थी मान हालविली.

गळ्यांतला स्टेथॉस्कोप काढून त्याचीं टोकं जुळवीत डॉक्टरनीं विचारलं,

" आणखी सिनाप्पा ? "

" मजेंत आहेत. पण तुमच्यावर रागावले आहेत ते."

" होय ? का रे बाबा ? "

" तुम्ही कितीक वर्षांत चांदणीला आला नाहीं म्हणून."

" असं होय ? बरं बरं, त्यांना काय कल्पना डॉक्टरला आपल्या धंद्याची कशी गुलामगिरी पतकरावी लागते त्याची ! बरं पण तुम्ही आंत जा पाहूं आतां."

" काका लवकर या हं," असं ओरडून सांगून श्यामा आपल्या वहिणीबरोबर आंतल्या बंगल्याकडे निघाली.

तितक्यांत दुसरी एक मोटार वेगानं येऊन बंगल्यापुढें उभी

राहिली म्हणून श्यामानं मान वळवून पाहिलं, तों तिच्यांतून खाली उतरणारा पांढरा शुभ्र खादीचा पोशाख केलेला तरुण पुरुष तिला ओझरताच दिसला. त्यानं किंचित् हास्य करून दोन्ही हात अगदीं नीट जुळवून नमस्कार केला त्यामुळें ती बरीचशी गोंधळली. कारण प्रत्यक्ष म्हणा किंवा फोटोंत म्हणा त्याला पूर्वी कुठें तरी आपण पाहिलं असावं अशी कल्पना जरी तिच्या मनांत चटकन येऊन गेली तरी त्यानं आपल्याला अभिवादन करावं अशी त्याची व आपली ओळख होतीसं तिला वाटलं नाहीं. पण उलट नमस्कार करावा किंवा काय अशा शंकेत ती होती तोंच तिच्या लक्षांत आलं कीं आपल्या आड असलेल्या अशोकला पाहून त्यानं तो नमस्कार केला होता. मग आपलं कांहीं चुकलं नाहीं असं वाटून तिचं मन स्वस्थ झालं. तिनं पुन्हा नजर फिरविली, पण तेवढ्यांत तो तरुण वर डॉक्टरकाकांच्याकडे गेला असावा.

तिनं अशोकला विचारलं, "कोण रे ?"

अशोक हसला. "मुनशी-खेर इत्यादि छोट्या महात्म्यांपैकीं ते एक आहेत. मुंबई सरकारच्या मंत्रिमंडळांतला सगळ्यांत तरुण मंत्री असं वर्तमानपत्रांत त्याचं वर्णन करतात. काकांची फार मर्जी आहे त्याच्यावर. जवाहरलाल नेहरू म्हणजे गांधींनीं लाडावून ठेवलेला मुलगा म्हणतात ना, तशापैकींच काकांचं त्याच्या बाबतींतलं वर्तन आहे. महात्माजी अरे प्रभाकर अशा एकेरी नांवानं त्याच्याशीं बोलतात याचा काकांना मोठा अभिमान वाटतो. मी महात्माजींच्याहि पुढें जाऊन त्याला बंड्या म्हणतों. अतिशय हुशार आहे, आणखी त्याची देशभक्ति अगदीं प्रखर आहे यांत शंकाच नाहीं. पण तो अन् मी लहानपणापासून एकत्र खेळलोंसवरलों आहोंत, तेव्हां सगळ्यांनींच देशभक्त

देशभक्त म्हणून डोक्यावर घेतल्यामुळें त्याचं डोकं बिघडायचा संभव आहे त्यावर उतारा म्हणून मी त्याची महात्मा बंडोपंत म्हणून चेष्टा करतों कधीं कधीं. ए उषाक्का, हें मात्र काकांना सांगायचं नाहीं हं."

"इश्श, मी कशाला रे बाबा सांगूं?" असं उषा म्हणाली तोंच आंतून अशोकची आई दिवाणखान्याच्या दारांत आलेली त्या दोघींना दिसली व मग त्यांनीं चटकन पुढें होऊन तिला वाकून नमस्कार केला.

मग न्हाणीघरांत तोंड धुतां धुतां प्रभाकराबद्दल अशोकनं जें सांगितलं तें श्यामाच्या मनांत घोळत होतं व त्याची व आपली प्रत्यक्ष अशी भेट कधीं झाली नव्हती तरी त्याच्याविषयींची थोडी फार माहिती काकांच्या घरांतल्या माणसांच्या बोलण्यावरून आपल्याला झाली होती हें तिला आठवलं.

... या प्रभाकरचं आडनांव गोखले होतं नाहीं का? रेल्वे कॉन्ट्रॅक्टरचा धंदा करून ज्यांनीं खूपच पैसा केला होता त्या गोखल्यांचा हा मुलगा. अशोकपेक्षां सातआठ वर्षांनीं वडील होता कायसा. काकांनीं अशोकला आश्रमांत ठेवलं होतं त्या वेळेस तिथं यालाहि याच्या वडिलांनीं ठेवलं होतं ...

साबणाचा चांगला फेस काढून तो दोन्ही हातांवर अगदीं दंडांपर्यंत चोळतांना श्यामा आपल्या मनाशीं या आठवणी करीत होती.

... नंतर म्हणे हा प्रभाकर गोखले इंग्लंडमधली बी. ए.ची अन् बॅरिस्टरीची परीक्षा उत्तम प्रकारें पास होऊन परत यायला आणि गांधींच्या मिठाच्या सत्याग्रहाला सुरुवात व्हायला एकच गाठ

पडली, आणि धनिक बापाचा हा हुशार मुलगा त्या चळवळींत पडला. तेव्हांपासून गांधींचं अनुयायित्व हा एकच उद्योग त्यानं केला, तीन वेळां तुरुंगवास पतकरला, आणि गांधींची मर्जी संपादन केली. मुंबई इलाख्याच्या मांत्रिमंडळांत त्याला घेतलं असलं तर नवल नाहीं. सगळ्यांत तरुण मंत्री काय ?...बरोबर आहे...

तोंडावर खूपसं गरम पाणी मारून श्यामा टॉवेलनं तोंड पुशीत होती. पलीकडच्या खोलींत टेबलावर मांडल्या जाणाऱ्या कपबशांचा आणि प्लेटांचा आवाज तिला ऐकूं येत होता. न्हाणीघरांतल्या आरशापुढें उभं राहून ती आपल्या केसांवरून कंगवा फिरवूं लागली तोंच त्या खोलींतून उषाका ओरडली,

" ताई, आटपलं का नाहीं तुझं ? "

मग तिनं तिथें अधिक वेळ घालविला नाहीं.

ती एक दालन ओलांडून पुढच्या खोलींत आली तों खिडकी-पाशीं उभा राहिलेला अशोक तिला म्हणाला, " किती वेळ लावलास ग ? काका आत्तां इतक्यांत येतील."

" अय्या " असं म्हणून हातांतल्या छोट्या टर्किश टॉवेलनं तिनं आपल्या उजव्या कानाचं पाळं पुसलं.

अशोक म्हणाला, " अन् काका कांहीं एकटे येत नाहींत चहाला."

" मग ? "

" पाहुण्यांना घेऊन येताहेत."

" म्हणजे—"

" महात्मा प्रभाकर येताहेत त्यांच्याबरोबर. The youngest minister of the Congress Government. मीं त्याला

बंड्या म्हणतों याच्यावर जाऊं नकोस. एका फार मोठ्या माणसाशीं ओळख होणार आहे तुझी आतां. तेव्हां हुश्शार!"

श्यामा हसली व तिनं विचारलं, "इश्श! हुश्शार काय त्यांत? ते काय मला खाणार आहेत कीं काय?"

"खाणार नाहींत पण—"

"पण काय?"

"इकडे जवळ ये, तुझ्या कानांत सांगतों."

ती त्याच्याजवळ गेली.

पण त्यानं हसत हसत तिच्या कानांत कांहींसं सांगितल्याबरोबर ती एकदम दूर झाली व "चल" असं म्हणून तिनं हातांतल्या टॉवेलचा त्याला एक फटकारा मारला.

टॉवेल पकडून ठेवून मोठ्यांदा हसून अशोक म्हणाला,

"पण त्यांत येवढं तुला राग येण्यासारखं काय आहे? काकांनीं असं कांहीं योजलं तर तें साहजिकच नव्हे का?"

यावर श्यामाला कांहीं उत्तर सुचेना. फक्त मान हालवून तिनं टॉवेल त्याच्या हातून ओढून घेतला. नुकतंच स्नान केल्यामुळें व तोंड स्नोनं पुसून काढल्यामुळें तिच्या तोंडावर आधींच घामाचे बारीक बारीक थेंब उभे राहिले होते. आतां मनाच्या बावरलेल्या स्थितीमुळें तिचा चेहरा घर्मबिंदूंनीं अधिकच डंवरल्यासारखा झाला, व तिच्या मुद्रेवर एकदम लालसर छटा पसरली!

तिच्याकडे पाहतां पाहतां अशोक मनाशीं म्हणाला,

"चित्र आहे नुसतं. प्रभाकरच्या भाग्याची परीक्षा आहे."

तितक्यांत जिन्यांत पावलांचे आवाज झाले आणि दुसऱ्याच क्षणीं डॉक्टरकाकांनीं प्रभाकरबरोबर खोलींत पाऊल टाकलं.

एरवीं श्यामानं सरळ निर्भयपणें प्रभाकरकडे नजर फिरविली असती. परंतु अशोकनं जें सांगितलं तें मनांत असल्यामुळें तिच्या नजरेंत संकोच उत्पन्न झाला होता. या संकोचाची जाणीव तिची तिलाहि झाली व मनांतल्या मनांत त्याचा चमत्कार वाटून तिला हसूं देखील आलं.

" अक्का, ताई, या ग. बसा अशा." असं जेव्हां तिचे काका म्हणाले तेव्हां क्षणभर उत्पन्न झालेल्या संकोचाचा ताण संपल्या-सारखं तिला वाटलं व ती मग मोकळेपणानं हसत पुढें झाली.

# ४

“ “अशी अगदीं गप्प कां राहिली आहेस ?”

“ कुठे ? तूं बोलत नाहींस म्हणून मी बोललें नाहीं इतकंच.”

“ अक्का पुण्याला गेली म्हणून तुला अवघड वाटतंय् ?”

“ जरासं.”

“ आम्हीं आग्रह करून तुला ठेवून घेतलं म्हणून रागावली नाहींस ना ?”

“ इश्श, मी तर चांदणीहून येतांना मनाशीं ठरवूनच आलें पुष्कळ दिवस इकडे राह्यचं म्हणून. तुमचा आग्रह खरं म्हणजे उगीचंच चालला होता.”

“ असं होय ? शाऽब्बास !” असं उद्गारून अशोक हसला, अन् चौकांतल्या पोलिसाला वळसा घालण्यासाठीं हातांतलं चाक फिरवितांना झटकन डाव्या हाताशीं बसलेल्या श्यामाकडे कटाक्ष

टाकून तो म्हणाला, "बरीच आहेस कीं! ठीक आहे, आम्ही एकदां फसलों, पुन्हा नाहीं फसणार!"

"बरं, पाहूं...." गाडी एकदम वळल्यामुळें झुकलेलं अंग सावरतांना आलेलं हसूं आवरीत श्यामा म्हणाली.

दिवाळीची सुटी संपल्यावर शाळा सुरू होण्याच्या तारखेला पुण्यास परत जाणं उषाला भाग होतं. तिला दादर स्टेशनवर गाडींत बसवून देऊन हीं दोघं घरीं परत निघालीं होतीं.

मग कांहीं वेळ कोणीच कांहीं बोललं नाहीं. मोटर हाकण्याचा ज्याला षोक आहे असा मनुष्य गाडी अगदीं कानांत सांगितल्या-प्रमाणें धावत असली कीं ज्या खुषींत असतो त्या खुषींत अशोक होतासं दिसलं. कुठलं तरी एक लष्करी थाटाचं इंग्रजी गाणं त्याला आठवलं त्याची तो शीळ घालूं लागला, परंतु वरचे सूर त्याला काढतां येईनात तेव्हां त्यानं शीळ थांबवली. डाव्या अंगानं येणाऱ्या वाऱ्याच्या झोतानं केस उडत होते म्हणून श्यामानं आपला डावा तळहात कानशिलापाशीं दाबून धरला होता व पुढच्या काचेंतून कांहींशा शून्य दृष्टीनं ती पाहत राहिली होती. मधेंच तिचं लक्ष जरा वरच्या बाजूच्या छोट्या आरशाकडे जाई तेव्हां वेगानं मागं पडणाऱ्या रस्त्याचं प्रतिबिंब त्यांत तिला दिसे.

मग एकदम अशोकनं तिच्याकडे न पाहतांच कांहींसं म्हटलं. तिचं लक्ष नसल्यामुळें तिला तें नीटसं ऐकूं आलं नाहीं, म्हणून त्याच्याकडे पुरती मान वळवून तिनं विचारलं, "अं, काय म्हणालास?"

"उषाक्काबद्दल विचारीत होतों तुला."

"काय?"

"गेल्या पांच सात दिवसांत ती जरा मनांतल्या मनांत नाराज

असावी अशी मला शंका आहे. ती आपल्यांत मिसळत होती, हसतखेळत होती खरं, परंतु पुष्कळ वेळा तिचा चेहरा एकदम गंभीर होई. अन् जणूं मनानं ती आपल्यांतून एकदम उठून गेल्यासारखी ती मला दिसूं लागे."

"तिची वृत्तीच माझ्याहून थोडी निराळी आहे, तुला माहीतच आहे."

"नाहीं. नुसत्या वृत्तीचा भाग नव्हता तो. तिच्या मनाला लागण्यासारखं कांहीं तरी झालं असलं पाहिजे. आमच्याकडून तर काहीं चुकलं नाहीं ना? थट्टेच्या भरांत मीं एखादे वेळीं तिला लागण्यासारखं कांहीं बोललों तर नाहीं ना? मला कधीं कधीं भान राहत नाहीं म्हणून विचारतों."

"छे. कांहीं तरीच तुझी शंका." श्यामा त्याच्या नजरेला नजर देऊन किंचित् हसून म्हणाली "येवढंसं कुठें टोचलं कीं त्याचा मनाला त्रास करून घेण्याचा अक्काचा स्वभावच आहे, पाहून ठेवलं आहे मीं."

"पण येवढंसं म्हणजे तरी काय टोचलं?"

श्यामा त्याच्याकडे पाहून हसली व मान हालवीत म्हणाली, "कांहीं तरी आहे झालं."

"म्हणजे काय? सांग तरी मला."

"अरे तिचा वसंत आहे ना—"

"हं."

"त्यानं वाटतं तिला कबूल केलं होतं दिवाळींत इकडे आपल्याकडे यायचं. पण आयत्या वेळेस त्यानं पत्र पाठवलंन् येत नाहीं म्हणून. या गोष्टीचं अक्कानं फार वाईट वाटून घेतलं. मीं तिची पुष्कळ समजूत घातली कीं त्याची अडचण खरी असेल, तो मुद्दाम

येणार नाहीं असं कसं होईल ? पण तिचं आपलं सारखं म्हणणं, वसंतानं अडचणींची सबब सांगावी याचा एकच अर्थ असा, कीं तो न आल्यानं तिला किती दुःख होईल याचा विचार त्याला महत्त्वाचा वाटला नाहीं. तिचं हें म्हणणं मला पटेना. पण शेवटीं जेव्हां तिनं एक विचित्र अस्त्र माझ्यावर सोडलंन् तेव्हां तिची समजूत घालायचा नाद मला सोडूनच द्यावा लागला. कारण तिच्या त्या बोलण्यावर मीं उत्तर काय देणार ?"

अशोकनं उत्सुकतेनं विचारलं, "काय म्हणाली तुला ती ?"

"ज्याच्यावर आपलं प्रेम आहे त्यानं आपल्यापेक्षां दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचं अधिक महत्त्व मानलेलं स्त्रीला सहन होत नाहीं. तिऱ्हाईत दृष्टीनं ते महत्त्व खरोखर अधिक असतं हि. पण प्रेमांत सापडल्यावर हें दिसत नाहीं, अन् दिसलं तरी कांहीं केल्या पटत नाहीं. यावर मीं तिला म्हटलं कीं, मग प्रेम म्हणजे एक हट्टीपणाचाच प्रकार म्हणायचा. तेव्हां ती म्हणाली, तूं कुणाच्या तरी प्रेमांत सापडलीस म्हणजे मग कळेल तुला, त्याशिवाय नाहीं."

"मग तुला कळायचा कांहीं संभव उत्पन्न झाला आहे कीं नाहीं ?"

श्यामानं त्याच्या दृष्टीला दृष्टि लावली, भुवयांना आठी घातली आणि आपल्या उजव्या कोपरानं त्याची बरगडी दाबल्यासारखं करून ती म्हणाली, "झाला का तुझा चावटपणा सुरू !"

"बरं राहिलं." असं म्हणून एखाद्या नाटकांतल्या विनोदी पात्राप्रमाणें अशोकनं अभिनय केला, व मग सरळ रस्त्याकडे दृष्टि लावून मध्यंतरीं मंदावलेला गाडीचा वेग त्यानं वाढविला.

ज्या तऱ्हेनं 'झाला का तुझा चावटपणा सुरू' हे शब्द श्यामानं

उच्चारले होते त्या तऱ्हेवरून त्याला जें समजून घ्यायचं होतं तें त्याला समजलं होतं.

श्यामाच्या मनांत प्रभाकरविषयीं विशेष नाजुक भावना अद्यापि उत्पन्न झाली नसावी हा त्याचा तर्क बरोबर होता...

अशोकला कोपरानं ढोसून त्याचा प्रश्न श्यामानं उडवून लावला खरा, परंतु तो प्रश्न तिच्या स्वतःच्या मनांत जरासा रेंगाळत राहिला, आणि समोरच्या रस्त्याच्या उन्हांत चकाकणाऱ्या काळ्या गुळगुळीत सपाटीकडे नजर लावून ती स्वस्थ बसली तेव्हां ती प्रभाकरबद्दलच विचार करूं लागली. गेल्या वीस बावीस दिवसांत त्याचा जो थोडा सहवास तिला घडला होता त्याचा तिच्या मनावर काय बरं परिणाम झाला होता ?—

तिचं तिलाच नीटसं सांगतां आलं नसतं.

तो वर्णानं गोरापान होता, आणि त्याचे नाकडोळे जरी मोठे मोहक नसले तरी साधारण रेखीव होते. त्याच्याकडे जेव्हां जेव्हां थोडंसं निरखून तिनं पाहिलं होतं तेव्हां तेव्हां लेखकाच्या अवलोकनशील वृत्तीनं ती मनाशीं म्हणाली होती, यांचे वडील रत्नागिरीहून येऊन आपल्या कर्तबगारीवर श्रीमंत झाल्याचं मला कुणी सांगितलं नसतं तरी मीं ओळखलं असतं. अस्सल कोकणी वर्णकांति अन् हुशारी आपल्या पित्याकडून प्रभाकरनं वंशगुणानं घेतली होती ती त्याच्या चर्येवर स्पष्ट दिसल्यासारखी श्यामाला प्रत्येक वेळीं वाटली होती. परंतु यापलीकडे त्याच्या सौंदर्याचा विचार तिच्या मनांत कधीं आला नव्हता. त्याची देशहिताची कळकळ उघडच होती. परंतु ज्या मताचा तो अभिमानी व अनुयायी होता त्यावर लुब्ध होण्यासारखी तिची स्वतःची वृत्ति नव्हती. त्याच्या स्वभावांतलं सौजन्य त्याच्या बोलण्या-

चालण्यांत पदोपदीं व्यक्त होत असे. परंतु एक तर त्या सौजन्यां-तले कांहीं प्रकार तिला कृत्रिम वाटत, आणि शिवाय तिच्या-सारख्या तरुण मुलीला ज्याचा मोह चटकन पडतो असं विलोभन त्यांत नसे. उदाहरणार्थ, अगदीं परमेश्वरापुढें हात जोडल्याप्रमाणें हात जोडून व मस्तक नम्र करून ज्याला त्याला नमस्कार करण्याची व हसण्याची जी कॉंग्रेसछापाची पद्धति प्रभाकरनं अंगीकारलेली तिला दिसली ती वारंवार पाहिल्यावर तिला आवडेनाशी झाली होती. त्यानं कुणाला तसा नमस्कार केला कीं तिचा मनांत येई "ही इतकी नम्रता खरी अंतःकरणापासूनची, कीं लोकांना एकदम वश करण्यासाठीं घातलेला हा मुखवटा ?" आणि वारंवार गाठी-भेटी आणि बोलणीं चालणीं झाल्यावरहि त्यानं अजूनहि 'आपण येतां ?' 'आपण घेतां ?' अशा प्रकारें तिच्याशीं बोलावं हेंहि तिला जरा चमत्कारिक वाटलं होतं...

सारांश, प्रभाकरचं सौजन्य, त्याची हुशारी, त्याचा निगर्वीपणा आणि त्याची देशभक्ति या गुणांनीं तो जरी तिला आवडला होता तरी त्याच्याविषयींची अनुरक्ति तिच्या मनांत उत्पन्न झाली नव्हती.

किंबहुना तिला वाटूं लागलं होतं, कीं प्रभाकरचं ज्या कुणा मुलीशीं लग्न व्हायचं असेल तिच्याशीं कांहीं झालं तरी तें एकंदरींत जुन्या थाटानंच होणार. आईबापांनीं मुलगी पाहिली, पसंत केली, लग्न झालं––या प्रकाराची उगीच थोडीशी सुधारलेली आवृत्ति असणार ती. स्वतःच्या लाघवी प्रियाराधनानं प्रभाकर एखाद्या मुलीला प्रेमवेडी करील हें शक्य नाहीं....

आतां श्यामाच्या मनांत ही कल्पना यायला, व अशोकनं मान वळविल्यामुळे त्याची व तिची दृष्टादृष्ट व्हायला एकच गाठ पडली. तो हसला तें पाहून ती म्हणाली,

"कां ?"

"दुसऱ्याच्या मनांतले विचार ओळखण्याची विद्या एका साधूनं मला शिकवली आहे." तो आणखी हसला.

"होय का? कुठें भेटला हा साधू तुला?"

"त्याचं चित्र काढण्यासाठीं पंधरा दिवस पुढें बसवून ठेवला होता मीं त्याला."

"अस्सं. म्हणजे त्याला रोज रुपया आठ आणे दिले असशील त्यांत चित्र अन् विद्या दोन्ही काढून घेतलींस वाटतं?"

"हं." असं म्हणून तो गप्प झाला, व मग जरा वेळानं म्हणाला, "आमचा प्रभाकर अगदीं उत्कृष्ट देशसेवक असेल, पण प्रीतीचा खेळ खेळायला अगदीं नालाक आहे तो. काल रात्रींच त्याच्या घरीं तो अन् मी बोलत बसलों तेव्हां मीं त्याला काय म्हटलं सांगूं तुला?"

"हं?"

"रागवायची नाहींस ना?"

श्यामानं मान हालविली.

तो म्हणाला, "तो तुझी फार प्रशंसा करूं लागला तेव्हां मीं त्याला म्हटलं, हें बघ बंड्या, तुला जरी आमची श्यामाताई फार आवडली असली तरी तुझं अन् तिचं लग्न जमेल अशी कांहीं मला आशा नाहीं. कारण तुम्हा अस्सल गांधी-शिष्यांना प्रियाराधनाच्या भानगडी एक तर समजायच्या नाहींत, आणि समजल्या तरी साधायच्या नाहींत. अरे, चटकन् चुंबन घ्यायला अनुकूल क्षण आला तरी त्यांत हिंसा अन् अत्याचार घडला म्हणजे काय करायचं असा विचार करीत बसणार तुम्ही!"

तें ऐकून श्यामा मोठमोठ्यानं हसूं लागली, पण मग हसणं

आवरून ती त्याला म्हणाली, " तूं काय वाटेल तें बोलशील बाबा! मला नको सांगूस."

" खोटं आहे का माझं म्हणणं तूंच सांग. आमचा बंड्या पडला बडा गांधीभक्त. अन् आतां तर काय मंत्री. तुला नाटका-सिनेमाला न्यायची, बरोबर घेऊन इकडेतिकडे हिंडायची त्याला सोय नाहीं. कारण लोकांत लगेच चर्चा व्हायला लागेल, आणखी ती कुजबुज परात्परगुरूपर्यंत पोंचल्यावर ते काय म्हणतील याची बिचाऱ्याला धास्ती. देशभक्तीची ही पांढरी कफनी आणखी प्रियाराधन या दोन गोष्टी एकत्र व्हायच्या कशा? तुझं त्याच्यावर प्रेम जडलं तर दुसऱ्या कुणाला नाहीं इतका मला आनंद होईल. पण 'चान्स' फार थोडा दिसतो मला. काकांची बिचाऱ्यांची निराशा होणार."

" बरं बरं, तुला नाहीं विचारलं कुणी!" असं म्हणून श्यामानं त्याला गप्प केल खरं, परंतु त्याच्या बोलण्यांत जो सत्यांश होता तो तिला नाकबूल करतां येण्यासारखा नव्हता. प्रभाकरच्या गुणां-बद्दल तिला आदर वाटत होता. पण ज्याचा मोह पडेल व ज्याचं तिला एकान्तांत सुखदायक स्मरण होईल असं कांहीं त्याच्या बोलण्याचालण्यांत तिला कधीं दिसलं नव्हतं. कधीं रात्रीं अंथरुणा-वर पडल्यापडल्या विचार करतांना त्याची आठवण तिला झाली नव्हती.

उलट, ज्या तरुणानं त्या रात्रीं मिरजेच्या स्टेशनवर तिच्या हातीं शस्त्र दिलं तो तिच्या दृष्टीस जरी एकदांच पडला होता तरी गेल्या वीस बावीस दिवसांत त्याची आठवण तिला अनेकदां झाली होती...

ती इकडे डॉक्टरकाकांच्या घरीं आली तेव्हां प्रथम सात आठ

दिवस पूर्वरात्रीं, अन् मग तीन चार दिवस उत्तर रात्रीं चांदणं पडलेलं असे. मुंबईपासून दूर असलेल्या त्या उपनगरांत रात्रीची शांतता अगदीं एखाद्या खेड्यांतल्यासारखी असे. तिच्या खोलीच्या एका खिडकींतून दूरचा समुद्राकिनाऱ्याचा भाग दिसत असे. कितीदां तरी त्या खिडकीलगत कॉटवर बसून चांदण्यांतल्या देखाव्याकडे ती पाहत राही. लांबच लांब रांग धरून दाटीनं उभ्या राहिलेल्या उंच उंच नारळींच्या खोडांच्या झरोक्यांतून समुद्राचं पाणी चकाकलेलं दिसे, अन् वाऱ्याच्या झोताबरोबर नारळींच्या माथ्यांचे झुपके हालले कीं त्यांवर खालच्या जलपृष्ठावरच्या लाटांप्रमाणेंच चंद्रिकेच्या लाटा हालल्यासारखं वाटे. त्याकडे सारखी टक लावून ती बसली कीं तें स्तब्ध गंभीर वातावरण आपल्या अगदीं हृदयाला जाऊन भिडत आहे असं तिला वाटे. आणि आपल्या पित्याचे विचार तिच्या मनांत वावरूं लागत. सिनूकाकांनीं तिच्या स्वाधीन केलेल्या त्या लिखाणांतल्या हकीगती तिच्या चित्तांत उभ्या राहत...

आणि मग एकदम मिरजेस भेटलेल्या त्या तरुणाची तिला आठवण होई! ...

आपल्या वडिलांच्या विचारांतून त्याच्याबद्दलचा विचार कां उत्पन्न व्हावा तिला कळत नसे. पण तसं दर वेळीं होई खरं. अन् मग त्या दोन विचारांनीं परस्परांशीं हा निकटभाव कां जोडला असावा त्याची छाननी करण्याऐवजीं ती त्या रात्रीं मिरजेच्या स्टेशनवर घडलेल्या गोष्टीच आठवत राही. ...

'भ्यायचं कांहीं कारण नाहीं असं मला वाटतं. पण संकट आलं तरी तुम्हांला आपलं रक्षण करतां यावं यासाठीं हें ठेवा तुमच्याजवळ...'

हे शब्द आठवले कीं त्याचा आवाज तिला स्पष्ट ऐकूं येई. आणि मग त्या आवाजाची ती कौतुकानं नक्कल करी, ' हें ठेवा तुमच्याजवळ...'

आत्तां प्रभाकरबद्दल विचार करतां करतां या गोष्टी श्यामाच्या मनांत झरकन येऊन गेल्या, अन् तिला वाटलं जंबिया देणाऱ्या त्या तरुणाची गोष्ट अशोकला सांगावी. तिनं मान वर करून हाक मारली,

" ए अशोक!"

" काय ग ? " त्यानं विचारलं.

पण तेवढ्या क्षणार्धांत तिचा विचार बदलला. त्या तरुणाची हकीगत अशोकला सांगणं तिला उचित वाटेना. कदाचित् त्या हकीगतींत असामान्य असं त्याला कांहीं वाटणार नाहीं, अन् तसं झालं तर आपली भावना दुखावेल....पण मनाची ही चलबिचल चर्येवर दिसूं न देतां तिनं प्रश्न केला,

" माझं चित्र काढणार आहेस ना तूं ? केव्हां ?"

पण कांहीं उत्तर देण्याऐवजीं अशोकनं गाडीचा वेग एकदम आवरला व गाडी उभीदेखील राहिली. श्यामानं बाहेर पाहिलं तों बंगल्यापुढेंच आपण येऊन पोंचलों आहोंत असं तिला आढळून आलं. तिला जरा आश्चर्य वाटलं. मनांतल्या विचारापुढें अन् बोलण्यापुढें वाट किती सरत होती त्याचं भानच आपल्याला उरलं नव्हतं हें आतां तिच्या लक्षांत आलं. ती त्याबद्दल अशोकला कांहीं बोलणार तोंच डॉक्टरकाकांचा आवाज तिला ऐकूं आला.

" अक्काला जागा मिळाली ना ग चांगली ?..."

तिनं पाहिलं तों ते कुणाबरोबर तरी बाहेर निघाले होते. एखाद्या रोग्याला पाहायला जात असतील...

" हो. छान मिळाली जागा अक्काला." असं जरा उच्च आवाजांत उत्तर देऊन ती मोटारींतून खालीं उतरली, अन् बंगल्यांत शिरली.

  

त्या दिवशीं तिन्हीसांजा श्यामाला कंटाळल्यासारखं झालं.

अशोकबरोबर त्याच्या एका क्लबांत जायचं तिनं कबूल केलं होतं, परंतु त्याचाच कलकत्त्यास जाण्याचा एकाएकीं बेत झाला होता व त्याप्रमाणें तो रवानाहि झाला होता. कलकत्त्याच्या कोणा एका धनिक मारवाड्याच्या नव्या बंगल्यात भिंतींवर चित्रं काढण्याचं काम मिळवण्याची खटपट त्यानं गेले कित्येक दिवस चालवली होती; व त्यानं पाठवलेले नमुने पसंत पडल्यावरून मुलाखतीसाठीं ताबडतोब निघून येण्याची तार त्याला आली होती. सामानाची बांधाबांध करण्यात तिनं त्याला मदत केली होती, व ती करतांना भिंतींवर चित्रं काढण्याच्या कलेच्या तंत्राबद्दलची त्याची सारखी बडबड चाललेली तिनं ऐकली होती. कलकत्त्यास धाडलेल्या नमुन्यांच्या नकला त्यानं तिला दाखविल्या होत्या, व त्यांतल्या एकेका चित्रावर लहानसं व्याख्यानच तिला ऐकवलं होतं. त्यांतलं एक चित्र तिच्यापुढें धरून तिला तो म्हणाला होता,

" या चित्राला तूं नांव काय देशील ? "

तिनं बराच वेळ चित्र निरखून पाहून हसून म्हटलं होतं, "तूंच सांग बाबा."

तो म्हणाला होता, " या चित्रांत त्यागाची कल्पना मीं रंगविली आहे. यांत वैशिष्ट्य काय आहे तेवढंच सांगतों तुला. 'त्याग' म्हटला कीं चित्रकारांनीं त्याबद्दलचा एक संकेत ठरवून टाकला आहे. अगदीं झिजलेल्या शरीराची, खप्पड चेहऱ्याची, कमरेला फक्त लंगोटी लावून कुठें तरी अरण्यांत डोळे मिटून ध्यानस्थ बसलेली माणसाची आकृति काढायची म्हणजे झालं 'त्यागा'चं चित्र तयार! फार तर त्या मूर्तीच्या मुद्रेभोंवतीं तेजोवलय दाखविण्यासाठीं पिवळ्या पांढऱ्या रंगांचं मिश्रण करून एक वर्तुळ काढायचं! परंतु त्यागाची ही कल्पना आपल्या लोकांनीं टाकली पाहिजे असं मला वाटतं, अन् म्हणून या चित्रांत—"

अशोकची प्रत्येक चित्राबद्दलची अशी बडबड तिला जरी ऐकायला गोड वाटली होती, तरी त्याला पुनः पुन्हा घड्याळाची आठवण करून देणं तिला भाग पडलं होतं.

शेवटीं तिनं त्याला विचारलं होतं, " मी येऊं का स्टेशनवर तुला पोंचवायला ? "

पण वाटेंत त्याला तीनचार ठिकाणीं जायचं होतं म्हणून त्यानं 'नको' म्हटलं होतं.

तो गेल्यानंतर सिनूकाकांना व वहिनीला पत्रं लिहिण्यांत तिनं वेळ घालविला होता. पण आतां तिन्हीसांजा झाल्यावर मात्र तिला घड खोलींतहि बसून राहायची इच्छा नव्हती, आणि एकटंच थोडंसं बाहेर फिरून येण्याचा कल्पनाहि तिला नकोशी वाटत होती. तिला अगदीं करमेनासं झालं होतं.

डॉक्टरकाका एका पारशी पेशंटची तार आली म्हणून माथेरानला गेले होते; आणि काकू कांहीं घरगुती खरेदीसाठीं मोटार घेऊन दादरला गेल्या होत्या.

सबंध बंगल्यांत एकटं राहण्याची वेळ तिला आजच आली होती, आणि कांहीं वाचण्यासवरण्यांत वेळ घालवावा अशीहि तिच्या मनाला उत्सुकता वाटत नव्हती.

शेवटीं ती कंटाळून आपल्या खोलींतून पुढच्या दिवाणखान्यांत गेली. तिथल्या साऱ्या दिव्यांचीं बटनं तिनं पटापट दाबलीं. एकदम खूपच प्रकाश झाला तेव्हां तिला कांहींसं बरं वाटलं. तिनं रेडिओ चालू केला आणि संध्याकाळचीं इंग्रजी वर्तमानपत्रं टेबलावर पडलीं होतीं तीं उचलून हातीं घेऊन ती कोचावर बसली.

...जपान आणि चीन यांमधल्या युद्धाची धुमश्चक्री चालू होती... इटलीच्या स्पेनमधील मोहिमेला जोर चढत होता... कॉंग्रेस मंत्रिमंडळानं शेतकऱ्यांना व कामकऱ्यांना दिलेलीं आश्वासनं पाळावींत असा इशारा मजुरांच्या एका प्रचंड सभेत एका कामगारपुढाऱ्यानं दिला होता...क्रिकेटचे पंचरंगी सामने जवळ येत होते......मुंबईच्या चित्रपटगृहांत चालू असलेल्या चित्रपटांच्या जाहिरातींनीं पान दीडपान व्यापलं होतं...

तें पान ती उलटणार तोंच एका मोठ्या जाहिरातीनं तिचं लक्ष वेधलं.

कारण ती जाहिरात चित्रपटाची नव्हती.

एका सर्कसची होती !

**" हिंदुस्थानास दोनदां भेट देणारी एकच एक नामांकित जपानी सर्कस."**

जाड टाइपांतला तो पहिला मथळा पाहून श्यामानं आधीं कशीबशीं हातीं धरलेलीं वर्तमानपत्राचीं पानं नीट जुळवलीं, आणि ती त्या जाहिरातींतली प्रत्येक ओळ लक्षपूर्वक वाचूं लागली.

ती वाचून झाल्यावर ती चटकन् उठून आपल्या खोलींत गेली,

आणि सिनूकाकांनीं तिच्याजवळ दिलेल्या शेवटल्या भागांतलं एक विवक्षित पान तिनं काढून पाहिलं.

तिचा चेहरा एकदम प्रफुल्लित झाला.

तीच ही सर्कस असली पाहिजे अशी तिला खात्री वाटूं लागली.

सिनूकाकांनीं लिहिलेल्या हकीगतींतल्या त्या पानावरचा मजकूर ती पुन्हा वाचून पाहूं लागली,

"...आनंदरावाच्या देशभक्तीविषयीं आणि साहसाविषयीं लोकमान्य टिळकांची पक्की खात्री होती. पण साहेबाला दहशत घालण्याचे हे उद्योग त्यांना पटत नसत. तूं असल्या गोष्टी करूं नकोस असं त्यांनीं त्याला पुष्कळदां सांगितलं. पण तो तोंडाचा थोडासा फटकळ होता. तो त्यांना म्हणे, "तुम्ही मंडालेच्या तुरुंगांत इतकीं वर्षे काढून आलांत त्याचं काय फळ इंग्रजांकडून घेतां आलं तुम्हांला?" हें त्याचं बोलणं ऐकून टिळक फक्त सुपारीची भुकटी तोंडांत टाकीत आणि त्याची पाठ थोपटीत. म्हणजे शाबासकी देत कीं शांत हो म्हणत कुणास ठाऊक! आनंदरावनं आपल्या कल्पना सोडल्या नाहींत येवढं खरं. महायुद्ध संपलं, जर्मनांचा आणि दोस्तांचा तह झाला, आणि हिंदुस्थानाच्या वांट्याला काय आलं तर भोपळा. त्या वेळीं सारेच पुढारी चिडून गेले. आनंदराव पुन्हा पुण्यास जाऊन टिळकांना भेटला. पण टिळकांनीं त्याला पुन्हा सांगितलं कीं बाबा असल्या अत्याचारी मार्गांनीं देशभर चळवळ उठवतां यायची नाहीं. तो पुण्याहून परत चादणीला आला. पुढें ऑगस्ट महिन्यांत टिळकांचा अंत झाला. ज्याच्या शब्दाखातर आनंदराव आपल्या कल्पनांना पायबंद घालीत असे तो पुढारी गेला. पुढें इकडल्या हातगीकर इनामदारांच्या घरावर दरोडा पडला. त्यांत इनामदार मारले गेले.

झडत्या, पकडापकड सुरू झाली. तो दरोडा राजकीय असेल अगर त्याच्याशीं आनंदरावाचा संबंध असेल अशी मला कल्पनासुद्धां नव्हती. तो माझ्याकडे आला अन् म्हणाला, 'मी तुझा शेवटचा निरोप घ्यायला आलों आहे.' मी सरदूनच गेलों. त्याची हकीगत ऐकली. तो कायमचा परागंदा होणार या कल्पनेनं मीं सारखा रडत होतों. दसऱ्याच्या दिवशींच तो नाहीसा झाला. 'दि ग्रेट निपॉन सर्कस' नांवाची सर्कस मुंबईला आली होती तिच्यांत सामील होऊन तिच्याबरोबर हिंदुस्थानाबाहेर जातां येईल असा त्याचा बेत होता... "

श्यामानं वर्तमानपत्रांतल्या जाहिरातींतल्या मथळयाकडे पुन्हा नजर टाकली.

'दि ग्रेट निपॉन सर्कस'

होय, तीच ही सर्कस सतरा वर्षांनीं पुन्हा मुंबईस आली होती तर!

सिनूकाकांना लिहून ठेवलेलं पत्र श्यामानं पुन्हा बाहेर काढलं आणि त्यांत ताजा कलम लिहिला,

" काका,

एक विलक्षण बातमी मला आत्तांच कळली. 'दि ग्रेट निपॉन सर्कस' सध्यां मुंबईस आली आहे. तिच्याबरोबर आमचे दादा परत आले असतील काय? ... कुणास ठाऊक... पण निदान त्यांची कांहीं तरी बातमी काढतां येईलसं वाटतं. पाहूं या. मी तुम्हांला कळवीनच."

तिनं पत्र पुन्हा पाकिटांत घातलं आणि बाहेरच्या दिवाणखान्यांत येऊन रेडिओ ऐकतां ऐकतां ती विचार करूं लागली,

आतां डॉक्टर परत आले कीं त्यांना म्हणायचं सर्कसला जाऊं या. तूं लहान आहेस का ग आतां अशी ते चेष्टा करतील. करूं देत. या जपानी सर्कसबरोबर दादा हिंदुस्थानाबाहेर गेले हे डॉक्टर-काकांना माहीत असेल? नसावं. सिनूकाकांच्याखेरीज कुणालाहि माहीत नसलेलं असं तें रहस्य होतं. तेव्हां आपण डॉक्टरकाकांच्या जवळ हट्ट धरून सर्कसला जायचं, आणि—

आणि मग पुढें काय काय होतं पाहूं या.

तिच्या मनाची उदसीनता एकदम नाहींशी झाली आणि तिला वाटलं एकटंच बाहेर पडून जरा मोठ्या रस्त्यानं चक्कर मारून यावं कीं.

तितक्यांत कोपऱ्यांतला टेलिफोन वाजला म्हणून ती कोचा-वरून उठली आणि टेलिफोन तोंडाशीं धरून म्हणाली,

"हॅलो, मी श्यामा. कोण आहे?"

दुसऱ्या बाजूनं प्रभाकरचा आवाज येतांच ती किंचित् चमकली. तो विचारीत होता,

"अशोक आहे ना घरांत?"

"नाहीं. त्याला आज एकाएकीं कलकत्त्याला जावं लागलं. त्याला तिकडे चित्रांचं काम मिळायचं होतं ना?—"

"तें मिळालं होय?—वा छान."

"मिळालं नाहीं, पण ज्या अर्थी मुलाखतीला बोलावलं आहे त्या अर्थी—"

"मिळणारच! मला फार आनंद वाटतो. पण माझी थोडी निराशा झाली. एक कार्यक्रम योजला होता मीं मनाशीं, आणखी अशोकला अन् तुम्हांला बरोबर घेऊन जायची इच्छा होती माझी."

"अस्सं? अरेरे! काय, कार्यक्रम तरी काय होता?"

“ इथें एक जपानी सर्कस आली आहे—”

“ आं ? ” असा उद्गार तिनं इतक्या दचकलेल्या आवाजानं काढला, कीं तिचा तिलाच तो चमत्कारिक वाटला. तिची छाती धडधडत होती व तिकडून प्रभाकर काय बोलत होता तें तिला मोठ्या प्रयत्नानं ऐकावं लागत होतं. इतकी ती गोंधळली होती.

प्रभाकर सांगत होता, “ त्या सर्कसचा एका वाचनालयाच्या मदतीसाठीं आज रात्रीं खेळ आहे. माझ्या अध्यक्षतेखालीं. तेव्हां अशोकला अन् तुम्हांला—”

“ पण आतां अशोक तर इथें नाहीं.”

“ Bad luck. ( नशीब )... ”

प्रभाकरचा आवाज जरा रेंगाळला आणि आतां तो टेलिफोन अजीबात बंदच करणार अशी श्यामाला भीति वाटली. तिच्या मनांत आलं त्याला म्हणावं— परंतु तितक्यांत तिकडून तोच म्हणाला,

“ हॅलो. मी म्हणतों अशोक नसला तर नसला. तुम्ही येऊं शकणार नाहीं माझ्याबरोबर ? ”

“ मी होय ? अं....”

“ कांहीं हरकत दिसत नाहीं मला.”

“ नाहीं, तसं नाहीं, पण—”

“ सर्कस पाहायचा कंटाळा आहे होय ? ”

“ छे, छे—”

“ मग तुम्ही यायलाच पाहिजे तर. आठ वाजतां गाडी पाठवतों मी. अं ? ”

“ बरं, बरं.” असं अगदीं गोड आवाजांत म्हणून ती हसली.

त्या तिच्या ह्मणण्याचा प्रभाकर कोणता अर्थ समजला कोण जाणे. ज्या कल्पनेनं तिला हसूं आलं तीं त्याच्या लक्षांत येणं शक्यच नव्हतं.

तिच्या मनात आलं होतं, अशोकनं प्रभाकराला काल रात्रींच प्रियाराधनासाठीं कोणत्या गोष्टी कराव्या लागतात याबद्दल जें सांगितलं होतं त्याचा हा परिणाम होता कीं काय ? स्वतःचा स्वाभाविक मित्रेपणा टाकून आपल्याशीं एखाद्या हौशी, उत्सुक प्रियकराप्रमाणें वागण्याचं प्रभाकरनं आतां ठरविलं होतं ? आत्तां टेलिफोनवर बोलतांना तो नेहमींप्रमाणें 'आपण' 'आपण' म्हणाला नव्हता ! ...मग आतां रात्रीं भेटल्यावरहि—

परंतु स्त्रीसुलभ वृत्तीनं उद्भवलेले प्रियाराधनाच्या अपेक्षेचे हे विचार तिच्या मनांत थोडाच वेळ टिकले. ती मनाशीं जी गोष्ट सारखी घोकीत राहिली ती निराळीच होती.

सतरा वर्षांपूर्वी तिचे वडील ज्या सर्कशींत सामील होऊन नाहींसे झाले होते ती सर्कस ती रात्रीं पाहणार होती. त्याचा काय नेम ?... निदान तिच्या वडिलांची कांहीं तरी निश्चित बातमी तिला मिळेलहि ! ...

रात्रीं प्रभाकरची मोटार येण्याच्या सुमारास ती आरशासमोर उभी राहून पोशाख करीत होती त्या वेळीं एखाद्या साहसाला निघाल्याप्रमाणें तिला विलक्षण अधीरपणा वाटत होता !

प्र. ५ ]



आपल्या मनांतला बेत छपवून दुसऱ्याला ठकविणं किती अवघड असतं त्याचा श्यामाला आज वरचेवर प्रत्यय येत होता.

सकाळीं चहाच्या वेळीं "मला गाडी मिळेल का? मुंबईत जाऊन यायचं आहे मला" असं तिनं डॉक्टरकाकांना विचारल्यावर त्यांनीं जेव्हां "घेऊन जा कीं" असं उत्तर दिलं तेव्हां तिला वाटलं होतं, किती सहज झालं आपलं काम, डॉक्टरना विचारतांना आपली छाती उगीचंच धडधडत होती.

जरा थांबून तिनं प्रश्न केला होता, "मला जरा वेळ लागला तरी चालेल ना?"

डॉक्टरनीं म्हटलं होतं, "खुशाल वाटेल तितका वेळ ने गाडी. मला आज कुठें व्हिजिटला जायचंच नाहीं."

त्यामुळें तर अगदीं पूर्ण निष्काळजी झाल्यासारखं तिला वाटलं होतं.

पण आपल्याला गाडी कशी अगदीं सहजासहजीं मिळाली अशा

विचारानं ती आनंदित झाली न झाली तोंच खुर्चीवरून उठून हात पुसतां पुसतां डॉक्टरनीं विचारलं होतं,

" काय, आज कुठल्या मोहिमेवर जाणार आहेस ? "

आणि मग चर्येवर यत्किंचित् चलबिचल दिसूं न देतां पहिलं खोटं उत्तर तिला देणं भाग पडलं होतं,

" कोऑपरेटिव्ह स्टोअर्समधें थोडी खरेदी करायची आहे मला. अन् तिथून जाणार आहें एक दोन मैत्रिणींकडे."

कोण मैत्रिणी म्हणून आतां काका खचित विचारतील अशा हिशोबानं श्यामानं चटकन दोन नांवं आठवलीं होतीं, व त्या नावांच्या मैत्रिणींपैकीं एकीचं लग्न होऊन ती आजघटकेला सोलापूरला होती व दुसरीचा तर तिला स्वतःला बिलकुल पत्ता नव्हता या विचारानं तिला मनांतल्या मनांत हसूं लोटलं होतं. तिनं तीं दोन्ही नांवं चापून सांगितलींहि असतीं. परंतु तशी वेळच आली नव्हती. तिला आणखी प्रश्न न करतां डॉक्टर दाराकडे वळले होते, गाडी दिल्याबद्दल उघडपणें व अधिक खोटं बोलण्याच्या पापापासून वांचविल्याबद्दल मनांतल्या मनांत तिनं त्यांचे आभार मानले होते, व पोशाख करण्यासाठीं आपल्या खोलीकडे ती मोठ्या आनंदानं धावली होती.

पण सुमारें अर्ध्या तासानं आपला जामानिमा आटपून ती जेव्हां रस्त्यावर तयार असलेल्या गाडीपाशीं आली तेव्हां शोफर म्हणाला " मालक येणार आहेत ", आणि तें ऐकतांच तिनं त्रासून मनाशीं म्हटलं, आतां आली का पंचाईत. कारण ज्या कामाला ती निघाली होती तें कोणासहि कळूं देण्याची तिची इच्छा नव्हती. तिच्या मनांत विचार आला, आपण उगीच हा घोटाळा करून बसलों. आपल्याला आगगाडीनं जातां आलं

असतं. आतां मात्र गाडी नको असंहि म्हणतां येणार नाहीं आणि डॉक्टरकाकांना टाळतांहि येणार नाहीं. आतां कसं करायचं ?...

तितक्यांत डॉक्टर आले. तिला बसायला सांगून ते स्वतः बसले आणि मोटार चालू झाली तेव्हां त्यांनीं खुलासा केला,

" मी आज जाणार नव्हतों कुठेंच, पण डॉक्टर पेंडशांचा आत्तांच टेलिफोन आला. त्यांच्याकडे एक केस आली आहे ती त्यांना स्वतःला अवघड वाटते, तेव्हां माझा सल्ला त्यांना हवा आहे."

" होय का ? " अगदीं आनंदल्याचा आविर्भाव करून श्यामा म्हणाली, " बरं झालं कीं, अर्ध्या वाटभर तरी तुमची सोबत झाली मला."

मनांतल्या मनांत मात्र ती जरा चिंताग्रस्त झाली आणि त्यामुळें वाटेनं ती कांहीं त्यांच्याशीं फारसं बोलली नव्हती.

दवाखान्यापाशीं गाडी थांबली तेव्हां खालीं उतरून डॉक्टरनीं विचारलं, " जातेस तूं आतां ? का थांबतेस जरा वेळ ? थांबलीस तर मीहि येईन तुझ्याबरोबर को-ऑपरेटिव्ह स्टोअर्समधें—"

श्यामा मनांतल्या मनांत चिडली. तिला इतकंसुद्धां वाटलं कीं गाडी नको म्हणून त्यांना सांगून खालीं उतरावं, आणि बस मिळते का पाहावं; पण तितक्यांत तिला दुसरा एक विचार सुचला व ती म्हणाली,

" पण आधीं मीं आपल्या मैत्रिणींकडे जाईन म्हणतें, आणि तिथून मग वेळ राहिला तर—"

त्यामुळें साहजिकच डॉक्टर चटकन म्हणाले, " असं होय ? मग नको थांबूंस. जा तूं. किती वेळांत येशील परत गाडी घेऊन ? "

आली पुन्हा अडचण ! आतां मात्र श्यामाला अधिक लबाडी

करतां येईना व मनांतल्या मनांत त्रासून पण वरकांतीं हसत ती म्हणाली,

" मला वाटतं मीं बसमधनंच गेलेलं बरं. कारण समजा, मला वेळ लागला आणि तुम्हांला उगीचच इथें—"

ती खालीं उतरण्यासाठीं अर्धवट जागची हालली, पण डॉक्टर म्हणाले, " छे छे बसमधनं नको जाऊं. माझं काम आटपल्यावर दहा पंधरा मिनिटं तुझी वाट पाहीन. तोंपर्यंत आलीस तर ठीक नाहीं तर मला पेंडशांची गाडी मिळेल कीं."

" हो खरंच " एकदम हसून श्यामा म्हणाली, व गाडीपासून दूर होऊन दवाखान्याच्या इमारतींत शिरूं लागलेल्या काकांना तिनं ओरडून सांगितलं, " शक्य तितक्या लवकर मी येतेंच हं काका."

डॉक्टर तोंड वळवून म्हणाले, " नको, नको. माझ्यासाठीं तूं घाई करूं नकोस. सावकाश होऊं देत तुझीं सारीं कामं." आणि मग ते तिला दिसेनासे झाले.

गाडी चालूं झाली तेव्हां श्यामानं सुटकेचा निःश्वास टाकला, व ती स्वतःशीं म्हणाली, ठकबाजी करणं इतकं अवघड असतं अशी नव्हती कल्पना.

लगेच तिच्या मनांत विचार आला, एका राजकीय दरोड्याच्या संबंधांत पकडलं जाण्याचा संभव असतांना देशांतून नाहींसं होण्याच्या वेळीं आपल्या वडिलांना किती लोकांना कशा कशा प्रकारें ठकवावं लागलं असेल...आपल्या वडिलांचं तें कौशल्य आपल्या अंगीं थोडंसं तरी आहे म्हणायचं!...

मग गाडी शहराच्या कोणत्या भागांतून जात आहे याकडे तिचं लक्ष राहिलं नाहीं. ज्या कामासाठीं ती निघाली होती

त्याचेच विचार तिच्या मनांत येऊं लागले. कारण त्या कामाचा तिच्या वडिलांशींच संबंध होता. कोणाला संभवनीयसुद्धां वाटलं नसतं अशा एका स्थळीं ती चालली होती, व तें साहस ती एकाच आशेनं करीत होती कीं आपल्या वडिलांची कांहीं तरी बातमी आपण काढूं शकूं. त्या दिवशीं रात्रीं "दि ग्रेट निपॉन सर्कस"च्या खेळाला जावयास निघतांना साहसाच्या ज्या सूक्ष्म कल्पनेनं तिला हर्ष झाला होता तिचाच वाढत्या प्रमाणांत तिला या घटकेला अनुभव येत होता. दसऱ्याच्या दुसऱ्या दिवशीं ती चांदणीहून निघाली तेव्हां जर तिला कुणी सांगितलं असतं कीं आजपासून एका महिन्यानं तुझ्या वडिलांची बातमी मिळविण्याची शक्यता उत्पन्न होईल, तर तें सांगणं वेडेपणाचं वाटून ती हसली असती. पण आपण तेव्हां हसलों असतों या विचारानंच तिला या क्षणीं हसूं आलं. कारण पूर्वी जें अद्भुत व असंभवनीय वाटलं असतं तें आज प्रत्यक्ष घडत होतं. "दि ग्रेट निपॉन सर्कस"चे मॅनेजर "के. योशिदा" यांच्या भेटीला ती निघाली होती. आणि कुठें?...तिनं आपल्या बॅगमधून एक छोटासा कागद काढून त्यावर टिपलेला इंग्रजी पत्ता पुन्हा एकदा वाचला..."खोली नंबर ८, योकोहामा हॉटेल, कुलाबा. ('रीगल' सिनेमा पासून ट्रॅमलाइननं गेलं कीं पांच मिनिटांच्या अंतरावर उजव्या हाताला)." आणि मग त्या कागदाची घडी चिमटींत तशीच धरून ठेवून ती स्वस्थ बसली. आपण प्रभाकरबरोबर सर्कसला कशा गेलों, मॅनेजर के. योशिदा यांच्याशीं आपली ओळख कशी झाली, त्यांच्याशीं बोलण्याची संधि मिळतांच आपण संभाषण कसं युक्तीनं हवं त्या वळणानं नेलं, इत्यादि गोष्टींची आठवण तिचं मन करूं लागलं...

बॉक्समधल्या खुर्चीवर ती प्रभाकरजवळ बसली तेव्हां त्याला नमस्कार करणाऱ्या लोकांनीं तिच्याकडे दृष्टिक्षेप टाकीत आपआपसांत कुजबुज केली ती तिच्या नजरेंतून सुटली नव्हती. पण त्यामुळें तिला लाजल्यासारखंहि झालं नव्हतं, किंवा अहंकारजन्य सुखहि झालं नव्हतं. लोकांच्या त्या नेत्रपल्लवीचा प्रभाकरच्या चर्येवर परिणाम काय दिसतो तें पाह्यचं तिच्या मनांत एरव्हीं आलं असतं. पण त्या दिवशीं तसंहि झालं नव्हतं. कारण तिचं सारं चित्त फार निराळ्या प्रकारें गुंतलं होतं. ती सर्कसला आली होती ती एका विशिष्ट हेतूनं आली होती. तो कसा साध्य होणार याची तिला कांहींच कल्पना नव्हती. परंतु त्यामुळेंच दचकून अगदीं सावधपणें पाहणाऱ्या माणसासारखी तिची नजर झाली होती, व ती सर्वस्वीं खिळली होती रंगणांत येणाऱ्या व्यक्तींवर आणि काळे सूट घालून इकडे तिकडे वावरणाऱ्या सर्कसच्या लोकांवर...

पण सुमारें एक तास होऊन गेला, प्रयोगांतले सहा प्रवेश संपले तरी ती ज्याचा सारखा शोध करीत होती तसा सूचक प्रकार तिला दिसला नव्हता. मग ती निराशेनं चुळबुळ करूं लागली होती. प्रभाकरानं तिला विचारलं होतं,

" कंटाळा आला होय ? "

मान हालवून तिनं " नाहीं " म्हटलं होतं, पण तें करतांना तिनं त्याच्याकडे दृष्टि वळविली नव्हती.

तितक्यांत बँड थांबला होता. एकदम शान्त झाल्यामुळें तिला कससंच वाटलं होतं. वाचनालयाचे चिटणीस प्रभाकरच्या जवळ येऊन आदबीनं कायसं म्हणाले होते. आणि लगेच प्रभाकर उठून उभा राहिला होता, व लोकांकडे पाहून प्रथम स्मित करून बोलूं लागला होता. तो हिंदींत बोलेल अशी तिची कल्पना

नव्हती. त्यामुळें भाषण ऐकत असतां तिच्या तोंडावर हास्य खेळत होतं.

प्रभाकर नमस्कार करून खालीं बसल्याबरोबर चिटणिसांनीं किंचाळल्यासारखा आवाज काढून बोलायला प्रारंभ केला होता. लोक प्रथम मोठ्यांदा हसले होते, पण मग गप्प बसले होते. चिटणिसांनीं आभार मानून प्रभाकरच्या गळ्यांत हार घातला तेव्हां लोकांनीं टाळ्या वाजविल्या होत्या. त्यांनीं तिच्या हातीं एक गुच्छ दिला तेव्हां लांबून कोणसं ओरडलं होतं " हार नाहीं का हो त्यांना ? " आणि कांहीं लोक हसले होते.

तितक्यांत उंची रेशमी काळा सूट घातलेला एक ठेंगणासा जपानी मनुष्य जवळ आला होता. वाचनालयाचे चिटणीस पुटपुटले होते, " सर्कसचे मॅनेजर— के. योशिदा." प्रभाकर उठून उभा राहिला होता व मॅनेजरनं त्याच्याशीं हस्तांदोलन केलं होतं. मग अकस्मात् तिच्याकडे वळून त्यानं हात पुढें केला होता. ती गांगरली होती; पण क्षणभरच. तिनंहि आपला हात वर धरून स्मित केलं होतं. के. योशिदा हसून इंग्रजींत कायसं पुटपुटला होता. तुमच्या भेटीनं फार आनंद झाला असा तिनं त्याचा अर्थ केला होता.

त्याच वेळीं रंगीत कपडे घातलेली एक जपानी मुलगी धावत आली होती. तिच्या खांद्यावर एक सुंदर जपानी परडी होती. परडींत हार होते. त्यांतला एक घेऊन के. योशिदा प्रभाकरकडे वळला, व " To you Sir " असं म्हणून त्यानं तो त्याच्या गळ्यांत घातला होता. तोंपर्यंत त्या गुरोळीसारख्या गालांच्या मुलीनं परडींतून दुसरा हार काढला व ती श्यामाकडे हसत पाहत राहिली. त्या मुलीचे केस भारीच मोहक होते. श्यामाला वाटलं तिला

विचारावं असे केस कसे बांधायचे शिकवशील का मला. पण तितक्यांत योशिदानं दुसरा हार घेऊन तिच्यापुढें धरला होता, व "And now to Madam" असं हसत म्हणून तिच्या गळ्यांत घातला होता. मघांशी ओरडणारा माणूस "हां, आतां ठीक झालं कीं नाहीं बघा!" असं ओरडला होता, व त्यामुळें आजूबाजूस पुन्हा थोडा हशा पिकला होता. योशिदा काय आपल्याला प्रभाकरची पत्नी समजला आहे कीं काय अशा शंकेनं श्यामाला बरंच लाजल्यासारखं झालं होतं.

पुन्हा बँड सुरू झाला, चाबूक कडाडला, सहा सफेत घोडे माना तुकवीत धावत आले व रंगणांत फिरूं लागले तेव्हां लोक शान्त झाले होते, व श्यामाचा संभ्रम नाहींसा झाला होता. तिला वाटलं होतं, योशिदा आतां जाईल.

पण तो प्रभाकरला व तिला म्हणत होता, "आपण थोडं पेय घ्यायसाठीं माझ्या राहुटींत याल तर मला फार आनंद होईल."

"कांहीं हरकत नाहीं" असं म्हणून प्रभाकर निघाला होता.

ती दोन पावलं टाकून परतली तेव्हां त्याचं कारण ओळखून योशिदानं तिच्या खुर्चीवरचा लोकरीचा कोट तिच्या हातीं दिला होता. ती हसली होती.

मग तिच्याबरोबर चालतां चालतां रंगणांतल्या घोड्यांकडे बोट दाखवून तो तिला म्हणाला होता,

"हीं घोडीं नवीं आहेत. पण हें काम आमच्या सर्कशींत आज सतरा वर्षे होत आहे."

"किती?—सतरा वर्षे?" तिच्या मनांत एक कल्पना झर्रदिशीं येऊन गेली होती.

मग राहुटींत थंड पेय घेत असतां चिटणिसांचा निरोप आला म्हणून प्रभाकर बाहेर गेला तरी ती मुद्दामच जागची हालली नव्हती. ती योशिदाला म्हणाली होती,

" आपण किती दिवस आहांत या सर्कशींत ?"

" वीस वर्षं झालीं."

" इतकीं वर्षं मॅनेजरच ?"

" छे छे. प्रथम मी घोड्यांचीं काम घेत असे. त्या वेळीं मी अगदीं जवान होतों."

" होय ?" श्यामानं हसत विचारलं, " मागं ही सर्कस मुंबईला आली तेव्हां आपण होतां ?"

" तर ! आत्तां तिकडे रंगणांत घोडीं जें काम करताहेत तें मला इथेंच शिकायला मिळालं."

" कोणाकडून ?"

" असंच आपलं."

अधिक सांगण्याची त्याची इच्छा दिसली नाहीं.

श्यामा म्हणाली होती, " मला तुमची सवडीनं गाठ घ्यायची आहे."

" मोठा आनंद होईल मला. काय हुकूम ?"

" मी थोडंसं लेखन करीत असतें. एका मासिकासाठीं आपली मुलाखत द्याल ?"

" कां नाहीं ? अवश्य देईन."

" केव्हां ?"

तो म्हणाला होता, " उद्यांच म्हटलं असतं. पण मी जाणार आहे गांवाला. जळगांवाला माझा भाऊ आहे कापसाच्या व्यापारांत त्याच्याकडे. पांच सहा दिवसांनीं परत येईन. पण पुढच्या

शनिवारीं तुम्ही खेळाला या रात्रीं. इथें आपण वाटेल तितका वेळ बोलत बसूं शकूं ?"

"अं......इथें नको..."

"मग शनिवारीं सकाळीं माझ्या खोलीवर या. येऊं शकाल?"

ती क्षणभर घोटाळली होती. पण लगेच हसून तिनं म्हटलं होतं, "येईन. खोलीवर म्हणंजे कुठें ?"

त्यानं खिशांतून एक नोटबुक काढलं होतं व त्यांतल्या एका पानावर पेन्सिलीनं इंग्रजींत पत्ता लिहून दिला होता. "खोली नंबर ८, योकोहामा हॉटेल..."

  

'योकोहामा' हॉटेल, कुलाबा !...

आणि मोटारीचा वेग एकाएकीं मंदावल्यामुळें तिनं भानावर येऊन इकडे तिकडे पाहिलं तों तिला आढळून आलं कीं, पोलिसाच्या आडव्या हातामुळें मोटार रोखली गेली होती ती गिरगांवच्या चौकांत !

पोलिसाचा हात बदलला कीं गाडी सुरू करण्यासाठीं गिअरच्या दांड्यावर डावा हात ठेवून तयारींत असलेला ड्रायव्हर तिला विचारीत होता,

"गाडी सरळ गिरगांव रस्त्यानंच घेऊं ना ? कुठें जायचं आपल्याला ?"

इतका वेळ चिमटींत धरून ठेवलेली ती कागदाची घडी परत ठेवण्यासाठीं बॅगेच्या तोंडाचा चाप उघडीत श्यामा म्हणाली, " आधीं फोर्टमध्यें जायचं आहे. रीगल सिनेमा आहे ना, तिथून जवळच."

" असं ? मग बाहेरून मोठ्या रस्त्यानंच घेतों गाडी तर." असं ड्रायव्हर पुरतं म्हणतो न म्हणतो तोंच चौकांतल्या पोलिसानं हात बदलला, आणि गाडी पोलिसाला डावी घालून चौकांतून सुटली, व थोड्याच वेळांत क्वीन्स रोडवरून भर वेगानं जाऊं लागली.

चर्चगेट स्टेशनचा चौक जरा अंतरावर दिसूं लागला तेव्हां ड्रायव्हरनं विचारलं, " गाडी रीगल सिनेमापाशींच घ्यायची ? "

तो प्रश्न ऐकून एक नवीनच अडचण श्यामाच्या लक्षांत आली.

गाडी अगदीं थेट योकोहामा हॉटेलच्या दारापर्यंत न्यावी काय?..." हां हां, चल रीगल सिनेमापर्यंत. मग सांगतें मी. " असं ड्रायव्हरला उत्तर देऊन ती मनाशीं विचार करूं लागली. आपण आपल्या मैत्रिणीकडे जाणार आहोंत असं आपण डॉक्टरकाकांना सांगितलं तें या ड्रायव्हरनं ऐकलं आहे, आणि आतां कुलाबा रोडवर एका हॉटेलांत आपण गेलों हें पाहिल्यावर त्याला काय वाटेल ? गिरगांव-ठाकुरद्वार भागाऐवजीं कोटांतल्या या परदेशी वस्तींत राहणाऱ्या कुठल्या मैत्रिणी ताईनीं गाठल्या असं आश्चर्य त्याला खचित वाटेल. आणि तें त्यानं डॉक्टरकाकांपाशीं एक वेळ नाहीं पण काकूंजवळ अथवा अशोकजवळ बोलून दाखविलं म्हणजे ? तिच्यासारख्या मुलीनं एका जपानी हॉटेलांत कुणाच्या भेटीला जावं ही खरोखरच दिसण्यांत

मोठी चमत्कारिक गोष्ट होती, आणि अशी गोष्ट मोटार ड्रायव्हर स्वतःजवळ गुप्त ठेवील हें शक्यच नव्हतं. उलट ती दुसऱ्याजवळ सांगतांना तो तिला किती तिखटमीठ लावील, व कर्णोपकर्णी पसरतांना त्या हकीगतीला अखेर काय स्वरूप येईल त्याचा काय नेम होता.... ?

छे, आपण कुठें जातों तें या ड्रायव्हरला समजूं देतां कामा नये. समजा, आपण याला रीगल सिनेमाच्या थिएटरपाशीं उभं राहायला सांगितलं आणि आपण एकट्याच जाऊन आलों तर ?...

पण असं करणंहि बरं नव्हतं. एक तर हॉटेलच्या दारापाशीं खासगी मोटारींतून उतरतांना आपण दिसलों म्हणजे तिथल्या लोकांना आपलं जरा महत्त्व वाटेल अशी तिनं साहजिक कल्पना केली होती. डॉक्टरकाकांच्याजवळ गाडी मागण्याचं तिनं ठरविलं होतं तें मुख्यतः याच कारणासाठीं. आणि शिवाय आपली गाडी हॉटेलच्या दारापाशीं उभी आहे हें ठाऊक असलं, कीं आपल्याला जरा आधार वाटेल असं तिच्या मनांत आलं. योशिदाच्या भेटीसाठीं जाण्यांत धोका आहे असं तिला वाटत नव्हतं; तथापि मुंबई शहरांतल्या आपल्याला अगदीं अपरिचित अशा भागांत एका जपानी हॉटेलांत एका जपानी गृहस्थाला...चिनी व जपानी लोकांविषयीं, त्यांच्या वागणुकीविषयीं, आणि स्वभावधर्माविषयीं जराशा चमत्कारिकच कल्पना इंग्रजींतल्या गुप्त गुन्ह्यांच्या कादंबऱ्या वाचून आणि गूढ कारस्थानांचे अमेरिकन चित्रपट पाहून पुष्कळ लोकांच्या मनांत उत्पन्न होतात तशा श्यामाच्याहि मनांत खोल कुठें तरी होत्या. त्यामुळें तिला प्रत्यक्ष भय जरी वाटत नव्हतं तरी भयासारखंच कांहीं तरी वाटत होतं खरं....

तिनं निश्चय केला कीं गाडी अगदीं थेट हॉटेलपाशीं न्यायची.

ड्रायव्हरला कळलं तरी हरकत नाहीं. त्याचे परिणाम कसे टाळायचे तें पुढें पाहतां येईल.

तेवढ्यांत गाडी थिएटरपाशीं आली होती व ड्रायव्हर तिला विचारीत होता, "आतां कुठें घ्यायची गाडी?"

तिनं चटकन् हॉटेलचं नांव सांगितलं, व "कोणतं हॉटेल?" असं जेव्हां ड्रायव्हरनं पुन्हा विचारलं तेव्हां ती त्याला म्हणाली, "अशी या ट्रॅमलाइननं घे गाडी. अगदीं सावकाश जाऊं दे. मी पाटी दिसते का पाहतें. उजव्या हाताला आहे तें हॉटेल."

त्याप्रमाणें ड्रायव्हरनं गाडी आस्ते आस्ते चालू केली, व श्यामा बाहेर तोंड काढून इमारतींवरच्या पाट्या निरखून पाहूं लागली. "मॅजेस्टिक हॉटेल"...कसलंसं "स्टोअर्स"...कसलासा "मार्ट" ..."पर्शिअन कार्पेट्स"...

आणि मग ती एकदम म्हणाली,

"योकोहामा हॉटेल! तें बघ. ती मोठी पिवळी मोटार दाराशीं उभी आहे ना? हं. तेंच."

ड्रायव्हर मोटार वळवून हॉटेलच्या दाराशीं घेत होता तेव्हां तिचं हृदय धडधडत होतं. भीतिनं नव्हे. आतां काय घडणार कोण जाणे या विचारानं. तिला वाटलं आपला हा घाबरटपणा आणखी वाढला म्हणजे कसं करायचं?

परंतु गाडींतून उतरून हॉटेलच्या पायऱ्या चढून तिनं आंत पाऊल टाकतांच एका नोकरानं जेव्हां आदबीनं जवळ येऊन सलाम करीत विचारलं, "योशिदांच्या भेटीला...?" तेव्हां तिला जरा धीर आला. आणि तिनं मानेनं हूं म्हणतांच तो परिचारक पुढें झाला, व या माझ्या मागोमाग असं त्यानं आपली मान झुकवून खुणावलं तेव्हां तर तिच्या मनाचा घाबरटपणा पार

नाहींसा झाला. उंची जाड सतरंजीनं मढविलेल्या जिन्याच्या पायऱ्या चढतांना ती स्वतःशीं हसत होती.

तिनं पाहिलं तों त्या जागेंत पाऊल टाकणाराला एकदम खास जपानमधल्या एखाद्या स्थळीं आल्यासारखं वाटावं असं तिथलं सारं वातावरण होतं. परिचारक जपानी होते, सजावट सामान जपानी होतं, कुंड्यांतलीं झाडं तिनं पूर्वी कधीं न पाहिलेलीं अशीं तिला वाटलीं, विजेच्या दिव्यांवरचीं ढापणं, भिंतींवरचीं चित्रं-- सारा थाट जपानी होता. तळमजल्यावर दूर कुठें तरी मुदपाकखाना असेल तिथें तयार होणाऱ्या पदार्थांचा अंधुक वास बाहेरपर्यंत येत होता, तोदेखील युरोपियन हॉटेलांत येतो तसला नव्हता. कांहीं निराळाच ...

आणि थोड्याच अवधींत तिनं जेव्हां योशिदाच्या खोलींत पाय ठेवला तेव्हां तर तिला वाटलं, आपण मुंबई शहरांत आहोंत? छे छे! कुठल्या तरी जपानी...

योशिदानं तिच्याशीं हस्तांदोलन करीत म्हटलं, "हॉटेल शोधावं लागलं नाहीं ना फार?"

"नाहीं."

त्यानं तिला एका प्रशस्त कोचावर बसण्याची खूण केली, व ती बसली तेव्हां तिला पाय टेकण्यासाठीं एक छोटंसं स्टूल त्यानं झटकन् पुढं केलं. तें स्टूल किनखापानं मढविलेलं होतं व त्यावर भरतकाम करून सुंदर जपानी देखावा काढलेला होता.

उजव्या बाजूच्या एका टेबलाशीं जाऊन त्यानं उघडलेलीं पत्रं जुळवून ठेवलीं, व न उघडलेलीं कोणाकोणाचीं असावींत तें पाहिल्यासारखं करून परत ठेवलीं. मग तो तिच्यासमोर खुर्चीवर बसला, तेव्हां श्यामानं विचारलं.

" माझ्या येण्यानं तुमच्या कामांत व्यत्यय तर... ? "

" छे छे ! बिलकुल नाहीं. तुम्ही आल्यानं फार आनंद झालाय मला." तो हसत म्हणाला.

त्याला इंग्रजी चुकत माकतच येत होतं अन् त्याचे उच्चार तर फार गमतीचे होते हें त्या दिवशीं रात्रीं पहिल्या ओळखीच्या वेळींच तिच्या ध्यानांत आलं होतं. त्या रात्रीं दिसला त्याहून तो आज जरा निराळा दिसत आहेसं तिला वाटलं. दिव्याच्या झगझगाटांत त्याच्या चर्येवरची पोक्तपणाची छटा तेव्हां छपली असावी. आज त्यानं चदामी रंगाच्या रेशमी कापडाची विजार अन् जाकीट घातलं होतं, अन् तसल्याच रंगाचा पण तलम शर्ट त्याच्या अंगांत होता. खोलीच्या साऱ्या खिडक्यांवर पडदे रुळत असल्या-मुळें सूर्यप्रकाश मंद व मृदु होऊन पसरल्यासारखा वाटत होता, व त्या प्रकाशांत योशिदाची शरीरकान्ति ज्या वर्णाची दिसत होती त्याचं कसं वर्णन करावं असा विचार श्यामा मनाशीं करूं लागली...

तितक्यांत त्यानं विचारलं, " त्या दिवशीं आमचा प्रयोग तुम्हांला आवडला का ? "

" अतिशय." ती हसत म्हणाली, " तुमचा मुक्काम चांगला चाललेला दिसतो."

" होय. आमची सर्कस मागं मुंबईला आली तेव्हां खूप पैसे मिळाले. याहि वेळीं खूप मिळतीलसं दिसतं."

" तुमची ही सर्कस फार जुनी आहे ना ? "

" फार ! "

" तुम्ही केव्हां शिरलात या सर्कशींत ? "

" मला वाटतं मी अठरा वर्षांचा होतों तेव्हां." असं सांगून तो हसला व म्हणाला, " म्हणजे माझी मुलाखत सुरू देखील केलीत कीं काय तुम्ही ? "

श्यामा हसली. " हो, तसं म्हणायला कांहीं हरकत नाहीं."

तो मनःपूर्वक हसला व म्हणाला, " ठीक ठीक. विचारा तुमचे प्रश्न."

मग तिच्या प्रश्नांना उत्तरं देतां देतां त्यानं पुष्कळच हकीगत सांगितली.

तो हायस्कुलांत शिकत असतांना घरून पळाला होता व या सर्कशींत दाखल झाला होता. आतां त्यानं नशीब काढलं तेव्हां आईबाप व नातलग त्याला मानूं लागले होते; पण त्या वेळीं घराण्याच्या नांवाला काळं फासलं म्हणून साऱ्यांनीं त्याच्यावर आग पाखडली होती. त्यानं सारे देश पाहिले होते. अमक्या देशचे लोक एकजात चांगले अगर वाईट असं म्हणणं किती वेडेपणाचं असतं, सगळयाच देशांतल्या लोकांत चांगले वाईट दोन्ही असतात, हें त्याला पुरतं कळलं होतं. सर्कसबरोबर भ्रमन्ति करतांना मनुष्यस्वभावाची फार ओळख होते अन् तत्त्वज्ञानहि तयार होतं. या धंद्यांत पडल्याबद्दल त्याला पश्चात्ताप कधींच झाला नव्हता. या उद्योगांत बारा गांवचं पाणी प्यावं लागतं, अन् स्नेहीसोबती मिळतात ते चार दिवसांपुरते. ज्याची मैत्री त्याच्या हृदयावर कोरली गेली असा एकच माणूस त्याच्या हयातींत त्याला भेटला होता. त्याला तो एक प्रकारें गुरुस्थानीं मानीत असे. कारण घोड्यांची परीक्षा करण्याची विद्या त्या मित्राकडूनच त्यानं मिळवली होती, अन् घोड्यांचीं किती तरी कामं त्यानंच शिकवलीं होतीं....

येथपर्यंत हकीगत येतांच श्यामा म्हणाली,

" तो तुमचा मित्र हिंदी होता ना ?"

योशिदानं मान हालविली.

श्यामा म्हणाला, " तो प्रथम तुम्हांला मुंबईस भेटला—"

योशिदा अत्यंत विस्मयचकित झाला. त्यानं विचारलं. " तुम्हीं कसं ओळखलं—? "

श्यामा चटकन् म्हणाली, " त्या तुमच्या मित्राची मी मुलगी–"

आतां योशिदाच्या आश्चर्याला पारावारच राहिला नाहीं. तोंडावर बोट ठेवून तो " छे, छे !" असं कांहींसं स्वतःशीं पुटपुटला. आणि मग उठून तिच्या अगदीं जवळ उभं राहून त्यानं तिच्याकडे निरखून पाहिलं. त्याच्या तोंडावर हास्य उमटलं, व मग एकदम टाळी वाजवून तो म्हणाला,

" हर्षानं नाचावंसं वाटतंय मला. माझ्या मित्राची तूं मुलगी ?"

त्याचं लक्ष दाराकडे गेलं. त्यानं झटकन पुढें होऊन तें बंद कलं. आणि पुन्हा तिच्याजवळ येऊन त्यानं अगदीं हलक्या आवाजांत म्हटलं,

" ऐक, नीट लक्ष देऊन ऐक ! "

# ६

दारासमोर टॅक्सी उभी राहिलेली दिसतांच बंगल्यांतून धांवत आलेल्या बाळूला सामान दाखवून अन् टॅक्सीवाल्याचे पैसे चुकते करून अशोक जो गडबडीनं आंत गेला तो दिवाणखान्यांतूनच "श्यामाताई! ए श्यामाताई!" अशा हाका मारीत तिच्या खोलीकडे वळला.

आज दहाबारा दिवसांनीं तो कलकत्त्याहून परत आला होता, आणि आपल्या प्रवासांतल्या अन् इतर गमती तिला सांगण्यासाठीं व तिच्या हकीगती ऐकण्यासाठीं तो अधीर झाला होता. कलकत्त्यास पोंचल्यावर दुसऱ्या दिवशीं त्यानं तिला एक पत्र धाडलं होतं व तिच्याकडून त्याचं उत्तर येईल अशी अपेक्षा केली होती. पण तिच्याकडून पत्र आलं नव्हतं, व त्याबद्दल तिच्यावर रागवावं कीं तिच्यावर एक नाजुक आरोप करून तिची चेष्टा करावी याचा निर्णय त्याला करतां आला नव्हता. त्यानं विचार केला होता श्यामा भेटल्यावर रागरंग पाहून ठरवूं काय बोलायचं तें. रुसव्याचीं व थट्टेचीं दोन्ही प्रकारचीं बोलणीं त्यानं मनाशीं योजून

ठेवलीं होतीं, व श्यामा कोणत्या वृत्तींत आपल्याला भेटते आणि घासून पुसून तयार ठेवलेल्या शब्दास्त्रांपैकीं आपल्याला तिच्यावर कोणतं फेंकायला मिळतं तें पाहायची त्याला घाई झाली होती. खोलीशीं पोंचेपर्यंत त्याच्या तोंडून तिच्या नांवाच्या पांचसहा तरी हाका बाहेर पडल्या असतील.

श्यामा खोलींत नसल्याचं पाहून त्याचा हिरमोड झाला.

ती कदाचित् आईशीं बोलत बसली असेल अशा कल्पनेनं तो परत फिरणार होता; पण तितक्यांत डावीकडच्या स्नानगृहांतून बादली उचलल्या ठेवल्याचा आवाज त्याला ऐकूं आला. श्यामाच स्नान करीत असावी असं त्याला वाटलं, अन् म्हणून तिची वाट पाहत खोलींतच थांबायचं त्यानं ठरविलं. टेबलाजवळच्या खुर्चीवर तो बसला, व त्यानं खिशांतलं सिगरेट पाकिट काढलं. पाकिटांत एकच सिगरेट होती. ती काढतां काढतां त्याच्या मनांत आलं, प्रवासांत फार ओढतों आपण सिगरेट्स, हें कांहीं चांगलं नाहीं. आतां प्रायश्चित्त म्हणून दोन दिवस धूम्रपान बिलकुल बंद करायचं. विकतच घ्यायचं नाहीं पाकिट. ही उरलेली एक सिगरेट आत्तां ओढायची, पण नंतर...

त्यानं रिकामं पाकिट खिडकीच्या दोन गजांतून नेम धरून भिरकावलं पण तें एका गजाला आपटून परत आंतच पडलं. तो स्वतःशीं किंचित् हसला. सिगरेटचं थोटूक बाहेर फेकावं तों तें नक्की गजाला लागून उलट यावं असंच बहुतेक वेळां होत असे त्याची आठवण होऊन त्याला गंमत वाटली. जळकं थोटूक परत आलं कीं उठून पावलानं विझवणं भाग पडे. आत्तां पाकिट होतं तेव्हां जागेवरून उठण्याची गरज नव्हती. त्यानं सिगरेट ओठांत धरली व तो काड्याच्या पेटीसाठीं खिसे चाचपूं लागला.

तितक्यांत त्याचं लक्ष समोरच्या भिंतीकडे गेलं, व भिंतीवरच्या कॅलेंडरशेजारीं एक छोटासा नकाशा पाहून त्याला आश्चर्य वाटलं. हा नकाशा पूर्वी त्या ठिकाणीं नव्हता खास. उषाक्का व श्यामाताई इकडे यायच्या आधीं तर नव्हताच, पण कलकत्त्यास जाईपर्यंतही त्याला तो कधीं दिसला नव्हता. गेल्या दहा दिवसांतच तो या ठिकाणीं आला असला पाहिजे. श्यामाला भूगोल विषयाची आवड असल्याचं तिच्या बोलण्यावरून त्याला कधींच वाटलं नव्हतं. मग हा नकाशा कशासाठीं ? तिनं काय एखाद्या शाळेंत मास्तरणीचं काम पत्करलं होतं कीं काय ?...

मनाशीं असं आश्चर्य करीत तो खुर्चीवरून उठला, व जवळ जाऊन त्यानं नकाशाकडे जरा निरखून पाहिलं तेव्हां त्याचं आश्चर्य अधिकच वाढलं. कारण चारी खंड एकत्र दाखविणाऱ्या त्या नकाशांत कुणी तरी—अर्थात् श्यामानंच—प्रवासाचा मार्ग दाखविल्याप्रमाणें तांबड्या शाईची जाड रेघ मारली होती. मुंबई–कायरो–ॲलेक्झांड्रिआ–नेपल्स–रोम–फ्लॉरेन्स–व्हेनिस...

हें आहे तरी काय असं मनांतल्या मनांत पुटपुटत ती उत्तरेस वर चढत जाणारी रेषा अशोक पाहूं लागला.

इटलीची सरहद्द ओलांडून व ऑस्ट्रियांतून बाहेर पडून ती रेषा जर्मनीच्या म्यूनिक, स्टुटगार्ट या शहरांवरून गेली होती, व फ्रांकफुर्टवर संपली होती. त्या नांवाभोंवतीं तांबड्या शाईचं एक छोटं वर्तुळ काढलं होतं ...

आणि तेथून लाल रेषेचा तो बाण जो सरळ पश्चिमेकडे आडवा गेला होता तो उत्तर अमेरिकेंत घुसून शिकागो शहरावर थांबला होता. त्या नांवाभोंवतींहि छोटं वर्तुळ काढलं होतं...

नकाशांत आणखी कुठं अशा रेषा दिसतात का म्हणून अशोक-नं अगदीं बारकाईनं पाहिलं, पण त्याला एकहि रेघ दिसली नाहीं. मात्र फ्रांकफुर्ट शहरापाशीं १९२३ अन् शिकागोपाशीं १९३५ असे सन लिहिलेले त्याला आढळले....

अशोकला अत्यंत चमत्कार वाटला. हें काय गूढ आहे त्याला कळेना. पण सिगरेटचे दोन तीन झुरके मारल्यावर त्याच्या मनांत आलं, कॉनन डॉइलच्या रोमांचकारी कादंबऱ्यांतल्या डिटेक्टिव नायकाप्रमाणें तर्काचं जाळं विणण्याची ही काय खुळी खटपट चालवली आहे आपण ? —अन् ती सुद्धां किंचित् गुलाबी थंडी अन् प्रसन्न सूर्यप्रकाश अशी सुंदर सकाळची हवा पडली असतांना आणि आईकडून लवकरच येणारा सुंदर चहा चांगला दोन कप पिण्याची इच्छा असतांना ! असेल ती तांबडी रेघ कुणी तरी मारलेली. फार फार तर मघाशीं आपल्या मनांत जी विचित्र शंका आली ती खरी असेल. श्यामानं शाळेंत नोकरी धरली असेल, अन् तिथल्या मर्कटांना भौगोलिक ज्ञानामृत पाजण्यासाठीं...

तो परत टेबलापाशीं आला.

त्यानं एक पुस्तक सहज चाळायला म्हणून उचललं तों त्याच्या-खालीं एक पाकीट त्याला दिसलं. त्यावर त्याचाच कलकत्त्याचा पत्ता लिहिलेला होता. त्यानं तें उचलून पाहिलं तों तें बंद केलेलं नव्हतं. आतला नोटपेपर काढून तो वाचूं लागला.

" प्रिय अशोक,

तुझी चिठी पोंचली. एवढयाशा पत्राला मी पत्र म्हणायला बिलकूल तयार नाहीं. पण चिठी कां होईना, आठवण ठेवून धाडलीस याबद्दल थँक्स. इकडनं गमतीची बातमी म्हणून काय

लिहूं तुला ? प्रभाकरांच्याबरोबर मी गेल्या शनिवारीं सर्कसला गेलें होतें ही बातमी कदाचित् interesting वाटेल तुला. फार चांगली होती सर्कस. त्यांत कसरत करणाऱ्या जपानी बाया नकट्या नाकाच्या अन् बारीक डोळ्याच्या पण फार छान होत्या. तब्येत किती सण-सणीत साऱ्यांची, हातपाय किती बांधेसूद अन् अंग किती गोरंपान ! एकीचे तर डोळेसुद्धां मोठे होते, अन् फुलाफुलांच्या डिझाइनची चड्डी अन् काचोळी अशा वेषांत ती खरोखरच जपानमधील 'चेरी' झाडांच्या वनांतून आलेली परीच वाटत होती. तूं असतास तर खचित तिची ओळख करून घेतली असतीस, व तुझं चित्र काढूं देतेस का मला म्हणून तिला सरळ विचारलं असतंस. मग माझं चित्र काढायची आठवणदेखील राहिली नसती तुला ! तेव्हां नव्हतास तेंच बरं झालं.

आणखी एक गंमत सांगूं का ?

त्या सर्कसच्या मॅनेजरची अन् माझी ओळख झाली आहे. त्याची मुलाखत घेणार आहे मी मासिकांत द्यायसाठीं. तूं येईपर्यंत मी त्याची चांगलीच ओळख वाढवून ठेवणार आहे. तुला फुकट घेऊन जातां आलं पाहिजे मला सर्कसला तूं परत येशील तेव्हां. म्हणजे आपली चुलत बहीण खरोखरच कोणी तरी वजनदार स्त्री आहे हें तुला पटेल, अन् मग माझी चेष्टा जरा कमी करशील तूं.

काल संध्याकाळीं प्रभाकरांच्या घरीं..."

परंतु तें वाक्य तसंच अपुरं होतं, अन् त्याच्याखालीं आणखी कांहीं मजकूरही नव्हता. सहीसुद्धां नव्हती. नंतर केव्हां तरी पत्र पुरं करून टाकूं अशा विचारानं श्यामानं त्याची घडी करून तें पाकिटांत घालून ठेवलं असलं पाहिजे, व मग त्या पत्राचं तिला विस्मरण पडलं असलं पाहिजे.

अशोकनं पत्राच्या प्रारंभींच 'चेरी'च्या वनांतून आलेल्या परीचं वर्णन पुन्हा एकदां झटपट वाचलं, व तें पत्र त्यानं आपल्या कोटाच्या खिशांत ठेवलं. एखाद्या कसबी चित्रकारानं ब्रशाच्या मोजक्या फटकाऱ्यांत दृश्य उभं करावं त्यासारखं श्यामाचं तें वर्णन त्याला वाटलं होतं. श्यामा जशी रूपानं तशींच बुद्धीनंही मोह पाडणारी होती अशा अभिमानानं त्याचं हृदय भरून आलं, व तो स्वतःशींच हसला.

सिगरेटचं थोट्रूक टाकण्यासाठीं तो खिडकीजवळ गेला तों तिथल्या छोट्या टेबलावर कांचेच्या दडपणाखालीं छापील कागदाचं लहानसं पुडकं त्याला दिसलं. त्यानं ते कागद उचलून चाळले. ऑक्टोबर महिन्याच्या अखेरीस कलकत्ता शहरीं भरलेल्या " ऑल इंडिया काँग्रेस कमिटी"च्या अहवालाचे कागद होते ते. " ज्या प्रांतांत काँग्रेस अधिकारारूढ आहे तिथल्या एकूण एक राजबंदींची मुक्तता झाली पाहिजे." अशी मागणी करणाऱ्या मसानी यांच्या ठरावावर तांबड्या पेन्सिलीची ढळढळीत फुली होती. त्या पानावरून ओझरती दृष्टि टाकतां टाकतां अशोक मनाशीं म्हणाला, हे कागद अर्थात् प्रभाकरकडून आले असले पाहिजेत... पण यांचा येवढा सूक्ष्म अभ्यास करायचं श्यामाला काय कारण ? ...का काँग्रेसच्या कारभाराविषयीं तिचं अनुकूल मत बनविण्याची खटपट प्रभाकर करूं लागला होता ?...

तितक्यांत बाळू चहा घेऊन खोलींत आला म्हणून त्यानं ते कागद परत टेबलावर ठेवले. मग त्याला एकदम आठवण झाली कीं, श्यामा स्नान आटपून येईल म्हणून तिची आपण वाट पाहत होतों. त्यानं बाळूला विचारलं,

" हें काय रे, एकच कप आणलास? आणखी एक आण ना? ताईसुद्धां घेईल चहा."

" ताईसाब?–" बालूनं आश्चर्यानं विचारलं.

" न्हाणीघरांत स्नान करते आहे ना ती? आटपलं कीं इकडे येईल—"

" न्हानीघरामंदी हायेत कुठं त्या?"

" म्हणजे?–मग कोण आहे?"

" सैपाकिनकाकू करत असल अंगुळं. ताईसाब तर कवाच्च गेल्या भाइर..."

" गाढवच्च आहेस. जा!" अशोकनं रागानं म्हटलं.

पण बालू खोलीबाहेर गेला तेव्हां खरं पाहतां कोण गाढव होतं तें ध्यानांत येतांच अशोक स्वतःशींच मोठ्यांदा हसूं लागला.

चहा पिऊन झाल्यावर त्यानं सावकाशपणें स्नान आटपलं, व शर्ट घालतां घालतां आज कोणकोणतीं कामं करायला हवींत असा तो विचार करूं लागला. जेवणाची वेळ होईपर्यंत कुठेंच जाऊं नये, जेवूनच एकदम बाहेर पडावं असं मनाशीं ठरवीत तो मधल्या दिवाणखान्यांत आला. पण तितक्यांत त्याला वाटलं कीं प्रभाकरशीं थोडं काम आहे तें केलंच पाहिजे. प्रभाकराचा बंगला खारलाच होता. डॉक्टरांच्या बंगल्यापासून दहा मिनिटांच्या अंतरावर. पण तेवढं अंतरसुद्धां चालून जाण्याची या घटकेला अशोकची इच्छा नव्हती; म्हणून तो टेलिफोनजवळ गेला, व नंबर फिरवून म्हणाला,

" हलो! अं...कोण बाबू? मी अशोक बोलतों आहे.—अरे प्रभाकर आहेत ना घरांत?"

" न्हाईत. "

" नाहींत ? कुठें गेले माहित आहेत का तुला ? "

" न्हाई बा. सांगूनश्यान् गेलं न्हाई."

" असं ? "

" हा. म्हंजी असं झालं, मी बागेंत पानी मारीत व्हतो तवा आपल्या ताईसाब इकडं आल्या— "

" कोण ? आमची श्यामाताई ?— "

" व्हय, तर दुसरं कोन ?—तर काय सांगत व्हतों ? ताईसाब आल्या. त्या पायरीवरच उभ्या बगा अशा, तर वरनं साहेब ओरडलं, आलोंच. मंग त्ये लगुलग खालीं आलं अन् दोगं मिळूनश्यान मोटारीमंदी—"

" असं असं बरं." अशोक म्हणाला.

" आपला काई निरोप सांगायचाहे ? "

" निरोप होय ? आं...कांहीं नाहीं. मीं फोन केला होता येवढंच सांग." असं म्हणून अशोकनं टेलिफोन बंद केला.

आपल्या खोलीकडे जातां जातां त्याच्या मनांत आलं, ताई सर्कसला प्रभाकरबरोबर गेली, त्यानं दिलेले ते कागद तिच्या टेबलावर होते, अन् आतां दोघंजण मिळून...गेल्या दहा दिवसांत बरीच प्रगति केली होती म्हणायची महात्मा बंडोपंतांनीं !...

श्यामाची चेष्टा करण्यासाठीं संभाषणाचे किती तरी खट्याळ प्रारंभ त्याला भराभर सुचूं लागले...येऊं दे आतां ती परत...

आरशासमोर उभं राहून केंस विंचरतांना तो फार खुषींत गुणगुणत होता,

"... एक होती रा ऽऽ णी ऽऽ"

  

श्यामाहि रात्रीं आपल्या खोलींत निजण्यापूर्वी आरशासमोर केस विंचरीत होती.

पण ती स्वतःशीं गाणं गुणगुणत नव्हती.

तिच्या मनांत ज्या विचारांची हालचाल त्या घटकेला सुरू होती त्यांचं स्वरूप कांहींसं गंभीर होतं. ज्या उल्हासांत व आनंदांत तिचा सबंध दिवस गेला होता त्याची प्रतिक्रिया म्हणून हें गांभीर्य तिच्या मनावर आलं होतं, अन् त्यामुळें तें घालविण्याचा यत्न करण्याची तिची इच्छा नव्हती. उलट तिला तें हवंसं वाटत होतं. कारण ती दिवसभर हसतखेळत वावरली होती तें आपल्या मनाच्या कांहीं वृत्ती दडपून. एकीकडे गमतीचीं बोलणीं बोलत असतांना तिला सारखं वाटलं होतं, आतां हें संपेल अन् मला एकान्त मिळेल तर बरं होईल. रात्रीं जेवणं आटपल्यावर जरा बाहेर भटकून येण्याची कल्पना अशोकनं काढली होती. पण तिनं म्हटलं होतं, "नको; मला अगदीं थकून गेल्यासारखं वाटतंय." मग ती कांहीं वेळ रेडिओ ऐकत बसली होती व दहा वाजले तेव्हां त्याला म्हणाली होती, "ए आतां निजतें रे मी." "जातेस ?—बरं गुड-नाइट." असं

अशोक हसून म्हणाला होता. आपल्या खोलीचं दार तिनं ओढून घेतलं तेव्हां ती स्वतःशीं म्हणाली होती, " थकलें बाई ! "

तिनं एकदम अंथरुणांत अंग टाकलं होतं. तिला विलक्षण थकवा वाटत होता. आणि तो थकवा शरीराचा नव्हता; मनाचा होता. मन मोकळं न करतां बराच वेळ वागावं लागलं कीं माणसाला जो शीण येतो तो तिला आला होता.

दुपारीं जेवणाच्या वेळेस ती घरीं आली तेव्हां अशोक कलकत्त्याहून परत आलेला तिला आढळला होता. ती भेटतांच त्यानं जो चेष्टेचा भडिमार सुरू केला त्याला तोंड देतां देतां तिला पुरेवाट झाली होती. मग जेवणानंतर तो म्हणाला होता, " आतां तूं काय करणार आहेस ? "

तिनं उत्तर दिलं होतं, " दोन तास चापून झोंप काढणार आहे."

" नाहीं नाहीं. कपडे कर. आज सबंध दिवसभर माझ्याबरोबर हिंडलं पाहिजे तुला. मला कामासाठीं पांच सहा ठिकाणीं जायचं आहे. पण तुला कंटाळा येऊं देणार नाहीं. खूप गमती सांगायच्या आहेत तुला. अन् त्या शिळया झाल्यावर सांगण्यांत काय मजा आहे ? चल चल, झोंप बुडूं दे आजच्या दिवस. हं आटप. कपडे करून ये."

मग तिचा नाइलाज होऊन तिला त्याच्याबरोबर जावं लागलं होतं, अन् त्याच्या कामांतून सवड मिळून तो व ती अशीं दोघंच जेव्हां जेव्हां गाडींतनं जातां जातां, अगर हॉटेलांत चहा घेतां घेतां, अगर संध्याकाळीं समुद्राचा वारा खात बोलत बसलीं होतीं तेव्हां तेव्हां बाकी बोलणं सोडून त्यानं प्रभाकराची गोष्ट काढावी व तिची चेष्टा करावी असं झालं होतं.

त्याचीं तीं बोलणीं चतुराईनं उलटवून तिनं त्याला भरपूर हसविलं होतं. त्याच्या कोट्या ऐकून हसतांना तें हसणं मनःपूर्वक नसेल अशी शंकादेखील तिनं अशोकला येऊं दिली नव्हती. पण अंतर्यामीं त्या साऱ्या नर्मविनोदापासून तिला सुख होत नव्हतं. अशोक समजत होता त्याप्रमाणें तिच्या मनांत प्रभाकरविषयीं कांहीं नाजुक भावना उत्पन्न झालेली असती तर तिला तें सुख झालं असतं. पण--

आतां रात्रीं आपल्या अंथरुणांत पडल्या पडल्या श्यामा मनाशीं विचार करूं लागली, आपल्या मनांत प्रभाकरविषयीं नाजुक भावना कधीं उत्पन्न होईल काय ?......

तिला तें संभवनीय वाटेना......

आणि तरी ती गेल्या दहा दिवसांत प्रभाकरशीं बऱ्याच मोकळेपणानं वागली होती, आपलं मन त्याच्याकडे आकर्षित होत आहे अशा समजुतीनं तो वागत होता असं तिला आढळून आलं होतं, आणि त्याची ती समजूत चुकीची होती तरी तसं त्याच्या निदर्शनाला आणण्याचं तिनं टाळलं होतं. कां ?...

कोणत्या हेतूनं ती प्रभाकराचं मन आपल्याकडे ओढून घेत होती ?...

याला वंचना म्हणतां येईल काय ?... असा विचार करीत ती कांहीं वेळ पडली आणि इकडे तिकडे हिंडणारी तिची दृष्टि जेव्हां भिंतीवरच्या त्या नकाशाकडे वळली तेव्हां ती त्यावरच बराच वेळ स्थिर झाली, व मग ती अखेर मनाशीं म्हणाली, " नाहीं. यांत वंचना नाहीं. अन् असली तरी ती क्षम्य आहे."

तिचे वडील हयात होते. ते आज घटकेला कुठें होते तेंहि तिला योशिदानं सांगितलेल्या हकीगतीवरून कळलं होतं. त्यांना

परत मायदेशांत यायला मिळालं पाहिजे असं तिला तीव्रतेनं वाटत होतं. तें घडायचं तर त्या बाबतींत सरकारच्या धोरणाची प्रतिकूलता निवळायला हवी, व या कामीं प्रभाकराचं साहाय्य आपल्याला होईल हें तिला उघड दिसत होतं. अन् म्हणून त्याचं प्रियाराधन आपल्याला सुखदायक होत आहे अशी त्याची समजूत राहावी अशा धोरणानं ती गेल्या दहा दिवसांत वागली होती....

प्रभाकरच्या या समजुतीचा भलताच परिणाम झाला तर?... आपण त्याच्याशीं लग्न करण्यास उत्सुक आहोंत असं वाटून त्यानं जर विचारलं "तूं माझी होशील का?" तर?...

ही कल्पना कधीं कधीं तिच्या मनांत आली होती. आत्तांहि आली.

पण श्यामा मोठी विचित्र मुलगी होती. या कल्पनेची तिला भीति वाटली नाहीं. तिचे वडील मायदेशाला परत यावेत असं तिला करतां आलं तर त्याची किंमत म्हणून प्रभाकरवर प्रेम नसतांनाहि त्याच्याशीं लग्न करायला तिची तयारी होती!

अजून कुठल्याहि तरुणावर तिनं प्रेम केलं नव्हतं. तो विषय तिच्या ओळखीचाच नव्हता. आपल्या पित्याबद्दलच्या उत्कट अभिमानानं व प्रेमानं तिचं हृदय भरलेलं होतं. पित्याच्या भेटीची एकच ओढ तिच्या जिवाला ठाऊक होती. त्यासाठीं वाटेल तें दिव्य करायला ती तयार होती!

भिंतीवरच्या त्या नकाशाकडे ती ज्या ज्या वेळीं पाही त्या त्या वेळीं तिनं काढलेली ती लाल रेषाच फक्त तिला दिसूं लागे. कायरो–अलेक्झांड्रिया–नेपल्स–रोम इत्यादि लाल रेषेनं सांधलेल्या नकाशांतल्या त्या स्थळांकडे दृष्टि लावून बघत राहिलं कीं, योशिदाच्या तोंडून आपल्या वडिलांची हकीगत आपण पुन्हा

ऐकत आहोंत असा तिला स्पष्ट भास होई. आणि त्या दिवशीं योशिदाच्या खोलींत जितक्या तल्लीनतेनं तिनं ती ऐकली होती तितक्याच तल्लीनतेनं ती सारी हकीगत ती आठवूं लागे.

ती आठवतां आठवतां सिनूकाकांनीं लिहून ठेवलेल्या तिच्या पित्याच्या पूर्वचरित्रांतल्या हकीगती तिच्या मनांत येत, आणि तिला वाटे, आपल्या वडिलांचं एकंदर चरित्र म्हणजे देशाला स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या प्रतिज्ञेची एक रोमांचकारी पण सुसंगत हकीगत म्हटली पाहिजे.

१९०५ सालीं आनंदराव म्हणजे अवघा सोळा वर्षांचा बेळगांवच्या शाळेंत जाणारा मुलगा होता. परंतु त्या वयांत वासुदेव बळवंत फडके हें त्याचं दैवत होतं. बंगाल्यांतले देशभक्त तरुण बॉम्ब तयार करतात अशा हकीगती ऐकून त्या कल्पनेचं वेड त्यानं घेतलं होतं. एकदां चांदणी गांवाला कलेक्टर भेट देणार होता तेव्हां बॉम्ब तयार करून त्याच्यावर टाकण्याचा त्यानं बेत केला होता. पण कसा कोण जाणे त्याच्या वडिलांना त्या गोष्टीचा सुगावा लागला व त्यांनीं त्याला खरपूस चोप दिला होता. आनंदराव घरांतून नाहींसा झाला होता, व त्याचा शोध जेव्हां अखेर छत्र्यांच्या सर्कशींत लागला तेव्हां तेथून समजूत घालून त्याला घरीं आणणं त्याच्या वडिलांना भाग पडलं होतं. पुढे १९०७ सालीं मॅट्रिकची परीक्षा पास होऊन डेक्कन कॉलेजांत तो दाखल झाला तेव्हां तर टिळकांच्या जहाल राजकारणाचा त्याच्यावर फारच परिणाम झाला होता. कॉलेजांतलि अभ्यासक्रम पुरा करण्याच्या आधींच तो एका पंजाबी मित्राबरोबर उत्तर हिंदुस्थानाकडे गेला होता. १९१२ सालीं दिल्ली शहरीं लॉर्ड हार्डिज यांच्यावर भर मिरवणुकींत बॉम्ब फेंकला गेला तेव्हां जी धरपकड

झाली तींत आनंदरावहि पकडला गेला होता. परंतु दीड महिना कच्च्या कैदेंत राहावं लागण्यापलीकडे त्याच्यावर कांहीं संकट आलं नव्हतं. मग तो चांदणी गांवाला परत आला होता व त्याचं लग्न झालं होतं. लोकांना वाटलं होतं, आतां आनंदराव साऱ्या चळवळी खटपटी सोडून आपल्या गांवीं स्थिर होऊन राहील. परंतु ती कल्पना खोटी ठरली होती.

जर्मन रंग विकणारा एक जर्मन बेळगांवला आला तेव्हां त्याची व आनंदरावची ओळख झाली. तो जर्मन इसम गुप्त हेर होता. जर्मनींतून हिंदुस्थानांत शस्त्रं आणण्याचे गुप्त बेत ते दोघे करूं लागले. पुढें १९१४ चं महायुद्ध सुरू झालं; तो जर्मन इसम हिंदुस्थानांतून नाहींसा झाला.

लोकमान्य टिळक मंडालेहून सुटून परत आले आणि त्यांची होमरूल लीगची चळवळ एखाद्या वावटळीसारखी देशभर पसरली होती. आनंदराव तावडतोब टिळकांकडे गेला. त्यांनीं वऱ्हाड-नागपूरच्या भागांत जो विद्युद्वेगी अविस्मरणीय दौरा काढला त्या दौऱ्यांत आनंदराव त्यांचा शरीररक्षक होता.

पण परदेशांतून गुप्तपणें शस्त्रसामुग्री आणून कांहीं तरी धाडशी उद्योग करण्याचे त्याचे विचार कांहीं केल्या सुटेनात, आणि त्या बाबतींत प्रोत्साहन देण्यास तर टिळक बिलकुल तयार नव्हते. मग त्यांचं सान्निध्य सोडून आनंदराव चांदणीला परत आला होता...

आपल्या पित्याच्या या पूर्वचरित्राचं श्यामाला स्मरण होई आणि मग योशिदानं सांगितलेली हकीगत आठवली कीं तिला वाटे, तिच्यांत विस्मयकारक असं काय आहे ? आपल्या देशबांधवांच्या निःशस्त्रपणाची चीड बाळगणाऱ्या व परकी राज्यकर्त्यांना आपलं

सामर्थ्य पटवून देण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या आपल्या वडिलांची कांहीं निराळी हकीगत तिला कळली असती तरच तिच्यावर तिचा विश्वास बसला नसता. एखाद्या विलक्षण कादंबरींतील सुसंगत घटना वाचीत गेल्याप्रमाणें आनंदराव मुंबईस सर्कसमधें दाखल झाले त्यानंतरच्या योशिदानं सांगितलेल्या गोष्टी ती आठवूं लागली...

तो तिला म्हणाला होता, "तुझ्या वडिलाचं पूर्वचरित्र मला फार पुढें कळलं. मी त्याचा एक अत्यंत विश्वसनीय स्नेही आहे अशी त्याची खात्री पटल्यावर त्यानं मला एक दिवस सांगितलं, कीं कसंहि करून जर्मनींत जाण्याचा त्याचा बेत होता. कायरो, अलेक्झांड्रिया, असे मुक्काम करीत आमची सर्कस जर्मनींतल्या फ्रांकफुर्ट शहरीं पोंचली तेव्हां मग त्यानं सर्कसच्या मालकाला सांगितलं, मी यापुढें सर्कसबरोबर येणार नाहीं. तो तिथंच राहिला. ही १९२३ सालची गोष्ट. आणि मग त्याची माझी जी फारकत झाली ती जवळ जवळ तेरा वर्षं. पण दीड वर्षांपूर्वी आम्ही अमेरिकेंतल्या शिकागो शहरीं मुक्काम केला तेव्हां तो अकस्मात् मला भेटला. त्याचा वेष पाहून आणि त्याचे उद्योग त्यानं मला सांगितले ते ऐकून मीं थक्क झालों. 'तिलकानंद' असं नांव त्यानं धारण केलं होतं आणि एक बडा योगी म्हणून अमेरिकन लोकांना तो झुलवीत होता. या उद्योगांत तो पुष्कळ पैसे मिळवी, व ते सारे तो हिंदुस्थानांतील अराजकांना पाठवून देई..."

श्यामानं योशिदाला एकदम विचारलं होतं, "मग माझे वडील आज घटकेला शिकागोलाच असतील तर ?"

योशिदा म्हणाला होता, "तें मी कसं सांगूं! एक तर या

दीड वर्षांत मला त्याची कांहींच बातमी नाहीं, आणि शिवाय तुझ्या पित्यानं जी साहसी प्रतिज्ञा केली ती करून वागणाऱ्या लोकांचं कुशल अथवा ठावठिकाण सांगणं फार कठीण असतं."

परंतु योशिदाचे हे उद्‌गार ऐकूनहि श्यामा मनाशीं म्हणाली होती, "नाहीं, नाहीं, माझे वडील सुखरूप आहेत. आणि ते शिकागोलाच असले पाहिजेत."

नंतरच्या दहा दिवसांत श्यामानं हें वाक्य मनाशीं कितीदां उच्चारलं असेल त्याला गणती नाहीं.

आतांहि तें वाक्य स्वगत उच्चारूनच ती अंथरुणावरून उठली होती, आणि आरशासमोर उभं राहून आपले केस विंचरूं लागली होती.

केस विंचरून झाल्यावर ती खिडकीशीं जाऊन उभी राहिली. क्षणभर तिच्या मनांतील साऱ्या विचारलहरी लुप्त होऊन तिला कांहीं एका विलक्षण शान्तीचा अनुभव आला. रात्रीच्या निःशब्द प्रहरांत हा काय चमत्कारिक गुण असतो असं तिच्या मनांत आलं.

आणि मग तिला एकदम सिनूकाकांची आठवण झाली. योशिदाच्या तोंडून समजलेली हकीगत तिनं अजून त्यांना कळविली नव्हती...

"उद्यां काकांना पत्र लिहायचंच." असा मनाशीं निश्चय करीत ती खिडकींतून दूर झाली; व मग तिनं दिवा मालविला.

# ७

नंतरचे पंधरा वीस दिवस त्वरेनं गेल्यासारखं श्यामाला वाटलं. आणि तिला असं वाटलं याचं मुख्य कारण हें होतं कीं, रोजच्या दिवसांतले तिचे जवळ जवळ दोन अडीच तास अशोकच्या संगतींत जात असत. तो तिचं चित्र तयार करीत होता.

त्याची खोली आधींच बरीचशी एखाद्या स्टूडिओसारखी होती; परंतु कलकत्त्याहून परत आल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं त्यानं तिच्या व्यवस्थेंत आणखी फेरफार केले होते, व तिच्यांत पाऊल टाकतांच आपण एखाद्या स्टूडिओंत आल्याचा माणसाला पूर्ण भास व्हावा अशा प्रकारें खोलींतल्या छायाप्रकाशाची, तयार चित्रांची, चित्रफलकाची आणि फर्निचरची मांडणी त्यानं करून टाकली होती. ती मनाजोगती पुरी झाल्यावर तो श्यामाच्या खोलींत घाईघाईनं गेला होता व म्हणाला होता, "ताई, जरा माझ्या खोलींत चल."

दुपारच्या जेवणानंतरची विश्रांति घेण्याच्या विचारांत असलेल्या श्यामानं म्हटलं होतं, "मी नाहीं येत; तूंच बैस इथें असा माझ्या

पलंगाजवळ या खुर्चीवर. उषाक्काकडून आलेलं पत्र दाखविणार आहे मी तुला."

" तें मग पाहीन. आधीं माझ्या खोलींत चल." असं म्हणून त्यानं तिचा हात धरून तिला जवळ जवळ ओढलं होतं.

आणि मग त्याच्या खोलींत प्रवेश केल्याबरोबर तिच्या तोंडून उद्‌गार निघाला होता, " ओहो! ही आपल्या राहत्या घरांतील खोली आहे हें खरंसुद्धां वाटायचं नाहीं. एखादा बडा पाहुणा येण्याची तयारी केल्यासारखा थाट उडवून दिला आहेस कीं. खरंच? येणार आहे होय कुणी?"

मधल्या बोटाचं टोक कपाळावर टेकण्याचा अभिनय करून अशोक हसत म्हणाला होता, " नशीब! तूं मोठी चतुर आहेस असं मी लोकांना तर सांगत असतोंच, पण स्वतःहि समजत होतों. परंतु, या क्षणीं मात्र अगदीं वेड्यासारखा प्रश्न केलास."

" तो कसा बाई?"

" अग, कॅनव्हस ताणून लावून तयार केलेला हा कोरा चित्र-फलक तुला धडधडीत दिसतो आहे, इथें या बाजूला हा एक लहानसा प्लॅटफॉर्म मांडलेलाहि तूं पाहते आहेस, अन् तरी माझा स्टूडिओ पाहायाला कोण पाहुणा येणार म्हणून मला विचारते आहेस? ही कसली तयारी मीं केली तें तुझ्या लक्षांत येऊं नये तेव्हां तुला वेडी नव्हे तर शहाणी म्हणूं होय? का मला वचन दिलंस तें पाळायचं नाहीं म्हणून वेडाचं सोंग पांघरते आहेस? बाकी मतदारांना दिलेलीं वचनं खुशाल मोडणाऱ्या मंत्र्याच्या नादीं तूं आतांशा लागली आहेस तेव्हां— "

" हां हां पुरे पुरे— " असं म्हणून श्यामानं त्याच्यावर हात उगारला, आणि तोच हात पकडून तिला प्लॅटफॉर्मकडे नेऊन

त्यावरच्या गालिचावर जेव्हां त्यानं तिला उभं केलं व विचारलं "आतां तरी ध्यानांत आलं का तुझ्या ही सगळी तयारी कशाची तें?" तेव्हां ती हसून म्हणाली होती,

"अय्या! म्हणजे माझं चित्र तूं काढणार आहेस—?"

"आतां कसं ओळखलंस?" तिच्या पाठीवर शाबासकी दिल्यासारखं करून तो हसत हसत दूर झाला होता, व वरच्या कांचेच्या छपरांतून येणारा प्रकाश हवा तसा साधण्यासाठीं त्याखालच्या पांढऱ्या स्वच्छ छताची सरकवासरकव तो करूं लागला होता.

तेव्हांपासून श्यामाचं चित्र काढण्यास अशोकनं प्रारंभ केला होता; आणि चित्रासाठीं त्याच्यासमोर उभं राहण्यांत, एकीकडे हातानं चित्र काढीत असतां त्याची नाना प्रकारच्या विषयावर जी बडबड चाले ती ऐकण्यांत, व ती कंटाळूं नये म्हणून मधून मधून विश्रांति घेण्याची व बोलण्याची तिला तो परवानगी देई तेव्हां बोलण्यांत तिचे रोज जवळ जवळ दोन अडीच तास जात. चित्रकारापुढें तो सांगेल त्याप्रमाणें घटका घटका निश्चल उभं राहणं किती श्रमाचं आहे असं तिला पुष्कळदां वाटे; परंतु एकंदरींत तिचा तो वेळ फार मजेंत जात असे.

आपलं चित्र कसं तयार होत आहे तें आपल्याला सारखं पाहतां यावं अशी तिची साहजिकच इच्छा असे. पण चित्रफलकाची पाठ तिच्याकडे असल्यामुळें तिला ती इच्छा सारखी आवरून धरावी लागे. मग अर्धा तास कसाबसा दम धरल्यावर, "ए कंटाळलें रे आतां" असं तिनं अशोकला सांगावं, आणि "बरं हो दूर जरा" अशी त्यानं परवानगी देतांच तिनं चित्राच्या सुलट बाजूला यावं अन् त्यांत आणखी काय काय बदल झाले ते उत्सुकतेनं पाहावे.

एकदां ती म्हणाली, " हे रे काय अशोक, हा जांभळा रंग काय दिला आहेस इथें ? माझ्या चेहऱ्यांत असला जांभळा रंग आहे ? "

हें ऐकून अशोकला हसूं आलं, व तो म्हणाला, " समग्र ग्रंथ वाचल्यावांचून जो अभिप्राय देतो 'तो एक पढतमूर्ख' असं रामदासांनीं म्हटलं आहे ना ? त्याप्रमाणेंच सबंद चित्र तयार झाल्यावांचून–"

ओवी म्हटल्यासारखा हेल काढून त्यानं दासबोधांतला तो चरण म्हटल्यामुळें श्यामाला मनस्वी हसूंहि लोटलं व ती म्हणाली,

" वा वा साहेब, आपला रामदासाचा 'स्टडी' इतका दांडगा असेल अशी नव्हती कल्पना. पण जो रंग मुळांत नाहीं तो खुशाल चित्रांत फासणारा रामदासांनीं पाहिला असता तर 'तोहि एक पढतमूर्ख' असंच त्यांनीं म्हटलं असतं बरं का ! "

तिनंहि तो चरण ओवीचा हेल काढूनच म्हटला, व त्यामुळं तीं दोघंहि मोठमोठ्यानं हसलीं.

अशोक म्हणाला, " त्याचं असं आहे ताई, कीं एक तर तूं म्हणतेस तो या जागचा रंग जांभळा नाहीं. आणि शिवाय अनेक रंगांच्या विविध छटा माणसाच्या चेहऱ्यांत असतात; सामान्य माणसाला त्या दिसत नाहींत; पण चित्रकाराच्या दृष्टीला त्या अगदीं स्पष्ट दिसत असतात ! "

" असं असं; 'जें न देखे रवि तें देखे कवि' या चालीवर होय ? "

" हो हो त्या चालीवर हं. बरं आता विश्रांति पुरे झाली कीं, जा आपल्या जागेवर." असं म्हणून त्यानं हातांतली सिगरेट विझवून टाकली व ब्रश हातीं घेतला.

एकदां त्याचा एक चित्रकार मित्र येऊन त्याचं काम पाहत बसला. त्या स्वारीचा तेलकट चेहरा अन् मळकट गबाळा पोशाख दृष्टीस पडल्याबरोबरच श्यामाचा त्याच्याविषयीं प्रतिकूल ग्रह झाला. ती मनांत म्हणाली, या गृहस्थाला चित्रकार म्हणायचं असेल तर मग आमच्या चांदणी गांवचा तंबाखूचा लिंगायत व्यापारी दोड्डाप्पा कां नाहीं चित्रकार? तिला वाटलं आपल्या कादंबरींत रंगवायला बरं आहे हें 'कॉमिक' पात्र. अशोकनं सांगितलेली दृष्टीची दिशा तिला बदलतां येत नव्हेती, पण त्यांतल्या त्यांत पाहतां येईल तेवढं त्या पात्राच्या हालचालीकडे ती पाहूं लागली. ओठावरची मिसरूड आळीपाळीनं डाव्या उजव्या हाताच्या चिमटींत धरून कुरतडण्याची त्याला खोड होती. मधेंच तो खिशांतून मळकट हातरुमाल काढी व मोठा आवाज करून जोरानं नाक मोकळं करी. इतकं पडसं झालं होतं तरी त्याचं धूम्रपान अखंड चाललं होतं, अन् तेंसुद्धां स्वतःच्या खिशांतल्या सिगरेट्स काढून नव्हे तर अशोकनं एका बैठ्या स्टुलावर आपला डबा ठेवला होता त्यांतल्या सिगरेट्स घेऊन. या गोष्टींचा तिला उपसर्ग झाला नाहीं; पण तो व्हावा अशी एक गोष्ट कांही वेळानं तो करूं लागला. प्रथम अशोकच्या पाठीशीं उभं राहून तो मुख्यतः तयार होणाऱ्या चित्राकडे लक्षपूर्वक पाहत होता व त्यांतली एखादी रेषा अगर रंगछटा पडताळून पाहण्यापुरती तिच्याकडे दृष्टि टाकीत होता. परंतु हळूहळू त्यानं चित्रफलकाकडे पाह्यचं सोडूनच दिलं, व जणूं तिला पाह्यलाच तो आला होता अशा प्रकारें तिच्याकडे नजर लावून तो उभा राहिला. तिला चीड आली. त्यामुळें तिच्या चेहऱ्यावरील भाव बदलला असावा. कारण अशोकनं चमकल्यासारखं करून विचारलं,

" कां ग, कंटाळलीस ? थांबायचं आहे का जरा ?"

ती म्हणाली, " नाहीं, चालूं दे." आणि आपली चर्या तिनं अशोकला हवी तशी प्रसन्न व गंभीर केली.

पण तो गृहस्थ गेला, व घरांतून चहा आला तेव्हां ती म्हणाली,

" तुझे बाकीचे मित्र मला दाखवलेस ते किती एकाहून एक ऐटबाज अन् झोकनोक पोशाख करणारे, अन् हेंच तेवढं रत्न कुठलं पैदा केलंस रे ? याला चित्रकलेंतलं समजतं तरी का कांहीं ?"

कपांतला चहा फुंकरतां फुंकरतां थांबून अशोक म्हणाला, " असं बोलूं नकोस ! पोर्ट्रेट पेंटिंगमध्यें त्याचा हात धरणारा कोणी नाहीं !"

" दुसऱ्याच्या डब्यांतल्या सिगरेट्स फस्त करण्यांत त्याचा हात धरणारा कोणी नाहीं हें बरीक मीं पाहिलं खरं."

" चेष्टा नाहीं. आर्ट स्कूलचा प्रिन्सिपल त्याला मानतो, यावरून बघ काय तें. त्याच्या अवतारावर जाऊं नकोस. तीन वर्षे इटलींत राहून शिकून आला आहे तो."

" इटलींत बायकांकडे रोखून पाह्यलाच तेवढं शिकलेला दिसतो तो मला."

" तुझ्याकडे पाहत होता ? " अशोकनं विचारलं.

" तुला कसं दिसणार ? तुझ्या पाठीशीं होता उभा."

" पण मला वाटतं तुझा गैरसमज झाला आहे. अग, आम्ही चित्रकार लोक देखण्या बायकांकडे खुशाल असे टक लावून पाहत राहतों कीं तें एखाद्याला चमत्कारिक वाटावं, पण त्यांत वावगा हेतु मात्र नसतो अं."

" तें नको सांगूं मला." श्यामा हसत हसत पण जरा रुष्ट

स्वरानंच म्हणाली, "कुणाच्या दृष्टींत पाप आहे तें आम्हां बायकांना चांगलं कळतं."

"बायका असंच आज हजारों वर्षे म्हणत आल्या आहेत, अन् तरी फसत आल्या आहेत!" त्यानं सिगरेट पेटवली, व मग तिच्याशीं समेट करण्यासाठीं तो लगेच म्हणाला, "पण आपण आजपासून एक नियम करूं. आपलं काम चालूं असतांना कुणालाहि इथें येऊन बसूं द्यायचं नाहीं. मग तर झालं?"

"इश्श्, असं नाहीं कांहीं माझं म्हणणं." श्यामा म्हणाली.

परंतु अशोकनं दुसऱ्या दिवसापासून तो नियम खरोखरच अमलांत आणला; आणि योगायोग असा, कीं त्याचा पहिलाच प्रयोग त्यानं केला तो प्रभाकरवर.

प्रभाकर सकाळीं सहजगत्या बंगल्यावर आला होता, व कॉफी पिऊन झाल्यावर तो अशोकला आणि श्यामाला म्हणाला,

"ठीक, जातों आतां. दहा पंधरा मिनिटं गप्पा मारीत बसलों असतों पण तुम्हांलाच वेळ नाहीं. जातों आम्ही. तुम्ही लागा आपल्या कामाला. का अशोक मी येऊं रे तुझ्या स्टूडिओंत? चित्र पुरं होत आलं आहे म्हणतोस, तेव्हां पाहूं या तरी!"

अशोक म्हणाला, "तुला अकरा वाजतां आपल्या कचेरींत हजर झालं पाहिजे ना! जनताजनार्दनाची सेवा करण्यांत तुम्ही कॉंग्रेस-मंत्र्यांनीं आपल्या आयुष्याचा वेळ शक्य तितका घालविला पाहिजे. तेव्हां तूं माझ्या स्टूडिओंत यावंस असं मला वाटत नाहीं. आणि शिवाय आम्हीं कालपासून एक नियम केलाय, कीं आमचं काम चालूं असतांना कुणालासुद्धां प्रवेश मिळूं द्यायचा नाहीं."

"होय?"

" हो. अगदीं नाणावलेला चित्रकार येतो म्हणाला तरी त्याला मज्जाव आहे. मग तुला तर— "

प्रभाकरनं चटकन हसत विचारलं " मला तर म्हणजे काय रे ? "

आणि अशोकनं खुशाल उत्तर दिलं, " त्याचा अर्थ असा कीं, तुम्हा कॉंग्रेसमधल्या लोकांना कलेच्या बाबतींत कांहीं एक कळत नाहीं, समजलास ? "

" अरे, मला कळत नाहीं असं फार तर म्हण, पण माझ्या सबंध जातीची एकदम बदनामी कां करतोस ? "

" केलीच पाहिजे. तुम्हां कॉंग्रेसवाल्यांच्या हातीं सत्ता आल्यापासून आपल्याला साऱ्या गोष्टी कळतात असा भ्रम व्हायला लागला आहे तुमचा. तो घालवायसाठीं स्पष्टवक्तेपणाचं काम माझ्यासारख्या माणसानं अधूनमधून केलंच पाहिजे."

श्यामाला वाटलं अशोक जरा वाजवीपेक्षां कडक बोलला. तिनं आपल्या मोठाल्या तेजस्वी डोळ्यांची तिरपी नजर अशोककडे टाकली; आणि 'नको' अशा अर्थी मान किंचित् हालविली.

तिचा अभिप्राय ओळखून अशोकनं प्रभाकरकडे पाहून हास्य केलं व म्हटलं, " आणि तुला माझं चित्र पाहायची येवढी उत्सुकता कशासाठीं रे ? चित्राचा विषयच तुला काय कमी पोटभर पाहायला मिळतोय ? "

" काय फाजिल आहेस रे ? " असं म्हणून श्यामानं त्याला ढकलल्यासारखं केलं, आणि मग तीं सारींच हसल्यामुळें संभाषणांत उत्पन्न झालेला क्षणापूर्वीचा कडवटपणा नाहींसा होऊन त्यांनीं एकमेकांचा आनंदानं निरोप घेतला.

मात्र अशोकच्या त्या फटकळ बोलण्याचा विषय श्यामाच्या मनांतून पुरता गेला नव्हता असं दिसलं. स्टूडिओंत गेल्यावर कांहीं वेळ ती आपल्या जागेवर निश्चल व स्तब्ध बसली, पण मग तिच्या चर्येवरील रंगछटा ध्यानांत घेण्यासाठीं अशोक वर मान करून तिच्याकडे पाहत असतांना ती मधेंच त्याला म्हणाली,

" कधीं कधीं तूं अगदीं तोडून बोलतोस. कॉंग्रेसवाल्यांच्या कृत्यांबद्दलची तुझी नापसंती आहाराबाहेर जाऊं देतोस तूं एखादे वेळीं. कॉंग्रेसवाल्यांना चित्रकलेंतलं कांहीं कळत नाहीं असा एकदम सामान्य शेरा मारलास."

अशोक म्हणाला, " माझ्या बोलण्यानं प्रभाकरला राग आला असेल अशी तुझी कल्पना असेल तर सोडून दे. आणखी एकदम सामान्य शेरा मारण्याबद्दल म्हणशील तर असले शेरे हे कॉंग्रेस-वाले लोक प्रतिपक्षावर कांहीं कमी मारीत नाहींत. हिंदु महा-सभेबद्दल हे लोक उठल्यासुटल्या कशा तऱ्हेनं बोलतात तें माहीतच आहे कीं तुला."

" तें झालं, पण आपलं—" असं पुटपुटून श्यामा गप्प राहिली.

अशोकहि मग कांहीं वेळ सर्वस्वीं आपल्या कामांत मग्न होऊन स्तब्ध राहिला. पण नंतर आपल्यासमोरच्या चित्रफलकावरची दृष्टि तशीच ठेवून तो तिला म्हणाला,

" कॉंग्रेस मुसलमानांचे वाजवीपेक्षां अधिक लाड पुरविते अशी टीका सावरकर करतात ती या लोकांना झोंबते. पण यांचीं एकेक कृत्यं पाहिलीं कीं सावरकरांचं म्हणणं बरोबर आहे असंच वाटूं लागतं. 'वंदे मातरम्' या राष्ट्रगीतांतले कांहीं शब्द म्हणे मुसलमानांच्या भावनांना दुखविणारे आहेत; आणि तशी मुसलमानांनीं हाकाटी

केल्याबरोबर त्या गीताचे शेवटचे दोन चरण गाळावेत अशी सूचना आमचे जवाहरलाल नेहरूसुद्धां करायला तयार. राष्ट्रगीता-प्रमाणेंच राष्ट्रभाषेच्या बाबतींतहि मुसलमानांनीं शिरजोरी करावी, आणि कॉंग्रेसच्या लोकांनीं तिच्यापुढें डोकं वाकवावं असं चाललंय. परवां तूं नव्हतीस माझ्याबरोबर, प्रभाकरशीं भांडून असं निरुत्तर करून टाकलं त्याला मी कीं ज्याचं नांव तें. अहमदाबादला नाताळांत हिंदुमहासभेचं जें एकोणिसावं अधिवेशन झालं त्यावरून माझा अन् त्याचा वाद सुरू झाला. हिंदुमहासभेची चळवळ कॉंग्रेसची प्रतिष्ठा खची करणारी आणि त्यामुळें पर्यायानं सरकारचे हात बळकट करणारी चळवळ आहे हें कॉंग्रेसवाल्यांचं नेहमींचं विधान जेव्हां प्रभाकरानं केलं, तेव्हां मी मुसलमानांच्या बाबतींत-त्या कॉंग्रेसच्या दुबळेपणाचं यथास्थित वर्णन त्याला सुनावलं; अन् त्याला शेवटीं सांगितलं, हें पाहा महात्मा बंडोपंत, मुसलमानांचा प्रत्येक बाबतींतला शिरजोरपणा कॉंग्रेसच्या चुचकारण्यामुळें अधिक अधिकच वाढत चाललेला जोंपर्यंत आम्हांला ढळढळीत दिसतो तोंपर्यंत हिंदुमहासभेच्या लढाऊ वृत्तीकडे आम्हां हिंदूंच्या अंतःकरणाची गुप्त का होईना ओढ राहणारच, आणि हिंदुमहासभेचा पक्ष दिवसेंदिवस अधिकाधिक प्रबळ होणारच. खरंच श्यामा, परवांच्या अहमदाबादच्या भाषणांत अध्यक्ष सावरकर यांनीं जें 'सूत्र' सांगितलं त्यांत काय चुकलं मला कळत नाहीं. मुसलमानांना उद्देशून ते म्हणाले, 'तुम्ही आमच्याशीं सहकार्य कराल तर तुमच्याबरोबर, न कराल तर तुमच्यावांचून, आणि विरोध कराल तर तुम्हांला निपटून काढून आम्ही हिंदु आमच्या स्वातंत्र्याची वाट चालत जाणार!' मला तरी या सूत्रवाक्यांतला प्रत्येक शब्द बरोबर वाटतो. सावरकरांच्या भाषणाचा वृत्तान्त मीं वर्तमानपत्रांतच

वाचला. परंतु त्यांतले हे अखेरचे उद्‌गार वाचतां वाचतां त्यांतली वीरश्री माझ्या अंतःकरणापर्यंत पोंचली अन्‌ मी सद्गदित झालों."

श्यामा त्याचं तें भाषण अगदीं एकाग्र चित्तानं ऐकत होती, व तो गप्प झाला तरी बराच वेळ ती कांहीं बोलली नाहीं. मग तिनं एकदम विचारलं, "सावरकरांचं भाषण मला एकदां ऐकायचं आहे रे!"

"ऐकण्यासारखं बोलतात." तो म्हणाला, "भाषणांत तर्क-शुद्धतेपेक्षां भावनाच अधिक असते हें खरं, पण मोठा वक्ता यांत शंका नाहीं! Great!..."

श्यामानं विचारलं, "कॉंग्रेसचं मंत्रिमंडळ अस्तित्वांत येण्याच्या आधीं त्यांची सुटका झाली, नाहीं?"

"हो, तेव्हां झाली म्हणूनच झाली. मला नाहीं वाटत कॉंग्रेसच्या लोकांनीं सावरकरांना मुक्त केलं असतं."

श्यामाला एकदम आपल्या वडिलांची आठवण झाली, व तिनं प्रश्न केला, "म्हणजे ज्या देशभक्तांचे मार्ग भिन्न होते अशांचं पूर्वचरित्र विसरून त्यांना स्वातंत्र्य द्यायला कॉंग्रेस सरकार तयार होणार नाहीं म्हणतोस?"

"मला नाहीं वाटत हे लोक तयार होतील. यांची 'सत्य'-नारायणाची पूजा अन्‌ अहिंसेचे मंत्र चालू राहिले पाहिजेत ना!"

हें ऐकून श्यामा एकदम स्तब्ध झाली. तिच्या मनांत आलं, सध्यां कॉंग्रेसच्या हातीं सत्ता असल्यामुळें आपल्या वडिलांना परत मायदेशाला यायचं असलं तर सरकारी प्रतिबंध होणार नाहीं, ही आपली आशा खोटीच कीं काय?...

चित्रासाठीं अशोकसमोर बसल्याबसल्या ती पुष्कळदां आपल्या वडिलांबद्दल विचार करीत राही; आणि योशिदाची पहिली भेट

झाल्यापासून आतांपर्यंतच्या दीड महिन्याच्या अवधींतल्या कांहीं कांहीं गोष्टींच्या आठवणी तिच्या मनांत उभ्या राहत....

तिच्या सांगण्यावरून योशिदानें शिकागो येथील आपल्या एका मित्राला तार करून तिलकानंदांचा ठावठिकाणा काढून कळविण्याची विनंति केली होती. पण योशिदाच्या त्या मित्राकडून बरेच दिवस कांहींच उत्तर आलं नव्हतं. अखेर 'दि ग्रेट निपॉन सर्कस'चा मुक्काम मुंबईहून हालला, त्या दिवशीं योशिदाची भेट घ्यायला ती गेली, तेव्हां तो तिला म्हणाला होता,

"तूं निराश होऊं नकोस. माझ्या मित्राचं कांहीं तरी उत्तर केव्हां तरी येईल याबद्दल मला संशय नाहीं. आमचा मुक्काम कुठेंहि असला तरी त्याचं पत्र माझ्या हातीं पडल्याबरोबर मी तें तुझ्याकडं धाडून देईन."

योशिदाची ओळख झाल्यापासून तो तिच्याशीं फार प्रेमळपणानं वागला होता. त्याच्याशीं अखेरचं हस्तांदोलन करतांना श्यामाच्या डोळ्यांत आसवं चमकलीं. "बराय्, ओळख ठेवा" असं म्हणतांना तिचा स्वर कंपित झाला होता, आणि तिचा हात अलगद पण तिच्या लक्षांत येईल इतका दाबून त्यानं म्हटलं होतं, "वा! हें काय सांगणं? तुझ्या रूपानं हिंदी स्त्रीचा एक उत्कृष्ट नमुना माझ्या परिचयाचा झाला आहे. हिंदुस्थानांत माझ्या आयुष्याचे जे दिवस गेले त्यांच्या मनाशीं आठवणी करीत म्हातारपणीं मी आपल्या बंगल्यापुढच्या बागेंत आरामखुर्चीवर पडेन, तेव्हां दोन व्यक्ति माझ्या डोळ्यांपुढें वारंवार उभ्या राहतील. एक तुझे वडील, आणि दुसरी तूं!..."

मग तो तिच्याबरोबर हॉटेलचा जिना उतरून खालीं आला

होता. मोटारींत बसतां बसतां त्यानं तिच्या हातीं एक पार्सल दिलं होतं, व हसत म्हटलं होतं, "माझी आठवण."

दुसऱ्याच क्षणीं तिची मोटार फर्र्दिशीं आवाज करून चालू झाली होती.

रहदारींत मिसळून दिसेनाशा होणाऱ्या त्या मोटारींतून जातां जातां योशिदाच्या गाठीभेटींत दर वेळीं तिच्या मनांत आलेला विचार पुन्हा आला. या गृहस्थाची आपल्या वडिलांवर केवढी भक्ति! आपल्या वडिलांच्या देशभक्तीबद्दल व कृतनिश्चया-बद्दल याला केवढा आदर! असा हा आपला पिता आपल्या प्रत्यक्ष डोळ्यांना केव्हां दिसेल?...

अशा अनेक आठवणींत श्यामा मग्न झाली कीं तिला अशोकचं व चित्राचं भान उरत नसे आणि तिच्या तोंडून एक शब्ददेखील बाहेर पडत नसे. आणि अशा वेळीं अशोकदेखील संभाषण अगदीं बंद करून आपलं काम अगदीं झपाट्यानं करीत राही. तें करतांना एकदम खूष असल्याप्रमाणें त्याची चर्या दिसूं लागे. उत्कृष्ट गायकाची मैफल ऐन रंगानं जमली कीं, अनंत स्वरमाला त्याच्या अंतश्चक्षूंपुढें उभ्या राहतात, आणि जिकडे आपण आपला गळा फेकूं तिकडे स्वरांनीं खडं झालंच पाहिजे असं त्याला वाटूं लागतं. चित्रकारालाहि रेषा व रंग यांच्या बाबतींत अशाच स्वरूपाचा जो अपूर्व अनुभव कधीं कधीं येतो तो अशोकला अशा वेळीं येई.

त्याला वाटे, श्यामाला म्हणावं, "प्रसन्नता, धैर्य, उल्हास, उत्सुकता इत्यादि सर्व छटा दाखविणारा जो भाव मला या चित्रांत हवा आहे तो या वेळीं तुझ्या चेहऱ्यावर अगदीं मजेदार रीतीनं

व्यक्त झाला आहे. कसला विचार करते आहेस तूं या वेळीं, श्यामा ?"

परंतु तेवढीसुद्धां व्यग्रता त्याला नको असे. तो अगदीं पूर्ण समाधानानं तिच्या चेहऱ्याकडे निरखून पाही, व त्याचा प्रश्न झपाट्यानं काम करीत राही.

  

रात्रीं अकरा वाजता गाण्याचा कार्यक्रम आटपून स्टेशनच बंद झालं तेव्हां श्यामानं रेडिओची चावी डावीकडे फिरविली व ती मनाशीं म्हणाली, आतां निजावं झालं. दिवाणखान्यांतली तिची चाहूल ऐकून पलीकडच्या खोलींतून डॉक्टरकाकांनीं तिला विचारलं, "अशोक अजून नाहीं आला का ग ?"

"नाहीं, आज स्वारी कुठल्या भानगडींत आहे कुणास ठाऊक. सकाळपासून नाहींसा झाला आहे."

"घराची आठवण असते कधीं त्याला ?" पलंगावर वाचीत पडल्या पडल्या डॉक्टरनीं टीका केली.

रेडिओच्या टेबलावर ठेवलेलं आपलं पुस्तक उचलून घेतां घेतां श्यामा म्हणाली, "त्याला घरची आठवण राहील अशी कांहीं व्यवस्था करा आता लवकर, काका."

"हं." असं म्हणून डॉक्टर हसले तें तिला ऐकूं आलं. ती स्वतः हसली व दिवाणखान्यांतल्या मधल्या झुंबराचे दिवे मालवण्यासाठीं तिनं बटणाकडे हात वर केला.

पण तितक्यांत टेलिफोन वाजला तेव्हां तिनं हात मागें घेतला, आणि टेलिफोनजवळ जाऊन ती बोलूं लागली,

" हलो, कोण, अशोक ? अरे तूं आहेस कुठें दिवसभर ? "

तिकडून तो म्हणाला, " या क्षणापर्यंत जमिनीवर होतों, पण आतां अंतराळांत आनंदातिशयानं तरंगतों आहे."

" बोलतो आहेस कुठून ? "

" ढगांच्या पाठीवर बसून विहार करतां करतां कुठून तरी."

" सारे आधुनिक कवि तुझ्या अंगांत संचरले आहेत कीं काय ? सरळ बोलशील का जरा ? "

" श्यामा, मी फार फार आनंदांत आहे या वेळीं, अन् माझ्या आनंदाचा अर्धा वांटा तुझा आहे."

" अजून गडकऱ्यांच्या नाटकांतल्या नायकाप्रमाणेंच बोलतों आहेस तूं. नीट सांग ना काय तें."

" बरं नीट सांगतों, ऐक. प्रदर्शनाच्या बक्षीस कमिटीचा निकाल आतांच ठरला. माझ्या चित्राला—म्हणजे तुझ्या चित्राला सबंध प्रदर्शनांतलं पहिलं बक्षीस ' गोल्ड मेडल् ' मिळालं."

" होय ? ". श्यामाचा श्वास क्षणभर रोखला गेला, " केवढी आनंदाची बातमी रे ! आतां लवकर ये घरीं तर. तुझं प्रथम अभिनंदन करण्याचा मान मला मिळाला पाहिजे.".

" त्यासाठींच तर तुला तावडतोब टेलिफोन केला. कारण माझ्याइतकंच तुझंहि अभिनंदन करावं अशी ही गोष्ट आहे, अन् तें प्रथम करण्याचा मान मला हवा होता. ताई, Congratulations."

" हो हो. पण आतां तावडतोब घरीं ये. मी वाट पाहत बसतें. सगळी हकीगत तुझ्याकडून केव्हां कळेलसं झालं आहे."

"येतोंच. पण या बक्षिसाबद्दलची एक गंमत आत्तांच सांगितल्याशिवाय राहवत नाहीं मला... हं... खरंच गमतीची गोष्ट आहे. कॅांग्रेसवाल्यांना या कलेंतील कांहीं अक्कल नाहीं असं तूंसुद्धां म्हणायला लागशील ती ऐकून.

"होय ? अगबाई ! सांग तरी."

"हें बघ, बक्षीस देणाऱ्या कमिटींत एक गुजराथी गृहस्थ होते. हे स्वतःला चित्रकला, शिल्पकला, नृत्यकला इत्यादि सगळया कलांतले दर्दी समजतात. गांधींच्या अनुयायीपणाचा धंदा हे करीत असल्यामुळें गांवठी इंग्रजी पत्रांतून कलेबद्दलचे अचाट मूर्ख-पणानं भरलेले यांचे लेख अधूनमधून प्रसिद्ध होत असतात. प्राइझ कमिटीच्या सगळया सभासदांनीं माझं चित्र सर्वोत्कृष्ट ठरविलं, पण या शहाण्यानं विरुद्ध मत दिलं. अन् तें कां, माहीत आहे का ?"

"कां ?"

"म्हणे या चित्रांतल्या स्त्रीच्या हातांत शस्त्र असल्यामुळें याला बक्षीस दिलं तर हिंसेच्या तत्त्वज्ञानाचा पुरस्कार केल्यासारखं होईल."

"कमाल आहे बाई !"

"आतां प्रभाकर भेटू दे उद्यां म्हणजे—"

श्यामा हसून म्हणाली, "त्यांच्याशीं कां बिचाऱ्यांशीं सदान् कदा तुझं भांडण ?"

"कां ?—तूं हलके हलके त्याचा कैवार घ्यायला लागलीस वाटतं ?"

"हो हो. इकडे ये म्हणजे सांगतें चांगलं. अच्छा ! ए, Congratulations हं. लवकर येतोस ना ? हं..." असं म्हणून तिनं टेलिफोन खालीं ठेवला.

रात्रीं जवळ जवळ दोन वाजतां ती आपल्या अंथरुणांत शिरली तेव्हां आनंदानं तिचं अंतःकरण अगदीं भरून गेलेलं होतं.

आणि दुसऱ्या दिवशीं तर तिचा आनंद हृदयांतून सांडावा अशी एक गोष्ट घडली.

योशिदाचं तिला पत्र आलं. त्यांत त्याच्या मित्राकडून आलेलं पत्र त्यानं धाडलं होतं. तिलकानंद शिकागो शहरींच असल्याचं त्या मित्रानं लिहिलं होतं व त्याचा समग्र पत्ताहि दिला होता.

तें सारं वाचून श्यामाला इतका विलक्षण आनंद झाला कीं, ज्या व्यक्तीला आपल्या हर्षातिशयांत समभागी करतां येईल अशी एकच व्यक्ति असावी व ती पांचशें मैलांच्या अंतरावर दूर चांदणी गांवीं असावी या गोष्टीचा तिला विषाद वाटला.

आनंदराव शिकागो शहरींच आहेत हें कळल्यावर काय करायचं तें तिनं आज कित्येक दिवसांपासून ठरवून ठेवलं होतं. तिनं आपली मनीबॅग घेतली आणि घरांत कुणालाहि न कळवितां ती बाहेर पडली.

तार-ऑफिसांत जाऊन तिथल्या खिडकीवरच्या कारकुनाला ती म्हणाली, " मला शिकागोला तार पाठवायची आहे, काय दर आहे ? "

शिकागोला तार धाडण्यासाठीं आलेली पहिलीच मुलगी दृष्टीस पडल्यामुळें तो कारकून तिच्याकडे विस्मयानं पाहत राहिला, आणि विस्मयाची वाट ओसरल्यावर त्यानं उत्तर दिलं,

" प्रत्येक शब्दाला एक रुपया अकरा आणे."

" असं ! "

श्यामानं बरोबर लिहून आणलेल्या तारेच्या मसुद्यांतले शब्द पाहिले. त्या कारकुनानं सांगितलेल्या दराप्रमाणें तिच्या तारेला

जवळजवळ चाळीस रुपये पडत होते. आपल्या बॅगमधल्या नोटा तिनं काढून पाहिल्या. पांचापांचांच्या पांचच नोटा होत्या त्या.

तिच्या त्या सर्व हालचालींकडे कारकुनाचं लक्ष होतं. तो तिला म्हणाला,

" तुम्हांला मोठी तार पाठवायची आहे काय ? "

तो आपल्याला सहाय करील अशी अपेक्षा वाटून श्यामा हसली व तिनं होकारार्थी मान हालविली.

तो कारकून म्हणाला, " मग 'लेटर टेलिग्रॅम' म्हणून धाडतां येईल तुम्हांला. पंचविसांपर्यंत शब्द असले तरी चौदा रुपये एक आणा इतकाच चार्ज पडेल."

" होय ? बरं झालं कीं, थँक यू."

ती घरीं परत आली ती अशा कल्पनेच्या आनंदांत, कीं ज्याचं गेल्या सतरा वर्षांत तिला दर्शनहि घडलं नव्हतं, ज्याच्या प्रतिज्ञेविषयीं तिला विलक्षण आदर व अभिमान वाटत होता, व जो पुन्हा भेटावा म्हणून वाटेल तें दिव्य करायला ती तयार झाली होती त्या आपल्या पित्याशीं हजारों मैलांच्या अंतरावरून तिनं आज संभाषण केलं होतं.

सबंध दिवसभर ती विलक्षण आनंदांत होती. काल रात्रीं अशोकनं स्वतःच्या आनंदाचं वर्णन करण्यासाठीं 'ढगांच्या पाठीवर बसून तरंगतों आहे' अशी जी उपमा वापरली होती तिचा तिला आज पूर्ण अनुभव येत होता, आणि आपल्या हृदयांतल्या आनंदाच्या ऊर्मि सावरतां सावरतां ती स्वतःला एकच प्रश्न पुनः पुन्हा विचारीत होती. आपल्या वडिलांची सारी हकीगत प्रभाकरला केव्हां अन् कशी सांगायची ?

ती सांगावीशी वाटण्याचा क्षण त्या रात्रींच येईल अशी तिला

कल्पना नव्हती. आणि त्यामुळें तो अकस्मात् आला तेव्हां तिच्या मनाचा गोंधळ उडाला.

रात्रीं प्रभाकर आला तेव्हां डॉक्टरकाका अगर अशोक कुणीच घरांत नव्हतं. तो म्हणाला, "चांदण्यांत फिरायला जाऊं जरा; येतेस?"

तिनं 'हो' म्हटलं आणि मग तीं दोघं मिळून मोटारींतून जुहूपर्यंत जाऊन तिथल्या किनाऱ्यावरील रेतींत बोलत बसलीं.

आज अगदीं निराळा प्रभाकर तिच्या दृष्टीस पडूं लागला व नेहमींहून अगदीं निराळ्या गोष्टी तो बोलत राहिला. प्रेमिकाचा सहवास श्यामाच्या अनुभवास प्रथमच येत होता व प्रणयासक्त तरुणाला शोभतील अशीं साधींसुधीं पण मोठीं सुखकारक बोलणीं ती प्रथमच ऐकत होती. त्यानं तिचा हात आपल्या हातीं घेतला तें तिला प्रथम कळलं नाहीं, आणि नंतर कळतांक्षणींच जरी तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले तरी तिनं तो काढून घेतला नाहीं.

प्रभाकर म्हणाला, "श्यामा, आज कित्येक दिवस एक मोठी आशा मीं मनाशीं धरली आहे. ती कोणती तें तुला माहीत आहे? ती तूं पूर्ण करशील काय?"

श्यामानं हळूच वर मान करून त्याच्याकडे पाहिलं. चंद्रप्रकाशांत त्याचा चेहरा आकर्षक दिसत होता. सिनेमाच्या स्टूडिओंत मुद्दाम प्रकाश पाडतात त्याप्रमाणें त्याच्या केसांवर चंद्रकिरणांचा झोत पडल्यासारखं तिला वाटलं. तिच्या मनांत आलं त्याला म्हणावं, "प्रभाकर, मीहि आज कित्येक दिवस मनाशीं एक मोठी आशा धरली आहे, ती तुम्ही पुरी कराल?"

पण ती कांहींच बोलली नाहीं.

प्रभाकर म्हणाला, "श्यामा, मीं तुला अतिशय सुखी करीन."

श्यामाला वाटलं, आपल्या वडिलांची सगळी हकीगत सांगून टाकावी व म्हणावं, "मला खरोखर सुखी करणारी एकच गोष्ट आहे. प्रभाकर, ती तुम्हा करूं शकाल!"

परंतु हेंहि ती बोलली नाहीं.

ती फक्त हलकेंच म्हणाली, "प्रभाकर, तुम्हीं मला थोडा अवधि दिला पाहिजे."



ती अत्यंत अनपेक्षित, व अत्यंत विस्मयकारक बातमी प्रथम मुंबईच्या संध्याकाळच्या इंग्रजी दैनिकांत जाड ठशांतल्या दोन तीन ओळींच्या रूपानं फडकली, आणि ' छे! असं कसं?... हें घडणं शक्य नाहीं... आपला तर बुवा यावर विश्वास बसत नाहीं!...' अशा प्रकारच्या उद्गारांची वाचकांची प्रतिक्रिया ओसरते न ओसरते तोंच दुसऱ्या दिवशीं सकाळीं सगळया वृत्त-पत्रांत ती बातमी पुष्कळच विस्तारानं छापून आली. मग मात्र संशयाला जागा राहिली नाहीं. जें अद्‌भुत व अशक्य वाटावं तें घडलं होतं; व असं कांहीं घडलं याबद्दल पूर्ण खात्री पटल्यावर ज्या अगतिक पण स्तिमित वृत्तीनं माणूस त्याकडे पाहतो त्या वृत्तीनं लाखों लोक त्या बातमीची चर्चा करूं लागले होते. लहान मोठीं खेडींपाडीं सोडून दिलीं तरी मोठ्या छोट्या शहरांतून वृत्त-पत्रांतल्या बातम्या रोजच्या रोज वाचणाऱ्या असंख्य लोकांचं जें जग या आपल्या बहुतांशीं निरक्षर देशांतसुद्धां आहे, त्या जगाच्या सांदीकोपऱ्यापर्यंत या प्रक्षोभक बातमीचा हादरा पोंचला. त्या सबंध

जगानं ती बातमी कळल्याबरोबर भुवया वर उचलल्या, उघडलेल्या तोंडावर हाताचीं बोटं टेकलीं, श्वास आवरून धरला, जें कळलं त्यावर विश्वास ठेवलाच पाहिजे हा अप्रिय विचार पोटांत लोटण्यासाठीं आवंढा गिळला, व मानेची मूक हालचाल केली. ती बातमीच अशी होती, कीं ज्या अंतःकरणांत मायदेशाच्या परतंत्र अवस्थेबद्दल थोडी तरी चीड आहे, ती अवस्था केव्हां व कशानं संपेल अशी अधीरता आहे, अन् ती संपविण्यासाठीं ज्यांनीं दिव्य केलं अशा व्यक्तींबद्दल आदराचं व कौतुकाचं थोडं तरी स्फुरण आहे, अशा अंतःकरणांना ती ऐकतांच धसकल्यासारखं व्हावं ! वीस वर्षांपूर्वी त्या अंतःकरणांना असाच एक विस्मयाचा धक्का बसला होता. परंतु त्या वेळचा विस्मय सर्वस्वीं सुखकारक होता; आजच्या विस्मयांत सामान्य माणसाच्या अनुभवाला तरी विषादाची व खिन्नतेची गंभीर छटाच अधिक येत होती ! जें झालं तें व्हायला नको होतं अशाच अस्पष्ट विचाराला वाट देणारा सुस्कारा त्या दिवशीं सकाळीं देशांत लक्षावधि ठिकाणीं लक्षावधि स्त्रीपुरुषांनीं सोडला असला पाहिजे ! पण लोकांच्या त्या सुस्काऱ्यांची पर्वा न करतां ती बातमी आणखी आणखी पसरतच होती ! जो जो माणूस ती वाची अगर ऐके तो धावत जाऊन कुणाला तरी सांगे--

" खड्गसिंग पुन्हा प्रगट झाला ! ऐकलंत ना ? "

" खड्गसिंग म्हणजे-- "

" होय, तोच, पंजाबांतला प्रसिद्ध क्रांतिकारक ! "

" होय ? "

" तो आपण होऊन सरकारच्या स्वाधीन झाला आहे ! "

" असं कसं होईल ?... "

" तो महात्माजींच्याकडे गेला. त्यांनीं त्याला सल्ला दिला कीं

माझं सत्य-अहिंसेचं व्रत पत्करायची ज्या अर्थी तुझ्या मनाची तयारी आहे, त्या अर्थी तूं विलंब न करतां सरकारच्या स्वाधीन व्हावंस हेंच सगळयांत उत्तम !"

"अन् त्यानं ते मान्य केलं ?...खड्गसिंगानं ?"

खड्गसिंगानं ?...

प्रत्येकाच्या तोंडून असा प्रश्नात्मक उद्गार बाहेर पडावा हें साहजिक होतं. कारण खड्गसिंगाची जी हकीगत देशाच्या राजकीय युद्धाच्या इतिहासांतल्या १९०८ ते १९१८ सालांच्या पृष्ठांवर लिहिली गेली होती ती फार वेगळी होती! खड्गसिंग महात्माजींपुढें प्रगट झाला, व त्यांच्या उपदेशानुसार सरकारच्या स्वाधीन झाला? ...वनराज मेंढपाळाच्या दारीं आला व सरकारी पांजरपोळांत आपण होऊन दाखल झाला असं म्हणण्यापैकींच ही गोष्ट लोकांना वाटण्यासारखी होती !

वंगभंगाच्या प्रचंड चळवळींत ज्या तरुणांनीं लोकांच्या अंतःकरणांत स्थान मिळविलं त्यांत पंजाबांतल्या खड्गसिंगाचं नांव होतं. १९०८ पासून १९१४ पर्यंत सरकारी दडपशाहीचा वरवंटा देशाच्या सबंध भूपृष्ठावर अगदीं निर्दयपणानं फिरविण्यांत आला, व हिंदुस्थानांतली राजकीय स्वातंत्र्याची चळवळ आतां पांच पन्नास वर्षें तरी डोकं वर काढणार नाहीं असं लोकांना वाटलं. पण महायुद्धाच्या काळांत "कोमागाता" बोटीचं प्रकरण झालं, व सनदशीरच नव्हे तर साहसी चळवळीची ज्योतहि मधल्या आठ वर्षांत विझली नव्हती याचा पुरावा मिळाला. "कोमागाता" प्रकरणांत खड्गसिंग पकडला गेला. त्याला कठोर शिक्षा झाली. पण १९१८ सालीं तो धाडस करून तुरुंगाच्या पहाऱ्यांतून निसटला !

आणि सरकारनं प्रयत्नांची शिकस्त केली तरी तो हातीं लागला नव्हता. तो जर्मनींत आहे, रशिआंत असेल, जपानमध्यें गेला असावा अशा चमत्कृतिपूर्ण बातम्या ज्याच्याविषयीं हिंदुस्थानांत वेळोवेळीं प्रसृत झाल्या होत्या, ज्याच्या नांवाभोंवतीं गूढ रम्यतेचं वलय लोकांनीं निर्माण करून कौतुकानं जपलं होतं, तो आतां वीस वर्षांनीं अकस्मात् मायदेशांत येऊन प्रगट झाला होता!... आणि सरकारच्या हवालीं झाला होता!—

वीस वर्षांपूर्वीं खड्गसिंग सरकारी पहारा तोडून नाहींसा झाल्याची बातमी प्रसिद्ध झाली तेव्हांहि लोकांना आश्चर्याचा विलक्षण धक्का बसला होता. पण त्या आश्चर्यांत कौतुकाचा व आनंदाचा गुप्त गाभा होता. आजचं आश्चर्य निराळ्या तऱ्हेचं होतं. त्याला विषादाची धार होती, त्यामुळें तें लोकांच्या अंतःकरणाला सलत होतं. एका दृष्टीनं पाहतां खड्गसिंगानं बंदिशाळेचे तट ओलांडून पसार होण्यांत जें साहस दाखविलं होतं तसंच आजच्या त्याच्या कृत्यांतहि मोठं धैर्य होतं. परंतु हें धैर्य सामान्यांच्या बुद्धीला पटण्यासारखं अर्थातच नव्हतं. त्यामुळें त्या दिवशीं हजारों वृत्तपत्रांत खड्गसिंगाची जी बातमी प्रसिद्ध झाली तिनं देश जितका चकित तितकाच खिन्न झाला असंच वर्णन करणं योग्य होईल.

श्यामानं खड्गसिंगाबद्दलची ती बातमी ज्या वृत्तपत्रांत वाचली तें सर्वस्वीं कॉंग्रेसच्या मतांचा व धोरणाचा प्रचार करणारं असल्यामुळें त्यांत त्या घटनेवर एक लहानसा अग्रलेखहि होता, व त्या लेखांत संपादकमहाशयांनीं खड्गसिंगाच्या नीतिधैर्याची प्रशंसा जरी केली होती तरी खड्गसिंगाचं तें वर्तन म्हणजे महात्माजींच्या निःशस्त्र अहिंसेच्या तत्त्वज्ञानाचा केवढा अभूतपूर्व प्रचंड विजय

होय हेंच अधिक विस्तारानं वर्णन करून सांगितलं होतं. त्या लेखांतलं प्रतिपादन चुकीचं म्हणण्याची सोयच नव्हती, परंतु आपल्या मनाला तें खोल कुठें तरी बोचत आहेसं श्यामाला वाटलं; आणि याचं कारण अर्थातच हें होतं, कीं वृत्तपत्रांतल्या त्या हकी-गतीवरून नजर फिरवितांना खड्गसिंगाऐवजीं आपण आपल्या वडिलांचीच हकीगत वाचीत आहोंत असा तिला सारखा भास झाला होता. त्या पंजाबी क्रांतिकाराइतकं आनंदरावांचं नांव त्यांच्या देशबांधवांना परिचयाचं नव्हतं. परंतु खड्गसिंगानं जी प्रतिज्ञा केलेली असेल तीच त्यांनीं किशोरावस्थेपासून केलेली नव्हती काय? आणि त्या प्रतिज्ञेच्या आचरणासाठींच देशत्याग पत्करला नव्हता काय?...श्यामा वर्तमानपत्र वाचतां वाचतां मनाशीं म्हणत होती, मग माझ्या वडिलांना मायदेशाला परत येऊन सुखरूप राहण्याचा हा एकच मार्ग आहे काय? शस्त्रावरील श्रद्धा टाकून अहिंसेच्या व्रताचा जाहीर अंगीकार केल्यानंच ते परत स्वदेशीं येऊं शकतील? हा मार्ग माझे वडील पत्करतील? त्यांच्या वृत्तीला तो पटेल? आणि न पटला तर? मग त्यांची माझी भेट होण्याचा संभवच नाहीं काय?... खड्गसिंगाच्या अकस्मात् प्रगट होण्यांत गांधींचा जो विजय होता तो तिच्या मनाला विशेष प्रिय वाटेना. निदान त्या विजयाबद्दलच वृत्तपत्राच्या संपादकांनीं इतकं विस्तारानं लिहावं हें तिला रुचेना...

त्यामुळें रात्रीं जेव्हां प्रभाकर डॉक्टरांच्या घरीं जेवायला आला व जेवण संपल्यावर डॉक्टर आणि प्रभाकर एका बाजूला आणि अशोक दुसऱ्या बाजूला, अशा रीतीनं खड्गसिंगाच्या बातमीबद्दल जेव्हां चर्चा सुरू झाली, तेव्हां प्रभाकरची बोलण्याची तऱ्हा पाहून तिचं मन आंतल्या आंत सारखं रुष्ट होऊं लागलं. अशोक

अगदीं कठोरपणानं काँग्रेसवर टीका करूं लागला. ती ऐकतांना अगदीं आपल्याच मनांतले विचार तो बोलत आहे असं तिला वाटलं, व मधेंच जेव्हां जेव्हां त्यानं तिच्याकडे पाहिलं तेव्हां तिनं आपल्या नजरेनं त्याला सांगितलं, बरोबर आहे तुझं, बोल आणखी.

"आतां सरकारनं खड्गसिंगाला पुन्हा शिक्षा ठोठावून जन्मभर जेलखान्यांत ठेवलं म्हणजे कसं होईल?" अशोकनं आवेशानं विचारलं. जो प्रश्न तो करीत होता तो त्या घटकेला देशांतल्या हजारों माणसांच्या मनांत येत असला पाहिजे असं त्याला वाटत होतं. "गेलीं वीस वर्षं ज्याला पकडण्याची आपली इच्छा फसून आपल्या सबंध शासनसंस्थेचा एक प्रकारें पराभव झाला तो सुखासुखी आपल्या हातीं पडलेला पाहिल्यावर सरकार अगदीं साधुवृत्तीनं वागेल अशी गांधींची कल्पना आहे कीं काय?"

"तशी महात्माजींची मुळींच कल्पना नाहीं." प्रभाकरानं उत्तर दिलं, व गांधींचा अपरंपार अभिमान बाळगणाऱ्या पुढाऱ्याला शोभेलशा आविर्भावानं तो म्हणाला, "हें बघ अशोक, तुम्हांला वाटतं त्यापेक्षां प्रत्येक गोष्टीचा फार खोलवर विचार महात्माजी करीत असतात, समजलास? खड्गसिंग सरकारच्या स्वाधीन झाल्यावर जन्मभर पुन्हा कैदी म्हणून राहण्याचं त्याच्या नशिबीं कदाचित् येईल हा संभव महात्माजींनीं ओळखला नसेल असं कसं रे तुम्हांला वाटतं? पण असल्या गोष्टींचा विचार महात्माजी करतात ते आपल्या स्वतःच्या तत्त्वज्ञानाच्या भूमिकेवरून, अन् त्यामुळें—"

"महात्माजींचं तत्त्वज्ञान! झालं! आतां पुढें वादांत कांहीं हशीलच नाहीं!" असं म्हणून अशोक मोठ्यानं हसूं लागला.

पण त्याच्या हसण्यानं न चिडतां प्रभाकर म्हणाला, "थट्टेवारी

नेऊं नकोस. खरोखरच गांधींच्या दृष्टीनं विचार करायचा तुम्ही लोकांनीं प्रयत्न केलात तर त्यांच्या प्रत्येक कृतींतील सुसंगति तुम्हांला दिसेल. आतां हेंच बघ, तुम्हां लोकांना वाटतं कीं सरकारनं खड्गसिंगाला मोठी शिक्षा ठोठावली तर त्या पापाचे धनी महात्माजी होतील. परंतु महात्माजींच्या विचारसरणीप्रमाणें पाहिलं तर खड्गसिंगाला तुरुंगवास घडला तरी महात्माजींना त्याचा खेद वाटण्याचं कारण नाहीं. एक तर असं, कीं त्यांनीं कांहीं खड्गसिंगाला माझ्याकडे ये आणि पश्चात्ताप व्यक्त कर असं आमंत्रण दिलं नव्हतं. तो स्वयंस्फूर्तीनं त्यांच्याकडे आला व तुम्ही सांगाल त्याप्रमाणें मीं उरलेलं आयुष्य घालविणार म्हणाला. अर्थात् महात्माजींनीं त्याला संरक्षणाचं वचन दिलं अन् सरकारच्या स्वाधीन करून विश्वासघात केला अशी तर मुळींच गोष्ट नाहीं ना? बरं, सत्य आचरण केल्यावर त्याचे जे कांहीं परिणाम असतील ते भोगायला तयार असलं पाहिजे ही महात्माजींची फिलॉसफी आहे. तेव्हां शिक्षा भोगण्याचा प्रसंग खड्गसिंगावर आला तरीसुद्धां मला नाहीं वाटत महात्माजींना पश्चात्ताप वाटावा असं त्यांत कांहीं आहे."

प्रभाकर जरा वेळ थांबला तेव्हां डॉक्टर हलकेंच म्हणाले, "पण मी सांगतों सरकार खड्गसिंगाला मुक्त करील. महात्माजींनीं त्याला सरकारच्या स्वाधीन होण्याचा सल्ला दिला तो कांहीं अगदींच गैरहिशोबी असेल असं माझं मन नाहीं मला सांगत. महात्माजींच्या एकेका वेळच्या वागण्याचा मी जों जों विचार करतों, तों तों मला तर असं वाटतं ते बिनहिशोबी कधींच वागत नाहींत. त्यांच्या प्रत्येक कृतींत अगदीं मुरलेल्या मुत्सद्द्याचा धोरणीपणा असतो."

अशोक एकदम हसला. तो काय बोलणार त्याची आधींच कल्पना येऊन श्यामाहि थोडीशी हसली. त्यानं तिच्याकडे पाहिलं व म्हटलं,

" गांधीभक्तांचं हें डबल तंत्र अजब आहे बुवा! एकीकडे गांधींचा साधूपणा, त्यांची सत्यभक्ति इत्यादीचं वर्णन करायचं, अन् दुसरीकडे लगेच वळून म्हणायचं, पण आमचे गांधी भोळे नाहींत हं! अगदीं पक्के आहेत ते! वारे वा!"

प्रभाकर म्हणाला, "गांधी साधु अन् मुत्सद्दी दोन्ही आहेत, का दोहोंपैकीं एक कांहीं तरी आहेत, का दोन्ही नाहींत हा प्रश्न आपण दूरच ठेवूं. कारण हा ज्याच्या त्याच्या दृष्टिकोनाचा प्रश्न आहे. माझं म्हणणं इतकंच, कीं गांधी बरेवाईट जसे आहेत तसे आहेत हें एकदां मान्य केल्यावर मग सरकारच्या स्वाधीन होण्याचा त्यांनीं खड्गसिंगाला सल्ला दिला तोच बरोबर ठरतो. त्याबद्दल त्यांना दोष देण्यांत काय अर्थ आहे? ज्या झाडाखालीं आश्रय घ्यायचा त्या झाडाचा जसा आकार असेल तशी सावली माणसाला मिळेल."

शेवटचे हे शब्द उच्चारतांना प्रभाकरची नजर श्यामाकडं वळली, व ज्या तऱ्हेचं त्यानं किंचित् हास्य केलं त्यावरून उघडच दिसलं कीं आपल्या त्या दाखल्याचं तिला कौतुक वाटेल अशी त्याची अपेक्षा होती.

श्यामा थोडीशी हसली, परंतु तें त्याच्या दाखल्याचं कौतुक करण्यापेक्षां त्यावरहि उत्तर आहे असं दाखविण्यासाठींच. ती म्हणाली,

" टिळक हयात असतांना खड्गसिंगासारखा एखादा माणूस

त्यांच्याकडे गेला असता, तर तूं सरकारच्या स्वाधीन हो असाच सल्ला त्यांनीं दिला असतां का? मला नाहीं वाटत."

प्रभाकर म्हणाला, "उगीच टिळकांचं नांव वादांत ओढण्यांत काय अर्थ आहे?"

अशोकनं झटकन उत्तर दिलं "अर्थ नाहीं कसा? आहे. खड्गसिंगाला गुप्त रीतीनं आपल्याजवळ ठेवून घेणं किंवा उघड-पणानं सरकारच्या स्वाधीन करणं, हे दोनच मार्ग गांधींना दिसले. परंतु याहून निराळा तिसरा मार्ग खरोखर नव्हताच काय?"

डॉक्टरनीं मधेंच विचारलं, "निराळा तिसरा मार्ग कोणता बुवा?"

"तिसरा मार्ग होता तर! गांधींनीं खड्गसिंगाला सांगायचं, बाबा, आजपर्यंत तूं जसा गुप्त राहिलास तसाच यापुढेंहि रहा. तुला मी आपल्याजवळ ठेवून घेऊं शकत नाहीं. तुला माझं अनत्याचाराचं तत्त्वज्ञान पटलं आहे म्हणतोस यांत मला आनंद आहे. तुला वाटेल त्या ठिकाणीं जाऊन प्रगट न होतां आजपर्यंत गुप्त राहिलास त्याप्रमाणेंच राहून माझ्या तत्त्वज्ञानाचं आचरण करतां येईल. हा मार्ग गांधींना कां बरं दिसला नाहीं?"

प्रभाकर आणि डॉक्टर दोघेहि स्तब्ध राहिले. अशोक व श्यामा यांनीं एकमेकांकडे पाहिलं. मग अशोक म्हणाला,

"त्याचं असं आहे प्रभाकर, गांधींना जगांतून शस्त्रच निपटून काढायचं आहे. देशांतल्या राजबंदींची मुक्तता करतांना त्यांच्या-कडून कोणतं आश्वासन घेण्यांत येत आहे तें पाहण्यासारखं आहे. हिंदुस्थान स्वतंत्र व्हावा अशी तळमळ गांधींना नाहीं असं कोण म्हणेल? परंतु त्यांची दृष्टि स्वदेशापेक्षां एकंदर जगावर आहे, आणि त्यांच्या आवडत्या तत्त्वाप्रमाणें जगाची नवी घडी बसवूं

पाहतांना देशाचा घात होतो तें त्यांना दिसत नाहीं. सशस्त्र अत्याचाराला त्यांनीं उत्तेजन द्यावं असं कुणीच म्हणणार नाहीं. परंतु देशांतल्या शक्य तितक्या स्त्री-पुरुषांना शस्त्रावरची श्रद्धा अजीबात सोडायला लावण्याची त्यांची इच्छा आपल्याला तरी पटत नाहीं बुवा. सरकारनं आम्हां हिंदी लोकांना निःशस्त्र केव्हांच करून टाकलं आहे. पण त्यांत आणखी भरीला गांधी आम्हां सर्वांना मनानं निःशस्त्र करूं पाहत आहेत !"

प्रभाकर म्हणाला, "नाहीं. मनानं बलिष्ठ करूं पाहत आहेत असं म्हण. शस्त्राचं साहाय्य न घेतांहि सत्यासाठीं लढतां येतं असं महात्माजींना वाटतं. यालाच ते आध्यात्मिक बल म्हणतात, अन् हें बल हिंदुस्थानांत वाढावं यासाठीं ते झटतात ! तूं कांहींहि म्हण अशोक, महात्माजींवर तुला विसंगतीचा आरोप सिद्ध करतां यायचा नाहीं !"

"तो आरोप मी करीतच नाहीं. निदान या प्रकरणांत. माझा आरोप निराळा आहे. तो असा कीं, जो शस्त्राचा धिक्कार करील त्यालाच मी देशभक्त म्हणेन अन् संरक्षण देईन असं गांधींनीं धोरण ठेवण्यांत देशाचा थोडा घात आहे."

"घात आहे ? तो कसा बुवा ?"

प्रभाकरचा तो प्रश्न ऐकतांच श्यामानं टेबलावर दोन्ही हातांचीं कोपरं टेकून पुढें वाकल्यासारखं केलं, व म्हटलं,

"मी सांगतें कसा तो. आज खड्गसिंग प्रगट झाला. पण त्याच्यासारखेच किती देशभक्त देशाबाहेर ठिकठिकाणीं असतील. आपल्या प्रिय मायदेशाला परत यायसाठीं ते उत्सुक असतील. ते नसले तरी त्यांच्या आप्तेष्टांना अन् मित्रांना वाटत असेल कीं, त्यांना घरीं येतां यावं. देशाच्या अर्ध्या पाऊण भागावर आज

कॉंग्रेसचं राज्य आहे तेव्हां त्या दूरदूरच्या देशभक्तांना वाटत असेल, आतां तरी आपल्याला मायभूमीचं दर्शन घडेल, आपण परत गेलों तर आपण सुरक्षित राहूं. पण कॉंग्रेस जर त्यांना म्हणूं लागली कीं, आम्हीं एक वेळ सशस्त्र साहसाची प्रतिज्ञा केली तें चुकलं असा पश्चात्तापाचा मंत्र जाहीरपणें उच्चारलात तरच तुम्ही आमचे, तर कसं व्हायचं ? त्या देशभक्तांनीं इकडे परत येऊन देशसेवा कशी करायची ?"

श्यामा इतक्या आवेशानं कां बोलत आहे तें फक्त डॉक्टरनाच थोडंसं कळण्यासारखं होतं. त्यांना आनंदरावांची एकदम जोराची आठवण झाली. त्यांचा चेहरा अतिशय गंभीर झाला. पण श्यामाच्या बोलण्यामागें कांहीं विवक्षित आशय असेल अशी त्यांचीहि कल्पना नव्हती. प्रभाकरला तर साहजिकच वाटलं, कीं तिचं बोलणं केवळ वादासाठींच होतं. म्हणून मनाशीं तिच्या शब्दांतील आवेशाचं आणि मुद्रेवरील भावाचं आश्चर्य करीत तो संथपणानं म्हणाला,

" पण त्यांनीं इकडे परत यायलाच पाहिजे असं कुणी सांगितलं आहे ? कॉंग्रेसच्या निशाणाखालीं त्यांना यायचं असेल, तर सशस्त्र प्रतिकाराच्या कल्पना त्यांनीं टाकल्याच पाहिजेत. आमच्या सत्तेचं संरक्षण तेवढं मिळावं अन् आपला जुना चुकीचा साहसी पंथ मात्र—"

पण त्याचं तें वाक्य पुरं झालं नाहीं.

कारण श्यामा एकदम म्हणाली " समजलं, समजलं !" आणि खुर्ची मागं लोटून ती जी उठली, ती अधिक एक शब्दहि न बोलतां अगर कुणाकडे नजरहि न टाकतां झपाट्यानं आपल्या खोलीकडे गेली !

तिनं खोलीचं दार लावून घेतलं त्याचा आवाज त्या तिघांना ऐकूं आला. परंतु "हें काय झालं ? ही अशी कां एकदम उठून निघून गेली ?" असं सूचित करण्यापुरतंदेखील एकमेकांकडे पाहण्याचं त्यांच्या जिवावर आलं.

  

"...अशोकनं तयार केलेल्या माझ्या चित्राचे फोटो काढलेले आहेत. त्यांतली एक कॉपी मी तुला पाठवूं शकेन. पण ती पाठवावीशी मला वाटत नाहीं. कारण अशोकनं चित्रांत रंगांची जी बहार केली आहे तिच्यांतच चित्राची खरी मौज आहे. अन् साध्या फोटोवरून तिची तुला काय कल्पना येणार ? शिवाय, टाउन हॉलमधल्या भव्य दिवाणखान्यांत शेंकडों चित्रांमधें माझं चित्र ठळक ठिकाणीं मांडलेलं, आणि 'प्रदर्शनांतील सुवर्णपदक मिळालेली सर्वोत्कृष्ट कलाकृति' असा छोटासा फलक त्याखालीं लावलेला हा थाट प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय तुला कसा समजणार ? तेव्हां तूंच इकडे यायला पाहिजेस आणि माझं चित्र प्रदर्शनांत जाऊन प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलं पाहिजेस. एखाद्या शनिवारींसुद्धां यायला तुला वेळ नाहीं काय ? काय सांगतेस ? अन् काय ग, दिवाळींत वसंतावर येवढी रुसली होतीस तो रुसवा अगदीं पार गेला वाटतं आतां ? वसंत अमुक म्हणाला, वसंतनं अमुक केलं याखेरीज तुझ्या पत्रांत दुसरा विषय नाहीं ! त्याला सोडून येववत नसेल तुला तर त्याला घेऊन—"

श्यामा पत्रांतलं तें वाक्य पुरं करीत होती तितक्यांत " ताई-साहेब " अशी हाक मारीत बाळू खोलींत आला.

तिनं पाठीमागें मान वळवून विचारलं, " काय रे ! "

" टेलिफोन आलाया तुमचा."

" च् ! काय मेला त्रास."

" प्रभाकरसाहेब हायती टेलिफोनावर."

तें ऐकतांच तिच्या चर्येवरचा त्रासिकपणा नाहींसा होऊन ती हसेल अशी बाळूची कल्पना होती. त्यामुळें तिनं कपाळाला आणखीच आठ्या घातलेल्या पाहून त्याला आश्चर्य वाटलं.

श्यामाच्या मनांत आलं, 'मी घरांत नाहीं म्हणून सांग त्यांना' असं बाळूला सांगावं. पण लगेच तिनं विचार केला, प्रभाकरशीं बोलण्याची आपली इच्छा नाहीं हें जरी खरं तरी त्या गोष्टीचा गडीमाणसाला संशय यावा असं वागणं बरं नव्हे. शिवाय, काल तिनं आपला निर्णय कळविण्यासाठीं जें पत्र प्रभाकरला धाडलं तें धाडीत असतांनाच ती जाणून होती कीं, त्या पत्रानंतर त्याच्याशीं त्याबद्दल आपल्याला बोलावं हें लागणारच. प्रत्यक्ष भेट होऊन बोलावं लागण्यापेक्षां त्यानं टेलिफोन केला होता हें एका अर्थी बरंच होतं. प्रत्यक्ष समोरासमोर ज्या गोष्टींचा उच्चार करणं कठीण वाटतं त्या टेलिफोनवर बोलतांना अवघड वाटत नाहीं....

" त्यांना सांग आलेंच म्हणून," ती म्हणाली.

बाळू निघून गेला. फाउन्टन पेनच्या तोंडावर टोपण फिरवून बसवितांना अन् उषाक्काला लिहिलेलं अपुरं पत्र टिपून पॅडमधें ठेवतांना तिच्या मनांत येत होतं, प्रभाकर फोनवर काय म्हणेल... आपण त्याच्याशीं काय बोलायचं...

एक अप्रिय संभाषण तिला पार पाडायचं होतं.

त्या दिवशीं रात्रीं खड्गसिंगाबद्दलच्या चर्चेच्या वेळीं प्रभाकरनं जे विचार प्रगट केले त्यांचा तिला राग आला होता. त्याची ती विचारसरणी सुसंगत आहे कीं नाहीं तें पाहण्याइतकं तिचं मन स्थिर राहणं कठीण होतं. कॉंग्रेसनं संरक्षण दिलं तर आपल्या वडिलांना परत येतां येईल, अन् तें संरक्षण प्रभाकरमार्फत मिळवतां येईल, अशी आशा तिनं उराशीं धरली होती. ती आशा सफल झाली असती तर प्रभाकरबरोबर विवाहित होऊन एक प्रकारचं वैफल्य आयुष्यभर पतकरायलाहि तिनं आपलं मन तयार केलं होतं. परंतु, खड्गसिंगाविषयीं बोलतांना प्रभाकरनं जे उद्‌गार काढले ते ऐकून आपल्या आशेवर अन् मनाच्या तयारीवर आघात होत आहे तसं तिला वाटलं. अहिंसेच्या बाबतींत कॉंग्रेस किती हटवादी आहे, अन् त्या हटवादाशीं प्रभाकर किती एकरूप झाला आहे तें त्याच्या वाक्यागणिक तिला दिसून आलं. ती मनाशीं म्हणाली, हे कसचे माझी आशा सफळ करणार ? ...अन् माझ्या वडिलांची हकीगत यांना सांगून तरी काय उपयोग ? ...आणि 'पण त्यांनीं इकडे यायलाच पाहिजे असं कुणी सांगितलं आहे ?' हा त्याच्या तोंडचा प्रश्न ऐकल्यावर तर तिला त्याचा रागच नव्हे तर तिरस्कार आला होता, आणि आपण त्याला कांहीं तरी भलतं बोलून जाऊं असं जेव्हां तिला वाटलं तेव्हा एकदम उठून ती आपल्या खोलीकडे निघून गेली होती !

दुसऱ्याच दिवशीं ती त्याला पत्र लिहिणार होती. पण तो गुजराथकडे दौऱ्यावर गेल्याचं तिला कळलं म्हणून ती चार पांच दिवस थांबली होती. तो परत येतांच त्याला तें मिळावं म्हणून तिनं काल तें धाडलं होतं.

आणि आतां तो टेलिफोनवर बोलणार होता. तो काय म्हणेल, आपण काय म्हणूं, याबद्दल तर्क करीतच ती दिवाणखान्यांत गेली.

" हलो ! मी श्यामा बोलतें आहे... "

त्यानं आवंढा गिळला त्याचा स्पष्ट आवाज तिला ऐकूं आला. मग तिनं ऐकलं, " बंगल्यांत कोण कोण आहे ? "

" डॉक्टरकाका आज इथें नाहींतच. अशोक जेवण आटपून सिनेमाला गेला आहे."

" तूं ? "

" मला नाहीं जावंसं वाटलं."

" तूं एकटीच आहेस तर ? "

" तें कां ? काकू आहेत कीं तिकडे आपल्या खोलींत."

" त्या असेनात... श्यामा, मी येऊं का तिकडे ? " त्याच्या आवाजांत तीव्र आतुरता होती.

" नको." श्यामा दृढ स्वरानं म्हणाली.

" मला कांहीं विचारायचंय् तुला."

" मला माहीत आहे. पण मीं पत्रांत लिहिलं तेंच अखेरचं समजा."

अशा कठोरपणानं ती आजपर्यंत कधीं कुणाशीं वागली नव्हती. त्यामुळें त्या तसल्या बोलण्याचे तिला अगदीं श्रम होत होते. तें संभाषण केव्हां संपेल असं तिला झालं होतं. पण स्वतः टेलिफोन बंद करण्याचा तिला धीर होत नव्हता.

" श्यामा ! " प्रभाकर म्हणाला, " मला विसरून जा असं तूं म्हणतेस. पण तुला विसरणं फार कठीण आहे."

देशभक्तांनीं आपल्या सशस्त्र प्रतिकाराच्या प्रतिज्ञा विसराव्या असं म्हणणारे तुम्हीच का हें बोलत आहांत, असे शब्द श्यामाच्या अगदीं ओठांवर आले होते. पण तिनं ते बाहेर पडूं दिले नाहींत. ...तसं बोलण्यापासून काय फायदा होता ? ...ती स्तब्ध राहिली.

" श्यामा, मला प्रेमाचा कधीं अनुभव नव्हता. पण तुझ्या सहवासांत... श्यामा, तुला विसरून जाणं शक्य नाहीं मला. तूं मला सहज विसरूं शकशील ? ... "

" मी प्रयत्न करणार आहे."

" पण हें कशासाठीं ? "

" तें मला सांगतां येणार नाहीं. सांगितलं तरी तुम्हांला कळायचं नाहीं. तुम्हांला मीं त्या पत्रांत लिहिलं तेंच बरोबर आहे."

" पण श्यामा, माझं ऐक. आणखी कांहीं दिवस—"

" No, आपण एकमेकांना विसरावं हेंच उत्तम. मी मुळीं आतां इथून जाणार आहे. "

" कुठें ? "

" चांदणीला, पुण्यास, कुठें तरी."

" श्यामा, असा वेडेपणा...हें बघ—"

" आतां अधिक बोलवत नाहीं मला. 'गुडबाय'—"

तिनं टेलिफोन बंद केला, व आपल्या खोलींत जाऊन अंथरुणा-वर अंग टाकलं !

९

अशोकनं संपत आलेल्या सिगरेटचा शेवटचा झुरका जोरानं ओढला, अन् मग तें जळतं थोटुक चिमटींत धरून अशा कांहीं आविर्भावानं फुटपाथवर आपटलं, कीं जणूं त्याला म्हणायचं होतं, शीः! बस झालं! फरशीवर पडलेल्या त्या तुकड्यांतून अखेरचं एक धूम्रवलय बाहेर पडून हवेंत तरंगलं, अन् दुसऱ्याच क्षणीं त्याचं तांबडं टोक विझून गेलं.

ज्या पानपट्टीच्या दुकानापुढें बसची वाट पाहत अशोक गेलीं दहा मिनिटं उभा होता, त्याचा पुरभय्या मालक एकीकडे पानं कातरतां कातरतां त्याच्याकडे पाहत होता. अशोकनं सिगरेट फेकलेली पाहून त्यानं साहजिक तर्क केला, कीं शेट बसवर चिडला असावा.

त्याचा तर्क खाटा नव्हता. अशोकला नको त्या नंबराच्या 'बसेस' दोन दोन मिनिटांनीं येऊन त्याच्यापुढें उभ्या राहून जात होत्या, अन् त्याला हवी ती बस कांहीं केल्या येत नव्हती. उद्यां तो कलकत्त्यास जाण्यासाठीं निघणार होता, व त्यापूर्वी

करायचीं कामं उरकण्यांत आज त्याचा सबंध दिवस गेला होता. आतां तो अगदीं थकून गेला होता. पण तरी मरीन लाइन्सवर राहणाऱ्या एका गृहस्थाची भेट घेतल्याशिवाय त्याला घरीं परततां येत नव्हतं, म्हणून बसनं त्या गृहस्थाकडे जावं अन् मग तिथून मरीन लाइन्सच्या रेल्वे स्टेशनवर जाऊन 'लोकल' गाडी गाठावी असं त्यानं मनाशीं ठरवलं होतं. पण कोपऱ्यावर ताटकळत उभं राहून त्यानं दहा बारा मिनिटं काढलीं तरी हवी ती बस तोंड दाखवीना. तो अगदीं त्रासून गेला.

परंतु त्यानं सिगरेटचं थोटुक ज्या आविर्भावानं फेकलं त्यांत केवळ बसवरचा राग त्याला व्यक्त करावयाचा नव्हता. सकाळ-पासून त्याच्या मनांत साचलेली एक निराळीच चीड त्या आविर्भावाच्या मागें होती.

उत्साह आणि आनंद वाटावा असं कांहीं तरी घडलेलं असावं, परंतु पुढें केलेला मिष्ट पदार्थाचा तुकडा स्वीकारण्याऐवजीं चोच दुसरीकडं फिरवणाऱ्या हट्टी पाखराप्रमाणें मनानं उल्हसित न होतां कशाच्या तरी सूक्ष्म वेदनेनं दुखत राहावं, असा चमत्कारिक अनुभव माणसाला कधीं कधीं येतो.

तोच आज अशोकला येत होता; आणि ज्या विचाराचं त्याला आंतल्या आंत दुःख होत होतं तो कांहीं केल्या मनावेगळा न करतां आल्यामुळें आनंदानं वागणंच त्याला नकोसं होऊन एक चमत्कारिक चीड त्याच्या मनांत दिवसभर साचत गेली होती.

कलकत्त्याच्या ज्या धनिक मारवाड्याच्या बंगल्यांतलीं चित्रं काढण्याचं काम त्याला मिळालं होतं, त्याच्याकडून त्याला तार आली होती, कीं आतां त्यानं ताबडतोब येऊन कामाला सुरु-वात केली पाहिजे. परवां निघतों असं त्यानं तारेनं उत्तर पाठविलं

होतं, व तिकडे जाण्यापूर्वीच्या तयारींत त्याचे दोन दिवस मोठ्या धांदलींत निघून गेले होते. कलकत्त्याचं तें काम त्याच्या मनाला आवडणारं होतं, अन् त्या कामांत त्याला पैसा तर पुष्कळ मिळायचा होताच, पण शिवाय त्यामुळें लौकिक वाढून तसलीं आणखी मोठालीं कामं मिळण्याचा संभव होता. अर्थात् तिकडे जाण्याची तयारी करतांना त्याची वृत्ति विशेष आनंदित अन् प्रसन्नच असायला हवी होती. परंतु तशी ती होईना, आणि आपल्या मनांत खोल कुठें तरी कसलं तरी दुःख टोचत आहे, तें अगदीं जिव्हाळ्याचं आहे, आणि त्या दुःखावरचा उपाय मात्र आपल्या हातीं नाहीं, या जाणीवेंतून त्याचं मन कांहीं केल्या सुटेना. मग त्या गोष्टीची त्याला आंतल्या आंत चीड वाटूं लागली होती.

त्याचं दुःख स्वतःविषयीं नव्हतं. श्यामा कसल्या तरी दुःखांत आहे असा संशय गेल्या दहा दिवसांत त्याला सतत आला होता, व तिनं आपल्याजवळ मन मोकळं करावं यासाठीं त्यानं केलेले प्रयत्न वाया गेले होते, या गोष्टीचं तें दुःख होतं.

श्यामाजवळ प्रभाकरानं आपलं प्रेम उघड केलं, तेंहि अशोकला त्याच्याकडून कळलं नव्हतं, अथवा तिनं त्याला अखेरचं नकाराचं पत्र पाठविलं तेंहि तिच्याकडून त्याला प्रत्यक्ष कळणं शक्य नव्हतं. परंतु निकट सहवासांत वावरणाऱ्या माणसाला प्रेमिकांतलीं रागालोभाचीं बोलणीं ऐकूंच यावीं लागतात असं थोडंच आहे ! प्रभाकरच्या प्रियाराधनाला श्यामा उत्तेजन देत होती तेव्हां ज्याप्रमाणें अशोकला तें समजलं होतं, त्याप्रमाणेंच तिनं त्याला नकार दिला असावा हें ओळखायला त्याला अवधि लागला नाहीं. प्रभाकर गुजराथचा दौरा संपवून आल्यानंतर तीन दिवस झाले तरी डॉक्टरांच्या बंगल्याकडे फिरकला नाहीं

व श्यामानंहि त्याचं नांव काढलं नाहीं, तेव्हाच त्याला संशय आला कीं कांहीं तरी बिनसलं असलं पाहिजे, आणि तात्पुरती रुसारुस नव्हे, तर तिच्याहून अधिक गंभीर असं कांहीं तरी घडलं असलं पाहिजे.

परंतु आपला हा तर्क खरा असावा याबद्दल जरी त्याची खात्री वाढत गेली तरी श्यामाच्या बोलण्या-चालण्यावर एकदम जी मोठी खिन्नता व रुष्टता आलेली त्याला पदोपदीं दिसूं लागली तिचा त्या तर्कानं उलगडा होत नाहींसं त्याला वाटलं. कारण तिनं प्रभाकरला नकार दिल्यानं त्याचं अंतःकरण विदीर्ण होणं शक्य होतं, परंतु तिला मोठं असह्य दुःख व्हावं असा संभव नव्हता. ती त्याच्या प्रेमांत सापडली नव्हती हें त्याला माहीत होतं. मग तिचं चित्त इतकं व्यथित कशानं होत होतं?...त्याला समजेना.

आणि त्यानं प्रयत्न केला असतांहि ती आपल्या मनांतलं दुःख त्याच्याजवळ उघड करावयास तयार नव्हती हें जेव्हां त्याला दिसून आलं तेव्हां तर त्याला जितका खेद तितकाच विस्मय वाटला. गेल्या अडीच तीन महिन्यांत तिचं त्याच्याशीं वागणं इतकं मोकळेपणाचं झालं होतं, कीं तिच्या या नव्या वृत्तीचा त्याला उलगडा होईना. आपल्या मनांतल्या साऱ्या गोष्टी कांहीं एक आडपडदा न ठेवतां तिच्याजवळ बोलण्याची त्याला आतां इतकी सवय झाली होती, व कोणताहि संकोच न ठेवतां ती आपल्या मनांतलं आपल्याला सारं सांगते अशी सुखकारक समजूत त्याच्या मनांत इतकी वाढत गेली होती, कीं ज्यावर आपल्या सहानुभूतीचा कांहीं उपयोग नाहीं असं एखादं दुःख तिच्या मनांत असावं, आणि तें आपल्यापासून लपवून ठेवणंच

तिला युक्त वाटावं या गोष्टीचं त्याला आश्चर्य वाटलं आणि दुःखहि झालं.

आणि एके दिवशीं जेव्हां श्यामा म्हणाली, "अशोक, मला आतां इथें राहावंसं वाटत नाहीं. मी आतां जाऊं का म्हणून डॉक्टरकाकांना विचारणार आहे." तेव्हां तो एकदम दचकला.

क्षणभर तिच्याकडे पाहून त्यानं म्हटलं, "म्हणजे ! एकदम हें काय काढलंस ?"

खिन्नपणें हसत ती म्हणाली, "एकदम कुठलं ? आज सात-आठ दिवस मी मनाशीं हाच विचार करतें आहे."

"पण त्यापूर्वी तर तूं असं म्हणत होतीस कीं, तुम्हां मंडळींना माझा कंटाळा येईपर्यंत मी राहणार आहे ! आम्हांला तर कांहीं कंटाळा आलेला नाहीं. तूंच कंटाळली असलीस तर निराळी गोष्ट. कंटाळा आला होय तुला ?"

"कंटाळा नाहीं– पण– जरा थारेपालट करावा असं वाटतं."

असं म्हणून तिनं आपली नजर त्याच्यावरून काढून खालीं वळविली, व ती एकदम स्तब्ध झाली.

कसली तरी तीव्र निराशा ती सहन करीत होती !...

चित्रकार या नात्यानं तिच्या श्यामल तेजस्वी मुखमंडलाचा त्यानं इतका अभ्यास केला होता, कीं निष्णात डॉक्टरला नाडीवर हात ठेवतांच रोग्याची प्रकृति कळते तद्वत् तिच्या चर्येवरचे सूक्ष्म भाव त्याला सहज ओळखतां येऊं लागले होते. तो मनाशीं विचार करूं लागला, अशा कोणत्या निराशेचं शल्य ही आपल्या-पासून लपवीत आहे ?

परंतु त्याबद्दल प्रश्न केला तरी ती खरं उत्तर देणार नाहीं हें त्याला आतां माहीत झालं होतं. म्हणून त्याबद्दल प्रश्न करण्या-

ऐवजीं ज्यायोगें तिला प्रसन्नता वाटेल असं कांहीं तरी बोलणं काढण्याच्या हेतूनं तो म्हणाला,

"तुला थारेपालट हवा ना? मग मला एक कल्पना सुचते. खरंच, माझं ऐक तूं."

श्यामानं फक्त दृष्टि वर करून त्याच्याकडे पाहिलं. तिची चर्या अजूनहि खिन्न व गंभीर होती.

तो किंचित् हसून म्हणाला, "तूं माझ्याबरोबर चल."

"कुठें?" ती हसली. परंतु अगदीं थोडं. जवळ जवळ कृत्रिमपणानं.

"कलकत्त्याला. तुला माहीतच आहे मला मिळालेलं तें चित्रांचं काम करण्यासाठीं मला तिकडे लवकरच जावं लागणार आहे. तूं माझ्याबरोबर आलीस तर मला तें फार सुखाचं होईल, आणि तुलाहि हवा तो थारेपालट आपोआप करतां येईल. आपल्या बाळूला वाटलं तर बरोबर नेऊं. मी आईला त्याबद्दल विचारीन. पण नको. आपण तिकडे बंगाली नोकरच ठेवूं. तुझ्या कादंबरींत घालण्याजोगं एक पात्र म्हणून त्याचा उपयोग तुला करतां येईल. आपण अगदीं बंगाली थाटानं राहूं. पायांत स्लिपर, मुंडेछाट रेशमी सदरा, अंगावर पातळ शालजोडी, अन् सारा बंगाली गबाळेपणा दाखविणारा सैल कासोटा घातलेलं सहा वारी धोतर, अशा थाटाचा पोशाख मी करीत जाईन. आणि डोळ्यांत सुरमा, तळपायाला अळत्याचा रंग, तोंडांत तांबूल, आणि सुंदर सुंदर किनारींचीं पातळं अशा ऐन वंगकन्येच्या थाटानं तूंहि राहा. आपण एक बंगाली आचारी ठेवूं. त्याच्याजवळून रसगुल्ला, संतोष अशीं वंगीय सूपशास्त्रांतलीं रहस्यं तूं शिकून घे; बस्–ताई, ठरलं. आपण दोघांनीं मिळून जायचं. Grand idea! ..."

परंतु तिला एकदम प्रसन्न करून टाकण्याचा त्याचा प्रयत्न कांहीं साधला नाहीं. ती हसली, परंतु नंतर मान हालवून म्हणाली,

" नको. तुझी कल्पना फार छान आहे; अन् असा योग पुन्हा केव्हां आला तर मी जरूर येईन तुझ्याबरोबर. पण या वेळीं नको, मला उत्साहच वाटत नाहीं. माझं मनच सुचित नाहीं ! "

अशोकला राहवेना. त्यानं विचारलं, " ताई, माझ्यापासून तूं काय लपवून ठेवतें आहेस ? तुला कसलं तरी तीव्र दुःख होतं आहे हें मला अगदीं स्पष्ट स्पष्ट दिसतं आहे. मला साहाय्य करतां येणार नाहीं का तुला ? मला सांगण्यासारखं नाहीं ? "

श्यामानं मान वळविली. वाऱ्यानं फुगलेल्या खिडकीच्या पडद्याकडेच ती पाहत राहिली. मग तिनं 'नाहीं' अशा अर्थी मान हलविली अन् एक निःश्वास सोडला.

अशोक कांहीं वेळ स्तब्ध राहिला व मग म्हणाला,

" बरं तें जाऊं दे. पण मी तुला उद्यां परवांच नाहीं जाऊं देणार इथून. कलकत्त्याच्या त्या गृहस्थांची तार आल्याखेरीज मी कांहीं जाणार नाहीं. तेव्हां मी आहे तंवर तूं इथें राहिलंच पाहिजेस ! "

त्याचं तें म्हणणें तिनं मान्य केलं होतं. ती राहिली होती. तिच्या मनाची तीव्र निराशा कशामुळें झाली होती तें तिनं त्याला सांगितलं नाहीं, त्यानं विचारलं नाहीं. परंतु तुझ्या अंतःकरणांतलं दुःख कशाबद्दल का असेना, तें कमी व्हावं यासाठीं मी हवं तें करीन असं न बोलतांहि तिला कळेल अशा प्रकारें अशोक वागत होता; आणि माझ्या दुःखाचं कारण तुला सांगतां आलं असतं तर बरं झालं असतं, पण मीं जरी तें न सांगितलं तरी तुझ्या प्रेमळ सहानुभूतीनं तें सुसह्य होत आहे असं श्यामा आपल्या बोलण्या-

चालण्यानं अशोकला दाखवीत होती. तिला जिथें बरं वाटेल अशाच मित्रमंडळींत तो तिला घेऊन जाई, किंवा तीं दोघं वर्दळीपासून दूर कुठें तरी फिरायला जात, किंवा घरींच बसण्याची तिनं इच्छा दर्शवली तर तो तिच्याजवळ बसून राही अन् ज्यायोगें तिचा उल्हास वाढेल अशा गोष्टींविषयीं बोलणीं काढी.

एकदां तो तिच्या खोलींत आला तो अगदीं हसत हसत, व हातांतली कांहीं तरी वस्तु पाठीमागें लपवून धरून त्यानं तिला विचारलं,"

" मी तुझ्यासाठीं काय आणलं आहे ओळख ! "

खुर्चीवर बसल्या बसल्या वळून श्यामा म्हणाली, " माझं फाउंटन पेन परवां जमिनीवर पडून मोडलं तुला माहीत आहे. तेव्हां नवं फाउंटन पेन आणलं असशील."

" अंहं. चुकलं." तो मान हालवून हसला.

" मग मी लिप् स्टिक लावीत नाहीं म्हणून तूं परवां माझी थट्टा केलीस, अन् तुला लिप् स्टिक लावायला लावीनच असं तूं म्हणालास. तेव्हां घेऊन आला असशील "—

" अंहं. चुकलं." तो अधिकच हसला.

मग ती चटकन् उभी राहिली व त्यानं मागें लपविलेली वस्तु ओढून घेण्यासाठीं हात पुढें करून ती म्हणाली,

" पाहूं पाहूं. मला नाहीं बाबा ओळखतां येत. दाखव ना!"

त्यानं हात पुढें केला तेव्हां त्याच्या हातांत एक कागद दिसला. तो हातीं घेऊन तिनं पाहिला तेव्हां ती आश्चर्यानें उद्गारली,

" म्हणजे रे काय ?"

कारण तो कागद म्हणजे साडेसातशें रुपयांचा चेक होता.

त्या चेकचा तिला कांहींच बोध होईना. ती गोंधळलेल्या चेहऱ्यानं त्याच्याकडे पाहत राहिली.

तो म्हणाला, "हे पैसे तुझे आहेत; संभाळ."

परंतु हात पुढें करण्याऐवजीं तिनं विचारलं, "माझे? ते कसे काय?

"प्रदर्शनांत मला गोल्ड मेडल् मिळालं ना, त्याच्या जोडीला रोख पैसेहि मिळायचे असतात, ते आज सकाळींच माझ्या हातीं आले."

"मग ते तुझे आहेत. माझे कसे?"

मान हलवीत अशोक म्हणाला, "चित्र काढणारा मी, पण फक्त काढणाराच. चित्रासाठीं तूं उभी राहिलीस त्या अर्थी तर तें चित्र तुझं आहेच; पण शिवाय मला स्फूर्ति देणारी तूं, तेव्हां तें तुझंच चित्र म्हटलं पाहिजे. मी हे पैसे माझे समजत नाहीं. ते तुझे आहेत."

श्यामानं हसून विचारलं, "आणि मीहि ते माझे समजायला तयार नाहीं असं म्हटलं तर?"

"तर— ताई, मला फार वाईट वाटेल."

त्याचा चेहरा एकदम बदललेला स्पष्ट दिसला. कधीं कधीं एकदम भावनावश होण्याचा त्याचा स्वभावधर्म तिला माहीत झाला होता. आपण त्याला दुखवीत आहोंत ही कल्पना श्यामाला असह्य झाली. ती झटकन् म्हणाली,

"किती वेडा रे तूं अशोक! बरं ते पैसे माझे आहेत पण तुझ्या-जवळ ठेवायला मीं दिले आहेत असं समज, अन् तुझ्याजवळ असूं देत. त्याचा काय नेम, एखादे वेळीं मला पैसे लागतीलहि. खूप

पैसे साठवावे आणि लांबच्या प्रवासाला जावं असं मला पुष्कळदां वाटतं."

" होय ? हरकत नाहीं. आपल्याला खूप पैसा मिळवतां येईल. तुझ्या चित्राच्या कॉपीज्‌ना आधींच दोन मागण्या आल्या आहेत, आणखी सुद्धां येतील. एकेका कॉपीचे पांचपांचशें रुपये सहज मिळतील आपल्याला. अन् येवढयानंच काय झालंय ? तुझ्यावरून आणखी चित्रं काढण्यासाठीं किती तरी कल्पना मला सुचलेल्या आहेत. महाराष्ट्रीय स्त्रीचं सौंदर्य मला अगदीं निराळ्या रीतीनं लोकांपुढें मांडायचंय. नदीच्या कांठीं कमरेवर घागर घेऊन उभी राहणारी सुंदर स्त्री मला रंगवायची नाहीं. महाराष्ट्रीय स्त्रीच्या ठिकाणचं तेज, निर्भयता, स्वातंत्र्याची प्रीति, पराक्रमावरची भक्ति इत्यादि गुण चित्रांच्या रूपानं जगाला दाखविण्याची माझी महत्त्वाकांक्षा आहे. तुझीं खूप चित्रं काढीन मी, अन् मग पैशाला काय तोटा ? मला तूं आपल्याबरोबर नेणार ना ? हं. आपण कोणकोणते देश पाहायचे ? "

" आधीं अमेरिकेला जाऊन शिकागो शहर गाठायचं."

" होय ? पण सारं सोडून शिकागोच कशासाठीं ? एखादी सर्व-धर्म परिषद् भरायची आहे अन् त्यांत तूं भाषण करणार आहेस कीं काय ? "

तिनं किंचित् हास्य करून दोन्ही ओठ जुळवून मान हाल-विली. परंतु तिची चर्या लगेच फार गंभीर दिसूं लागली. मग ती किती तरी वेळ गप्प राहिली. ती मनानं आपल्यापासून एकदम फार दूर सरकून कसला तरी विचार करूं लागलीसं अशोकला वाटलं.

तिच्या मनांत जी कांहीं निराशा सलत होती ती गांभीर्याच्या रूपानं अशीच एकदम प्रगट व्हावी, आणि मग उल्हासाची बोलणीं करून त्यानं तिच्या चित्तावर आणलेली प्रसन्नता नाहींशी व्हावी असा या पांच सात दिवसांत त्याला वरचेवर अनुभव आला होता. परंतु तिला स्वतःचं दुःख आपण पुष्कळच विसरायला लावलं हेंहि त्याला दिसत होतं, व आणखी थोड्या दिवसांत तिची वृत्ति आपण अगदीं पहिल्यासारखी आनंदी करूं अशी आशा त्याला वाटत होती.

पण तितक्यांत कलकत्त्याहून तार आली होती आणि जाण्या-वांचून त्याला गत्यंतर उरलं नव्हतं. श्यामाचं गुप्त दुःख त्याला पुरतं घालवितां आलं नव्हतं, आणि त्या दुःखाचं कारण त्याला अजून-हि समजलं नव्हतंच. त्यामुळें कलकत्त्यास जाण्यांत त्याच्या मनाला आनंद होत नव्हता. जाण्याची तयारी करतांनाहि त्याच्या मनांत खोल कुठें तरी सूक्ष्म खेद तरंगत होता तो या कारणानंच; आणि आज सबंद दिवसभर त्याच्या मनांत एक चमत्कारिक चीड साचत गेली होती तीहि यामुळेंच.

त्यानं बसची वाट पाहतां पाहतां कंटाळून सिगरेटचें थोटुक ज्या आविर्भावानं फूटपाथवर फेकलं त्याच्यामागें इतका सारा इतिहास होता!...

◆ ◆ ◆

अखेर त्याला हवी ती बस उजवीकडच्या दूरच्या कोपऱ्यावर वळलेली त्याला दिसली. तिच्यांत चढून बसण्यासाठीं तो तयार झाला.

तितक्यांत वर्तमानपत्र विकणारा एक पोऱ्या 'सेंटिनेऽऽल', 'इव्हिनिंग न्यूज' अशा आरोळया ठोकीत धावत येऊन त्याच्यापुढें थांबला.

अशोकनं त्याच्या हातांतला सेंटिनेलचा अंक घेतला व एक आणेली देतांना त्याला विचारलं,

" मराठी साप्ताहिकांपैकीं एखादं आहे का रे तुझ्याजवळ ? "

त्या पोऱ्यानं आपल्या खाकेंतील पुडक्यांत हात घालून भात्यांतला बाण उपसल्याप्रमाणें एक मराठी साप्ताहिक उपसून काढलं अन् त्याच्यापुढें धरलं. " पाहिजे ? "

त्या साप्ताहिकावर 'प्रतिज्ञा' असं नांव होतं.

अशोकनं तें घेतलं, खिशांतली आणखी एक आणेली काढून त्या पोऱ्याच्या हातावर ठेवली, आणि तितक्यांत बस येऊन उभी राहिली तिच्या पायंड्यावर उजवं पाऊल टाकून तो चढला.

रिकामी जागा पाहून बसल्याबरोबर त्याचा हात सिगरेट काढण्यासाठीं खिशांत गेला. पण तितक्यांत त्याच्या लक्षांत आलं कीं आपण पुढच्या भागांतल्या बाकावर आहोंत, इथें धूम्रपान करण्याची परवानगी नाहीं. त्यानं हात काढून घेतला, अन् मग 'सेंटिनल' थोडा वेळच चाळून मराठी साप्ताहिकाची घडी उलगडली.

'प्रतिज्ञा' हें नांव पाहतांच त्या पोऱ्याजवळून त्यानं तो अंक विकत घेतला होता त्याला थोडं कारण होतं.

सुमारें सवा महिन्यापूर्वी असाच बसची वाट पाहत तो

लॅमिंग्टन रोडवर उभा असतांना, पलीकडच्या छोट्या दुकानांत मांडलेल्या वृत्तपत्रांत 'प्रतिज्ञा' अशीं ठळक अक्षरं पाहून त्याला आश्चर्य वाटलं होतं. नवीन निघालेलं दिसतंय हें साप्ताहिक असं मनाशीं म्हणत त्यानं पाऊल पुढें टाकलं होतं, अन् तें विकत घेतलं होतं. त्याचा तर्क खरा होता. 'प्रतिज्ञे'चा पहिलाच अंक होता तो! त्याला तो आवडला होता, अन् घरीं गेल्यावर त्यानं तो श्यामाला दाखविला तेव्हां तिलाहि तो फार पसंत पडला होता. विशेषतः त्यांतील संघटनासंवर्धक चढाईची राष्ट्रसेवा करण्याची संपादकीय 'प्रतिज्ञा', ता. २ जानेवारीला लखनौ शहरीं मुलांच्या पतंगाच्या खेळावरून उद्भवलेल्या जातीय दंग्यावरील 'पतंगाच्या दोरीचा गळफास' या मथळ्याचा लेख, अन् लवकरच हरिपुरा येथें भरणाऱ्या कॉंग्रेसच्या अध्यक्षपदासाठीं सुभाष यांचीच— गांधींच्या इच्छेची पर्वा न करतां, इतकंच नव्हे तर कॉंग्रेसला हुकूमशाही वळण तुम्ही देऊं लागाल तर तुमचीहि अवज्ञा करणं आम्हाला भाग पडेल असं गांधींना स्पष्ट बजावण्यासाठींच— सुभाषबाबूंचीच निवड केली पाहिजे असं प्रतिपादणारा लेख त्याला अन् श्यामाला फार वाचनीय वाटला होता.

"एक नवीन चांगलं पत्र निघालंय पुण्याला म्हणायचं!" त्यानं उद्गार काढले होते.

श्यामा अंकाचं पहिलं पान चाळीत म्हणाली होती, "राष्ट्र-संजीवन—सर्व मार्गांनीं, सर्व साधनांनीं!—हें ब्रीदवाक्य पाहिलंस ना?"

"पाहिलं ना. त्याचा अर्थ असा कीं कॉंग्रेस अन् हिंदुमहासभा दोन्हीबद्दल आत्मीयता तर ठेवायची पण कोणाचेच अपराध छपवायचे नाहींत, असं धोरण हें पत्र ठेवणार आहे."

"म्हणजे कुणीच या पत्राला आपलं म्हणणार नाहीं!" श्यामानं शंका काढली होती.

" कुणाच्या तरी बुवाबाजींत सामील होऊन मेहरबानी मिळवण्यापेक्षां हें बरं. खरं म्हणशील तर अशा स्वरूपाचं पत्र हवंच होतं. तें हे निघालं, मला बरं वाटलं."

श्यामा म्हणाली होती, "नांव फारच छान आहे, नाहीं? —प्रतिज्ञा!"

या साऱ्या गोष्टी अशोकला आठवल्या.

आपण 'प्रतिज्ञे'चे मधले चार अंक वाचले नाहींत याचा किंचित् खेद करीत त्यानं आतां हातांतल्या अंकाच्या पहिल्या चार पानांवरून नजर टाकली—

आणि पांचव्या पानावर त्याची दृष्टि पडल्याबरोबर तो चांगलाच चकित झाला—

आपण वाचण्यांत चूक तर करीत नाहीं अशा शंकेनं त्यानं जाड टाइपांतला मथळा व त्याखालची सही पुन्हा वाचून पाहिली.

## " हाक ! "

लेखिका : श्यामा

मग त्याला शंकाच उरली नाहीं. त्यानं अगदीं अधीर मनानं वाचायला सुरुवात केली.

हिंदुस्थानांत जेलमधें खितपत पडण्याचं दुर्दैव वाट्याला येऊं नये म्हणून ज्यानं दूर परदेशांत जाऊन कित्येक वर्षे काढलीं अशा एका देशभक्ताला मातृभूमीची हाक पुन्हा ऐकूं येऊन परतण्याचा अनावर मोह होतो, व 'आई, तूं मला खरंच हाक मारीत आहेस

काय ?' असा प्रश्न तो निरनिराळया भावनांनीं पुनः पुन्हा विचारीत आहे, व प्रत्येक वेळीं आईचं उत्तरहि स्वतःच देत आहे– अशी कल्पना करून श्यामानं तें सारं लिहिलं होतं.

त्या प्रश्नोत्तरांत भावनोत्कटता इतकी भरली होती, कीं तिच्या ओघांत अशोकचं चित्त वाहत जाऊन त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. अखेरचा प्रश्न आणि अखेरचं उत्तर वाचल्यावर तर त्याचा कंठ सद्गदित झाला, आणि डोळे ओले झाले. श्यामा इतकं सुंदर लिहीत असेल अशी त्याची कल्पना नव्हती. तिच्याविषयीं आधींच त्याला जें अतिशय प्रेम अन् अभिमान वाटत होता तो आतां अंतःकरणांत आवरून कसा धरावा त्याला समजेना.

आपलं काम आटपून मरीन लाइन्सवर लोकल गाडी गाठून घरीं पोंचेपर्यंत त्यानं कसा धीर धरला तें त्याचं त्याला माहीत. घरीं पोंचल्याबरोबर 'ताई, ताई !' अशा केवढ्या मोठ्यानं त्यानं हाका मारल्या, व त्या ऐकून स्वयंपाकघरांत काकूंजवळ बोलत बसलेली श्यामा बाहेरच्या दिवाणखान्यांत आली अन् "अरे केवढ्यानं या हाका !" असं म्हणाली तेव्हां हातांतला अंक वर करून "त्याला कारण तुझी ही 'हाक'" असं म्हणून त्यानं तिचा नुसता हातच पकडला नाहीं, तर तिला अगदीं जवळ ओढून घेतलं.

आंतून काकू हें पाहत असतील असं वाटून "अरे, अरे ! हें काय हें ?" असं म्हणत श्यामा दूर सरकूं लागली. परंतु तिला त्यानं तसं करूं दिलं नाहीं, व तो म्हणाला,

"ताई, तुझं किती कौतुक करूं ! किती सुंदर लिहिलं आहेस हें ! आज ज्यांनीं ज्यांनीं वाचलं असेल त्यांना खचित वाटलं असेल कीं एक प्रभावी लेखिका नव्यानं क्षितिजावर—"

"पुरे पुरे. उगीच मला हरभऱ्याच्या झाडावर चढवूं नकोस." असं म्हणत तिनं त्याला ढकललं.

"ताई, मी तुझा आवडता भाऊ याचा मला फार अभिमान वाटतो." तो कांहींशा गंभीर चर्येनं म्हणाला; पण मग उजव्या हाताचं बोट तिच्यापुढें हालवीत त्यानं म्हटलं, "पण थांब, मी तुझ्यावर रागावणार आहे! ही "हाक" लिहून तूं 'प्रतिज्ञे'कडे पाठवलीस तें मला सांगितलंसुद्धां नाहींस काय?—"

त्याच्या त्या आरोपाचं निराकरण करण्याऐवजीं ती त्याला हसून म्हणाली,

"तुला एक जंमत दाखवायची आहे. ये."

ती आपल्या खोलीकडे वळली. तिच्या त्या वेळच्या लगबगी-वरून ती अगदीं उल्हासांत होती असं दिसलं, अन् त्यामुळें हर्ष-भरित होऊन अशोक तिच्या मागोमाग खोलींत गेला.

तिनं एक पुस्तक उघडून त्यांत ठेवलेलं एक पत्र बाहेर काढलं व 'वाच' असं हसत म्हणून त्याच्या हातीं दिलं.

"कृ. सा. न. वि. वि."

तो मायना वाचतांच अशोकची निराशा झाली. 'शीः! हीच का जंमत?' असं तो विचारणार असं त्याच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसल्यामुळें श्यामानं हसून म्हटलं,

"पुढें वाचशील तर खरं."

अशोक पुन्हा पहिल्यापासून वाचूं लागला—

"कृ. सा. न. वि. वि.

आपला लेख योग्य वेळीं पोंचला. वाचून पाहिल्याबरोबर इतका आवडला कीं तो लगेच छापायला दिला. 'प्रतिज्ञे'च्या आजच्या अंकांत तो प्रसिद्ध होत आहे. अंकाची एक प्रत

आपल्या पत्त्यावर धाडीत आहे. 'प्रतिज्ञा' आपल्याकडे नियमानें यापुढेंहि पाठविली जाईल. तिचा कृपा करून स्वीकार व्हावा. 'प्रतिज्ञे'ची आर्थिक परिस्थिति ओढाताणीची आहे. कोणत्याहि एकाच राजकीय पक्षाची भाटगिरी 'प्रतिज्ञे'ला करावयाची नसल्यामुळें कोणत्याच पक्षाचें आर्थिक साहाय्य पाठीशीं नाहीं. परंतु देशाच्या प्रगतीचाच फक्त विचार करून चांगल्याला चांगलें, वाइटाला वाईट म्हणण्याचें, आणि लोकांना निर्भीड राजकीय दृष्टि देण्याचें ध्येय पुढें ठेवून करतां येईल ती आणि करतां येईल तितके दिवस धडपड करण्याचें ठरविलें आहे. या अवघड उपक्रमाबद्दल आपणांस सहानुभूति वाटली तर लेखनसाहाय्य करीत जावें अशी विनंति आहे.

कांहीं दिवसांपूर्वीं एका जपानी सर्कसच्या मॅनेजरची मुलाखत आपण एका मासिकांत लिहिली होती ती वाचल्यापासून आपलें नांव दृष्टीसमोर होतें. 'प्रतिज्ञे'साठीं आपण लेखन करावें अशी विनंति पत्रद्वारें करण्याची बरेच दिवस इच्छा होती. परंतु आपलें संपूर्ण नांवहि माहीत नव्हतें, पत्ता तर नव्हताच. परंतु आपला लेखच एकदम अनाहूतपणें हातीं आला, त्यामुळें फार आनंद झाला. आपलें लेखन मिळवण्याची माझी इच्छा अत्यंत प्रामाणिक व तीव्र होती हें एक प्रकारें सिद्ध झालें!

आपली 'हाक' अतिशयच सुंदर आहे. तिच्यांतील प्रश्नोत्तरें वाचीत असतां मोरोपंताच्या 'केकावली'ची आठवण झाली. त्या जुन्या कल्पनेला आजच्या घटकेला साजेलसा किती हृदयस्पर्शी उजाळा आपण दिला आहे! मला अधिक स्तुति नीट करतां येणार नाहीं. इतकेंच म्हणतों, कीं असें तेजस्वी लिखाण वरचेवर पाठवाल तर 'प्रतिज्ञे'च्या उत्कर्षाबद्दलची माझी चिंता पुष्कळ

कमी होईल. लेखक म्हणून छापलीं जाणारीं नांवें शेंकडों आहेत. परंतु 'प्रतिज्ञे'ला हवें तसें लिखाण कुणाकडून मिळवावें याचा मनानें शोध घेऊं लागलों कीं त्यांतली एक दोनसुद्धां डोळयांपुढें ठरत नाहींत.

असो. पत्र फार लांबलें अशी भीति वाटते. परंतु जें लिहिलें तें प्रांजल स्तुति करतां करतां 'प्रतिज्ञे'ची गरजहि सांगावी असें वाटलें म्हणून. आपला फार वेळ घेतला असल्यास 'क्षमस्व'.

कळावें, लोभ असावा ही विनंति,

आपला नम्र

शरद् केशव दर्शने"

पत्र वाचून झाल्यावरहि अशोकनं तें पुन्हा एकदां उलटसुलट करून पाहिलं, आणि मग श्यामाकडे बघत तो म्हणाला, "फारच सुंदर पत्र आहे."

"त्यासाठींच तुला मीं म्हटलं वाच म्हणून."

पत्राच्या सुलट बाजूकडे पाहतां पाहतां एकदम हसून अशोक म्हणाला, "पण पत्र लिहणारी ही व्यक्ति फार गंभीर प्रकृतीची दिसते."

"होय! तें कशावरून?"

अशोक हसत म्हणाला, "पत्राच्या शेवटचं 'कळावें लोभ असावा' अन् 'आपला नम्र' यावरून. आणि मायना पाहिलास ना? कृ. सा. न. वि. वि!" तो आणखी हसूं लागला.

त्याच्या हातांतून पत्र घेत श्यामा म्हणाली, "मग तुझं म्हणणं काय त्यानं मला एकदम 'प्रिय श्यामा' म्हणून पत्र लिहायला हवं होतं?"

" श्यामा, जाऊं दे. पण 'प्रिय' म्हणायला काय हरकत होती ? "

" तुझ्यासारखे चावट नसतात सारे पुरुष, समजलास ? " असं म्हणतांना तिनं अगदीं मोठाले डोळे केले.

" म्हणजे ज्या स्त्रीचा लेख अतिशय प्रिय वाटला तिला पत्राच्या आरंभीं 'प्रिय' म्हणून संबोधणं याला तूं चावटपणा म्हणणार होय ? "

" मला नाहीं माहीत ! "

असं म्हणताना तिनं मान वेळावली त्याचं अशोकला हसूं आलं व 'कां ? आतां बोल कीं !' असं त्यानं विचारलं तेव्हां तीहि हसूं लागली.

आज दहा बारा दिवसात इतक्या मनमोकळेपणानं हसतांना ती त्याला प्रथमच दिसत होती. त्या गोष्टीचा त्याला फार आनंद झाला.

आणि हा त्याचा आनंद दुसऱ्या दिवशीं तो कलकत्त्यास जावयास निघाला त्या घटकेपर्यंत कायम राहिला.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं पावणेसहा वाजतां व्हिक्टोरिया टर्मिनसवरून सुटणाऱ्या कलकत्ता मेलनं तो निघाला. श्यामा त्याला पोंचविण्यासाठीं स्टेशनवर आली होती. काल रात्रीं तिच्या चेहऱ्यावर जो उल्हास परत आलेला त्याला दिसला तो अजूनहि दिसत होता, व तो पाहून त्याचं स्वतःचं चित्त अगदीं प्रसन्न झालं होतं.

गाडी सुटण्यापूर्वी डब्यांत खिडकीजवळ समोरासमोर बसून तीं दोघं एकमेकाशीं बोलत राहिलीं. बाकामागच्या जागेंत त्यानं ठेवलेल्या तयार चित्रांच्या पांचसहा मोठाल्या फ्रेम्स, बाकाखालीं

सरकविलेल्या दोन कातडी बॅग्ज वगैरेकडे नजर टाकीत श्यामा म्हणाली,

"तुझं सारं सामान आलं ना डब्यांत? नीट पाहून घेतलंस ना?"

"सामान मरूं दे. मला नाहीं त्याची फिकीर करायला वेळ. पांच सात मिनिटं उरलीं आहेत तेवढ्यांत तुझ्याशीं बोलून घेणार मी."

तिला त्याच्या त्या बोलण्याची मोठी गंमत वाटली. त्या वेळच्या त्याच्या प्रेमळ उल्हासाचा संसर्ग लागल्यामुळेंच कीं काय, तो सिगरेट ओठांत चढवून पेटींतली काडी काढूं लागला तेव्हां तिनं ती पेटी त्याच्या हातांतून घेतली आणि हसत हसत काडी ओढून ती त्याच्या तोंडांतल्या सिगरेटच्या टोकाला लावली.

"थँक यू" असं म्हणत त्यानं पेटी परत घेऊन खिशांत टाकली व सिगरेटचा आणखी एक झुरका घेऊन तो म्हणाला,

"आपण दोघांनीं मिळून जायला हवं होतं कलकत्त्याला. किती मजा आली असती!"

श्यामा नुसती हसली. त्या क्षणीं तिच्या चर्येवर नेहमींची तेजस्वी चंचलता दिसत नव्हती. तिचे डोळे मंद हास्य करीत होते. त्यांत शांत प्रसन्नता भरलेली दिसत होती. तिच्या नेत्रांतला तो भाव कॅनव्हसवर वठवायचा झाला तर कोणत्या रंगाच्या छटा किती प्रमाणांत मिसळाव्या लागतील याचा मनाशीं विचार करीत अशोक क्षणभर तिच्याकडे निरखून पाहत राहिला. मग त्यानं एकदम विचारलं,

"अजून चल माझ्याबरोबर, येतेस? काय हरकत आहे?"

"वा! वेड लागलं काय?"

"पण आलीस तर काय बिघडेल?"

श्यामानं जीभ चावल्यासारखं करून मान हालविली.

"पण मी म्हणतों उद्यां पुण्यास जाऊन तूं करणार आहेस काय? उषाक्कानं तुला बोलावलं आहे येवढंच ना?"

श्यामा पुन्हा नुसती हसली, व त्याचा प्रश्न टाळण्यासाठीं म्हणाली,

"तें जाऊं दे. तूं मला लवकर पत्र धाडणार ना, सांग."

"अगदीं रोज एक पत्र धाडतों, बघ तरी." असं म्हणत त्यानं तिचा हात आपल्या हातीं घेतला. तितक्यांत घंटा वाजलेली ऐकूं आली म्हणून श्यामा उठली. तोहि उठला व तिच्याबरोबर खालीं उतरून डब्याच्या दाराशींच उभा राहिला.

शेजारच्या डब्यांतले एक गृहस्थ खिडकींतून वाकले होते व त्यांना पोंचवायला आलेली मंडळी त्यांच्या गळयांत हार घालीत होती. तें पाहून श्यामा अशोकला म्हणाली,

"मला इतकीसुद्धां कशी अक्कल नाहीं रे?"

"म्हणजे काय?"

"तुला निरोप द्यायला आलें ती अशी रिक्त हस्तानं. हारतुरे आणायचं मला कांहीं सुचलं नाहीं."

"असं होय?" तो अगदीं मनापासून हसला.

तितक्यांत गार्ड त्यांच्या अंगावरून धावत गेला म्हणून श्यामा त्याला म्हणाली, "तूं डब्यांत चढ आतां. गाडी सुटणार वाटतं."

"मला पत्र लिहायचा आळस करूं नकोस हं! ... अन् हें बघ, 'प्रतिज्ञे'च्या संपादकाची अन् तुझी भेट झाली कीं त्याचं वर्णन मला लिहून कळव. त्याला भेटणारच असशील ना तूं? किंबहुना पुण्यास जायची येवढी उतावळी तुला त्यासाठींच झाली असेल, मला माहीत आहे."

" काय रे तुझे एकेक तर्क ! " असं विचारून श्यामानं रागाचा अभिनय केला.

अशोक कांहीं तरी बोलणार होता पण तितक्यांत गार्डनं शिटी फुंकली त्यामुळें त्याला डब्याच्या दारांत चढावं लागलं. मात्र तसं करतां करतां त्यानं तिचे दोन्ही हात चटकन धरून प्रेमभरानं दाबले व म्हटलं,

" मीं आपलं कलकत्त्याचं काम आटपून लवकरच परत येईन. मग तूं यायला पाहिजेस पुन्हा आमच्याकडे."

" येईन ना " असं ती म्हणते न म्हणते तोंच गाडी हालली व तिचे हात सोडून देणं त्याला भाग पडलं.

डब्याच्या दारांत उभं राहून त्यानं हालविलेला रुमाल दिसे-नासा होईपर्यंत श्यामा प्लॅटफॉर्मवर उभी राहिली. मग ती वळून परतली. गेल्या तीन महिन्यांत अशोकवर तिचा इतका जीव जडला होता अन् त्याच्या सहवासाची तिला इतकी सवय झाली होती, कीं त्याला निरोप देतांना तिचं अंतःकरण अगदीं भरून आलं होतं. तो दृष्टीवेगळा होईपर्यंत तिनं उल्हासाचं अवसान आणलं होतं; पण आतां तें अवसान एकदम गळून पडलं, अन् तिच्या चित्तावर विलक्षण खिन्नता आली. फार वेळापूर्वीपासून आपल्याला तहान लागली आहे हें तिच्या आतां लक्षांत आलं.

स्टेशनाच्या आवाराबाहेर पडून ती बसच्या नाक्यापाशीं पोंचली तेव्हां बस तिथें नव्हती किंवा दूरवरहि दिसत नव्हती. नाक्या-वरच एक हॉटेल होतं. श्यामानं विचार केला कीं कांहीं तरी पेय घ्यावं, हॉटेलांत बसल्या जागेवरूनच बस आली कीं आपल्याला दिसेल. हॉटेल फारसं झकपक नव्हतं. पण श्यामाला एका इंग्रजी

सुभाषिताची आठवण झाली—"वादळांत कुठल्याहि बंदराचा आसरा चालतो." ती हॉटेलांत शिरली.

तिनं थंड पेय मागवलं, अन् त्याचे दोन चार घोट भराभर घेऊन ग्लास जरा खालीं ठेवला. रुमालानं ओठ टिपतां टिपतां अशोकच्या मघांच्या बोलण्यांतलं एक वाक्य तिला आठवलं—

"पुण्यास जायची उतावळी तुला झाली आहे ती त्याला भेटायसाठींच असेल? ..."

"काय रे तुझे एकेक तर्क?" तिनं उत्तर दिलं होतं तेंहि तिला आठवलं...

टेबलावर ठेवलेल्या ग्लासाच्या कंगोऱ्यावर नखं आपटीत ती मनाशीं म्हणाली, अशोकचे कांहीं तरीच तर्क नाहीं तर काय? 'प्रतिज्ञे'च्या संपादकाला भेटण्याची मला उतावळी व्हायचं काय कारण? त्यानं माझ्या लेखनाची स्तुति केली होती यापलीकडे त्याचा संबंध काय होता? तो भेटला काय अगर न भेटला काय...

आणि तितक्यांत तिच्या मनांत एकदम आलं—

ज्या तरुणानं मिरजेच्या स्टेशनवर आपल्या हातीं जांबिया दिला, अन् जो आपली गाठ न घेतांच गेला, त्याची भेट आपण आतां पुण्यास गेल्यावर होईल?...तो पुण्यांतच राहत असेल?...तिला कांहींच माहीत नव्हतं! त्याचं नांव तरी तिला कुठें माहीत होतं?...आणि त्याची ती स्मृति मात्र तिच्याजवळ सतत राहिली होती! या घटकेला देखील तें शस्त्र तिच्या कमरेला होतं....

"च्!" असा उद्गार श्यामानं काढला त्यांत अनेक विचारांचा अभिप्राय साठलेला होता.

तिनं बाहेर रस्त्याकडे दृष्टि टाकली. तिला हवी ती बस आली नव्हती.

रस्त्याच्या पलीकडे उलट दिशेला जाणाऱ्या बसचा स्टँड होता, तिथें मात्र एक बस थांबली व चालू झालेली तिला दिसली. मग ती बस निघून गेली तरी ती शून्य दृष्टीनं त्या पलीकडच्या स्टँड-कडेच बघत राहिली.

एक मुसलमान इसम व घुंगट पांघरलेली त्याची बिबी त्या फुटपाथवर उभी असलेली तिनं पाहिली. पण एक ट्रॅम आली व गेली, अन् तें जोडपं दिसेनासं झालं. सुक्या मेव्यानं भरलेला गाडा लोटीत एक फेरीवाला येऊन उभा राहिला. सिनेमाच्या जाहिरातींच्या पाट्या खांद्यावर घेऊन कर्ण्यांतून आरोळ्या ठोक-णारी विदूषकासारखीं वाटणारीं पांच-सहा पोरं नाचत-बागडत गेलीं. त्यांनीं फेकलेल्या छोट्या जाहिराती हवेंत फडफडल्या. एक पारशी तरुण स्त्री बसची वाट पाहण्यासाठीं येऊन उभी राहिली. मग एक वयस्क बोहरी आला. मग बॅडमिंटनच्या नाजुक लहान 'रॅकेट्स्' हातीं घेतलेले झकपक पोषाखवाले तीन विद्यार्थी दाखल झाले. एक पोऱ्या धांवत आला, थबकला, 'ए रेस् कार्ड!' अशा दोन खणखणीत आरोळ्या त्यानं ठोकल्या, अन् मग इकडे तिकडे कावऱ्या बावऱ्या नजरेनं बघून तो पुढें पळाला. आणि— दुसऱ्याच क्षणीं—

बसच्या स्टँडवर आणखी एक व्यक्ति येऊन उभी राहिली, व ती दृष्टीस पडतांच श्यामानं दचकून टेबलावरचा हात काढला अन् ती जागच्या जागीं ताठ झाली.

आपल्याला दृष्टिभ्रम तर होत नाहीं अशी तिला शंका आली. पण तिनं पुन्हा नीट निरखून पाहतांच ती गेली.

तोच तो होता याबद्दल तिची खात्री झाली.

आणि तीं होतांच तिची छाती धडधडूं लागली.

आपण जाऊन त्याला ओळख द्यावी काय... ती विचार करूं लागली.

ती उठली.

पण विचार बदलून ती पुन्हा बसली.

पण पुन्हा तिच्या मनांत आलं, कीं आतांची संधि आपण घालविली तर त्याची आपली भेट पुढें कदाचित् कधीं होणार नाहीं! ... आपली भेट त्याला नको आहे असं थोडंच असेल? ... उलट कदाचित् त्यानंहि गेल्या तीन महिन्यांत आपली आठवण काढून मनाशीं आश्चर्य केलं असेल! ... त्याचं शस्त्र त्याला परत देण्यासाठीं तरी त्याची गाठ आपण घ्यायलाच पाहिजे! ...

ती झटकन उठली. दुकानदाराच्या पुढ्यांत आणेली टाकून पायऱ्या लगबगीनं उतरून तिनं रस्ता गाठला.

# १०

पुण्याच्या 'सर परशरामभाऊ' कॉलेजवरून जाणाऱ्या मोठ्या प्रशस्त 'टिळक रोड'ला येऊन मिळणारे जे छोटे रस्ते आहेत त्यांतल्या एका रस्त्यावरच्या बंगलेवजा दुमजली घराच्या पायऱ्या उतरून उषाक्का खालीं आली व छत्री उघडतां उघडतां वर बघून ती हसत म्हणाली,

"जातें ग !"

वर छोट्याशा आगाशींत श्यामा कठड्यावरून खालीं वाकून उभी होती. तिनं हसून म्हटलं,

"हं. लवकर ये बरं का !"

"हो हो." मान हालवून उषाक्का म्हणाली, व मग तिनं छत्री पुरती उघडून डोक्यावर धरून आपला रस्ता सुधारला.

केसांच्या अंबाड्याखालची गोरीपान मान, त्याखालीं पातळाच्या पदरांतून दिसणारा पोलक्यानं झाकलेला पाठीचा बांधेसूद भाग, त्याखालीं कासोट्याची निरीदार पट्टी, आणि पावलांबरोबर पातळाचे ओचे हालले कीं किंचित् उघड्या पडणाऱ्या नाजुक

पोटऱ्या— आपल्या थोरल्या बहिणीच्या त्या पाठमोऱ्या चित्राकडे श्यामा पाहत राहिली. अगदीं अलग नजरेनं तिनं पाहिलं, अन् तिच्या मनांत आलं, किती अप्रतिम लावण्य म्हटलं पाहिजे उषाक्काचं ! ...अशोक उगीचंच माझी तारीफ करतो... आणि मी तरी किती वेडी, मीहि समजूं लागतें कीं मी सुंदर आहे....

ती स्वतःशींच हसली.

तितक्यांत कोपऱ्यावर वळण्यापूर्वी उषानं छत्री कलती करून वळून पाहिलं. श्यामानं उजव्या हाताचा पंजा पसरून उंच केला, व प्रत्यक्ष शब्द न उचारतां पण अगदीं उंच आवाजांत बोलतांना ओठाची जशी हालचाल होईल तशी करीत "लवकर ये" असं म्हटल्यासारखं केलं.

उषानं उताणा पंजा दाखवून खुणेनं सांगितलं, "येईन, येईन!" व मग ती दिसेनाशी झाली.

श्यामाला माहीत होतं, कीं अक्का जरी लवकर येते म्हणाली तरी तिला यायला निदान सवापांच वाजणार. आज तिला शेवटचा तास खरं म्हणजे नव्हता. पण तिच्या शाळेचे हेडमास्तर खाष्ट होते, ते तिला शाळा सुटल्याखेरीज घरीं येऊं देतील अशी कांहीं फारशी शक्यता नव्हती...

श्यामा बहिणीला निरोप द्यायला म्हणून आगाशींत गेली होती, तेव्हां ती दिसेनाशी झाल्यावर ती कठड्यापासून दूर झाली. खोलींत जायसाठीं तिनं एक पाऊल मागं घेतलं, पण ती पुन्हा थांबली. माघ महिन्यांतले ते दिवस होते, व सकाळची थंडी आतां अकरा वाजले तरी हवेंत रेंगाळत असल्यामुळें सूर्य-किरणांचा स्पर्श सुखावह वाटत होता. श्यामा पुन्हा कठड्यावर

रेलली, व डावा पंजा कपाळालगत आडोशासारखा टेकून समोरच्या रस्त्यावरील रहदारीकडे पाहत उभी राहिली.

एखाद दुसरी मोटार मधूनच या किंवा त्या बाजूनं वेगांत गेलेली दिसत होती. सोडा वॅाटरच्या बाटल्यांच्या लाकडी उघड्या पेट्यांनीं खचून भरलेला एक भला मोठा गाडा खळखळ आवाज करीत धीरे धीरे चालला होता. परंतु त्या घटकेला त्या हमरस्त्यावर मुख्य वर्दळ सुरू होती ती शाळा-कॉलेजांत जाणाऱ्या विद्यार्थिवर्गाची. विद्यार्थ्यांच्या सायकलींची रीघ लागली होती. पायीं जाणाऱ्यांचे दोनदोन चारचारांचे छोटे मोठे घोळके बनले होते. विद्यार्थिनी स्त्री-सुलभ डौलानं पावलं टाकीत चालल्या होत्या, त्यांच्या रंगीबेरंगी साड्या, पाठीवरच्या वेण्या, अन् हसण्या बोलण्याचा गोड किलकिलाट इत्यादींची शोभा कुणाचंहि चित्त आकर्षील अशीच होती. दोन विद्यार्थ्यांच्या सायकली एकमेकींवर आपटल्या व गुंतून आडव्या झाल्या तेव्हां जरा मागून चाललेल्या पांच सहा मुलींची हसतां हसतां पुरेवाट झाली, अन् तितक्यांत एक मोटार समोरून येतांच दूर होऊन पांगतांना त्यांनीं "अगबाई!" "ए!" "ई ऽऽ!" असे आवाज काढले ते ऐकल्याबरोबर श्यामाला चांदणीच्या रानांत भुर्रकन उडून जाणाऱ्या पक्ष्यांच्या किलबिलाटाची आठवण झाली.

दोन वर्षांनीं लहान व्हावं, अन् या आनंदी जीवांसारखं रस्त्यानं हसत खेळत पुन्हा कॉलेजांत जावं असं तिला क्षणभर वाटलं... पुन्हा आपल्या आवडत्या प्रोफेसरांच्या तासाला जाऊन बसावं, त्यांच्या वक्तृत्वानं भारून गेलेलं वर्गातलं उल्हासमय, प्रकाशमय वातावरण अनुभवावं, पुन्हा शर्यतींत, खोखो-हुतुतूच्या खेळांत भाग घेऊन बक्षिसं मिळवावीं, विद्यार्थ्यांनीं खट्याळपणानं

" झांशी की रानी ! " म्हणून आपल्यामागें आरोळ्या ठोकल्या तर त्याचा गर्वच मानण्याचं सुख पुन्हा लुटावं !...

परंतु ते दिवस आतां कायमचे मागें पडले होते !... दृष्टीआड सरकले होते !

श्यामानं वर मान करून समोर पाहिलं तों ज्यांना बघून तिला कॉलेजांतल्या दिवसांच्या आठवणी झाल्या होत्या त्या किलबिल करणाऱ्या मुली रस्त्यावर नव्हत्या. त्याहि दिसेनाशा झाल्या होत्या !

तिनं सुस्कारा टाकला, व मग ती खोलींत जाण्यासाठीं वळली.

तितक्यांत खालीं पोस्टमन बंगलीच्या पायऱ्या चढत होता तो तिला दिसला. त्यानं वर येऊन दारावर टकटक केलं. श्यामानं दार उघडतांच त्यानं तिच्या हातांत एक कार्ड दिलं, व तो जिन्याकडे परत वळला.

कार्डाच्या पत्त्याच्या अक्षरावर ओझरती नजर टाकतांच श्यामानं ओळखलं कीं, तें पत्र अशोकचं होतं. ती खुर्चीवर बसली, व तिनं कार्डाची सुलट बाजू पाहिली. चारच ओळींचा मजकूर होता,

" तूं पुण्यास पोंचलीस यापलीकडे मला तुझी कांहींच बातमी या वीस दिवसांत नाहीं ! मी रोज तुझ्या पत्राची वाट पाहत आहे. मीं तुला तीन पत्रं धाडलीं, पण तुझ्याकडून उत्तर नाहीं ! आतां मी रागावायच्या घाईला आलों आहे ! या माझ्या पत्राचं तुझ्याकडून खूप मोठं अन् लवकर उत्तर आलं तर ठीक. नाहीं तर—हिमालयांत निघून जाईन अशी महात्माजींसारखी धमकी देऊं काय ? "

ती किंचित् हसली; पण मग कांहीं वेळ त्या कार्डाकडे शून्य दृष्टीनं पाहतांना तिचा चेहरा जरा गंभीर झाला.

अशोकला तिनं पत्र पाठवायला हवं होतं. त्याला राग यावा असंच वर्तन तिच्या हातून घडलं होतं. परंतु तसं ती मुद्दाम थोडीच वागली होती ?

त्याला पत्र लिहायला म्हणून नोटपेपर घेऊन पुढें बसावं, अन् कांहीं केल्या तिच्या मनाला लिहावंसं वाटूंच नये असं कितीदा तरी झालं होतं. मुंबईच्या मुक्कामांत प्रथम ज्या आनंदानं व उल्हासानं, ती वागली होती तो शेवटीं नाहींसा होऊन तिच्या मनावर जो एक प्रकारचा उदासपणा आला होता, तो इकडे पुण्यास आल्यावर थोडा वाढलाच होता. तो मनावेगळा करण्यासाठीं ती पुष्कळ प्रयत्न करी, परंतु तें कांहीं तिला साध्य होत नसे.

तिच्या या औदासीन्याचं मुख्य कारण हें होतं कीं तिनं शिकागोला तार पाठवली त्या गोष्टीला आतां जवळ जवळ महिना होऊन गेला तरी तिकडून उलट कांहींच बातमी आली नव्हती. तिनं तार केली ती केवढ्या आशेनं. आपल्या वडिलांचा नक्की पत्ता आपल्याला मिळाला, आतां त्यांच्याशीं पत्रव्यवहार तरी निदान आपल्याला सुरू करतां येईल अशी तिच्या मनाची अगदीं खात्री होती. परंतु तिच्या तारेचं कांहींच उत्तर न आल्यामुळें नानातऱ्हेचे तर्क करीत बसण्यावांचून तिला गत्यंतर राहिलं नाहीं. आपल्याला पत्ता मिळाला तो चुकीचा तर नसेल ? किंवा मध्यंतरीं आपले वडील शिकागो सोडून दुसरीकडे कोठें गेलेले नसतील ?... ज्याला तार धाडली त्याला ती मिळाली नाहीं तर ती धाडणाऱ्या माणसाला तारखात्याकडून तसं कळवण्यांत येतं काय अशी चौकशी देखील तिनं पोस्टांत जाऊन केली होती, व पदरीं वेडेपणा घेतला होता. पुन्हा एकदां तार करावी असं तिच्या मनांत येई. परंतु पुन्हा तिला वाटे त्याचा काय उपयोग ? दोनदां

तार केली म्हणजे ती पोंचण्याची अधिक खात्री असते असं थोडंच होतं! मग तिच्या वडिलांनीं शिकागो सोडलंच होतं कीं काय? अन् सोडलं असेल तर ते कुठें गेले तें आतां कसं कळायचं!...

हे विचार मनांत आले कीं ती अगदीं अस्वस्थ होऊन जाई.

आपले वडील आपल्याला परत मिळाले असं तिला वाटूं लागतं न लागतं तोंच ही निराशा तिच्या वाट्याला आली होती. त्यांची व तिची ही एक प्रकारची चुकामूकच झाली होती म्हणावयाची!

चुकामूक!...

हा शब्द मनांत आला कीं ज्या दुसऱ्या एका चुकामुकीची तिच्या मनाला अलीकडे विलक्षण चुटपुट लागून राहिली होती तिची तिला आठवण होई, व तो प्रसंग जसा घडला तसा तिच्या डोळ्यांपुढून सरके.

त्या दिवशीं हॉटेलच्या पायऱ्या उतरून तिनं रस्त्यांत पाऊल टाकलं त्या वेळीं तिच्या मनाची अगदीं पक्की खात्री होती कीं, जो तरुण तिला मिरजेच्या स्टेशनवर भेटला होता तो रस्त्याच्या पलीकडच्या बाजूस बसच्या स्टँडवर उभा होता, आणि आतां त्याची व आपली प्रत्यक्ष भेट खचित होणार.

परंतु ती रस्ता ओलांडूं लागली तोंच एकामागोमाग तीन चार मोटारी आल्यामुळें तिला थांबावं लागलं होतं. त्या गेल्यावर तिनं दोन पावलं टाकलीं तोंच ट्रॅम आडवी आली होती; आणि ती गेल्यावर ती पुढें जाऊं लागणार तोंच पलीकडच्या बाजूला बस येऊन क्षणभर उभी राहिली होती, आणि पुढें गेली होती. आणि मग तिनं पाहिलं तों बसच्या स्टँडवर तो तरुण कुठें होता? बसमधें चढून तो गेला असला पाहिजे!...

ती रस्त्यांत जागच्या जागींच उभी राहिली होती ती एखाद्या वेड्यासारखी ! किती उत्सुक आशेनं ती त्याच्या भेटीसाठीं धावली होती ? एखादा दरवाजा उघडा दिसावा, आणि त्याकडे धाव घेऊन जवळ पोंचतांच तो बंद व्हावा तशी त्याच्या भेटीची ही संधि पाहतां पाहतां त्या बसच्या रूपानं दूर गेली होती ! आतां त्याची व तिची भेट कसची होते ?

एखादी इच्छा तृप्त न झाल्यामुळेंच ती वाढूं लागते ! श्यामाला तो तरुण पुण्याच्या स्टेशनवर भेटला असता व त्याचं शस्त्र तिनं त्याला परत देऊन टाकलं असतं, तर कदाचित् त्याची आठवण तिला पुढें थोडेच दिवस राहिली असती, आणि ती आठवण एखादे वेळीं झाली असती तरी तिच्यामागें विशेष भावना असतीच असं सांगवत नाहीं. परंतु त्याची भेट एकदांच नव्हे तर दोनदा चमत्कारिक योगायोगानं टळल्यामुळें तिच्याविषयींच्या मूळच्या आसक्तींत आतां मोठी भर पडल्यासारखं झालं होतं. त्या तरुणा-भोंवतीं तिच्या कल्पनेनं गूढ रम्यत्वाचं वलय निर्माण केलं होतं. प्रथमदर्शनींच त्याच्याबद्दल तिला जें आकर्षण वाटलं तें बळावत गेलं होतं. त्याच्याविषयींचे विचार तिच्या मनांत अधिक वरचेवर येऊं लागले होते. तो कोण असेल, त्याचं नांव काय असेल, तो कुठें राहत असेल, त्याचे विचार कसे असतील याबद्दलचे नाना तर्क करण्यांत तिचा अधिक वेळ जाऊं लागला होता. आपली आठवण त्यानंहि ठेवली असेल काय, आपली भेट झाली नाहीं त्याबद्दल त्यालाहि हुरहुर लागलेली असेल काय, आपला शोध तोहि करीत असेल काय, इत्यादि प्रश्नांचीं उत्तरं ठरविण्यांत तिला सुख वाटूं लागलं होतं. त्याच्याविषयीं विलक्षण जिज्ञासा तिच्या ठिकाणीं उत्पन्न झाली होती, आणि दैवानं दुष्टपणा दाखवून

तिला त्याच्यापासून दूर ठेवल्यामुळें त्याच्याजवळ जाण्याचा हट्ट तिच्या मनानं आतां घेतला होता... परंतु या हट्टाचा उपयोग काय होता? त्याचं नांवहि तिला माहीत नव्हतं! त्याच्या सन्निध ती जाणार कशी?...

या गोष्टीची जाणीव झाली कीं तिचं मन त्रासे, चिडे, उद्विग्न होई!

मग ही उद्विग्नता घालविण्यासाठीं ती आपलं लक्ष लेखनांत गुंतवी. तिनं जी कादंबरी लिहायला घेतली होती ती अजून अर्धी लिहून व्हायची होती. परंतु कादंबरीकडे तिचं मन वळेना. कांहीं तरी स्फुट स्वरूपाचं लिहावंसं तिला वाटत होतं, अन् जर कांहीं चांगलं लिहून झालं तर तें 'प्रतिज्ञे'कडेच धाडायचं तिनं ठरविलं होतं. आपण पुण्यास आलों हें तिनं 'प्रतिज्ञा' कचेरीकडे कळविलं नव्हतं. तिचा अंक आधीं मुंबईच्या पत्त्यावर जाऊन इकडे येत असे. फेब्रुआरीच्या एकोणीस तारखेस हरिपुरा येथें सुभाषचंद्र बोस यांच्या अध्यक्षतेखालीं काँग्रेसचं अधिवेशन झालं त्यानिमित्त 'प्रतिज्ञे'चा खास अंक निघाला. त्यांत सुभाषबाबूंच्या नियंत्रणाखालीं काँग्रेसच्या धोरणांत कसा कसा पालट होण्याचा संभव आहे याविषयींचा जो मोठा लेख होता तो तर अत्यंत वाचनीय होताच. पण अधिवेशनाची साद्यंत हकीकत ज्यांत दिली होती तो वर्णनात्मक लेखहि तिला फार सुंदर वाटला होता. त्यांतला कांहीं भाग तिनं पुनः पुन्हा वाचून काढला होता. उदाहरणार्थ, तीन लाख लोकांना सहज बसतां येईल इतका विस्तीर्ण जो खुला मंडप बैठकीसाठीं तयार करण्यांत आला होता त्याच्या अपूर्व शोभेचं वर्णन देऊन पुढें लिहिलं होतं :—

"...तिसऱ्या प्रहरपासूनच मंडपाच्या सर्व प्रवेशद्वारांवर प्रचंड जनसंमर्द लोटूं लागला होता. हजारों शेतकरी मंडपाबाहेर मांड्या ठोकून बसले होते, व समुद्राची एकेक लाट किनाऱ्यावर आपटावी त्याप्रमाणें गर्दीची एकेक लाट दारापर्यंत पोंचत होती. पांच वाजण्याच्या आधींच दोन लक्ष लोक जमले. नदीकिनाऱ्यालगतच्या उताराचा भाग लोकांनीं फुलून गेला. त्यासमोरच्या बाजूस भव्य विस्तीर्ण व्यासपीठ होतं, त्यावरच्या गॅलरी स्वागतसमितीच्या सभासदांनीं व प्रतिनिधींनीं चिकार भरून गेल्या. प्रवेशद्वारांवर तिरंगी पडदे झुलत होते, जिकडे तिकडे तिरंगी पताका फडफडत होत्या, व्यासपीठावर विविध रंगांचे विद्युद्दीप झळकत होते, अध्यक्षांच्या आसनाच्या जागेभोंवतीं एकमेकींचे हात गुंतवून वर्तुळांत उभ्या असलेल्या हास्यवदन देशसेविकांच्या केशरी साड्या इतर लोकांच्या अंगावरच्या शुभ्र खादीच्या पार्श्वभूमीवर उठून दिसत होत्या. अस्ताचलाकडे जाणाऱ्या सूर्यानं आपल्या किरणांचा तिरपा झोत फेकतांच हें उत्साहवर्धक अपूर्व दृश्य एखाद्या यक्ष-नगरींतल्या अद्‌भुत दृश्याप्रमाणेंच एखाद्याला वाटलं असेल.

अध्यक्षांची मिरवणूक मंडपांत प्रविष्ट होतांच स्वयंसेवकांचा बँड वाजूं लागला. स्वागताध्यक्ष दरबार गोपाळदास मिरवणुकीच्या अग्रभागीं होते. त्यांच्या मागून सुभाषबाबू चालत होते, त्यांच्या गळ्यांत तिरंगी माला होती व कपाळावर कुंकुमतिलक शोभत होता. सुभाषबाबूंच्या डाव्या हाताला सरदार पटेल होते, व वर्किंग कमिटीचे सर्व सभासद दोहोंदोहोंच्या रांगा करून मागें चालले होते. शरद् बोस अगदीं शेवटीं होते. सुभाषबाबू दिसतांच लोकांनीं उत्थापन दिलें, व हवेंत जयजयकाराच्या ललकाऱ्या उठल्या.

अध्यक्ष स्थानापन्न होऊन लोक आपापल्या जागीं बसतात न

बसतात तोंच एक मोटार मंडपांत आली व हलकेंहलकें व्यास-पीठापर्यंत येऊन उभी राहिली. सुभाषबाबू उठून चटकन पायऱ्या उतरले, व मोटारींतून उतरणाऱ्या महात्माजींना त्यांनीं हात दिला. सुभाषबाबूंचा आधार घेऊन व्यासपीठाच्या पायऱ्या चढणारी महात्माजींची कृश मूर्ति स्पष्ट दिसल्याबरोबर तीन लक्ष लोकांची ती सबंध सभा एकदम उभी राहिली, " महात्मा गांधीऽऽ की—" अशा गर्जनेनं दिशा दुमदुमून गेल्या. महात्माजींनीं सावकाश हात उचलून अभिवादनार्थ जोडल्याबरोबर ती गर्जना अधिकच उंच आवाजांत पुन्हा उसळली! शुभ्र खादीच्या छत्राखालीं आपल्या उच्चासनावर महात्माजी बसल्यावर राष्ट्रगीताचे धीर गंभीर स्वर हवेंत तरंगू लागले—'वंऽदे माऽतरम्'... "

हें वर्णन वाचतां वाचतां श्यामा मनाशीं सारखं म्हणाली होती, ज्या लेखणीनं हें लिहिलं ती किती निष्णात व प्रभावी असली पाहिजे! शरद् दर्शने म्हणजे कुणी तरी कर्तृत्ववान् तरुण असला पाहिजे!

त्यानं तिच्या लेखनाची एकदां स्तुति केली होती. त्याच्यासारख्या निष्णात लेखकाची स्तुति पुन्हा मिळविण्यासारखं आपल्या हातून लिहून झालं पाहिजे, अशी ईर्षा तिला साहजिकच वाटली, आणि 'प्रतिज्ञे'कडे पाठविण्यासाठीं ती एक लेख तयार करूं लागली. तो लिहितांना ती मनाशीं म्हणे,

" हा लेख त्यांना पसंत पडला तरच मी पुण्यांत आलें आहे हें त्यांना कळवायचं, आणि त्यांनीं तशी इच्छा दर्शविली तर मग त्यांची गाठ घ्यायची."

आणि त्यांनीं तशी इच्छा दर्शविली नाहीं तर?...

मग आपण होऊन त्यांच्या भेटीला जायचं काय? तें पुढें पाहतां येईल...

  

ज्या जागेंत उषानं बिऱ्हाड केलं होतं ती बाहेरून दिसण्यांत जरी मोठी झकपक होती तरी कांहीं दृष्टींनीं फार गैरसोईची होती. एक तर त्या भागांत दुसऱ्या मजल्यावर नळाचं पाणी नीट चढत नसल्यामुळें भारी अडचण होत असे. आणि शिवाय उषाक्काची शाळा तेथून फार दूर असल्यामुळें तिला जातां येतां रोज जवळ जवळ दोन मैल चालावं लागत असे. रोज दोन वेळां टांगा करायचा म्हटला तर महिन्याकांठीं निदान पंधरा रुपये खर्च करणं भाग होतं; आणि अशा रीतीनं खर्च वाढ-विण्यापेक्षां घरभाड्यासाठीं पांच सहा रुपये अधिक देऊन शाळेच्या जवळ कुठें तरी चांगली जागा मिळाली तर घ्यायच्या विचारांत उषाक्का बरेच दिवस होती. परंतु अशा जागेच्या शोधांत राहूनाहि तिला बिऱ्हाड बदलतां आलं नव्हतं. त्यामुळें वसंत एके दिवशीं जेव्हां एक जागा हेरून आला तेव्हां श्यामाला बरोबर घेऊन उषा ती जागा लगेच पाहून आली, व दोघींनाहि ती पूर्ण पसंत पडल्यामुळें त्यांनीं ती ताबडतोब ठरवून टाकली. पुण्यांत 'दर्शन्यांचा राम' फार प्रसिद्ध आहे. त्या राममंदिरालगतच ही जागा होती. खालीं दोन आणि वर दोन अशा खोल्या होत्या व हवा, पाणी, सर्व दृष्टींनीं जागा आकर्षक होती. पुढच्या बाजूस हमरस्ता होता व माडीवरच्या खोल्यांना पश्चिमेकडे ज्या खिडक्या होत्या त्यांतून

बाहेर पाहिलं, कीं खालीं लगतच राममंदिराच्या पाठीमागची विस्तीर्ण बखळ दिसत असे.

मार्च महिना पुरा होण्याची वाट न पाहतां पंधरा तारखेलाच रविवारची सुटी साधून उषाक्कान या नव्या जागेंत बिऱ्हाड नेलं. सामान हालविण्याचं काम वसंतनं आपल्या ओळखीच्या सिनेमा कंपनींतून एक मोठी लॉरी आणून बिनबोभाट करून टाकलं. तरी सामान नव्या जागीं लावण्याचा व्याप कांहीं थोडा नव्हता, आणि तो उषा व श्यामा या दोघींनाच करावा लागला. दोनच दिवस आधीं श्यामाला हिंवताप आल्यामुळें उषा तिला पुनःपुन्हा " तूं कांहीं करूं नको, स्वस्थ पडून राहा " असं म्हणत होती, आणि तिचं न ऐकतां श्यामा तिला मदत करीतच होती. परंतु ते श्रम तिला सोसले नाहींत आणि संध्याकाळीं तिला अंथरूण धरावं लागलं. तिला हिंवतापाची पाळी आली नाहीं, परंतु थकवा फार आला. कांहीं थोडी खरेदी करणं आवश्यक होतं म्हणून उषा वसंतबरोबर बाजारांत जायला निघाली तेव्हां " मी जाऊन येऊं का ग जरा ?" या तिच्या प्रश्नाला " हं जा ना. मला कांहीं होत नाहीं." असं तिनं उत्तर दिलं तें थकव्यामुळें आलेल्या गुंगींतच. उषाक्का व वसंत दोघंहि आपल्या अंथरुणाजवळ बसलीं आहेत याची जाणीव तिला कांहीं वेळ राहिली, परंतु मग तीं दोघं केव्हां उठून गेलीं तें तिला कळलं नाहीं.

बराच वेळ तिचा डोळा लागला असावा.

तिनं डोळे उघडले तेव्हां चांगलीच संध्याकाळ झालेली तिला दिसली. तिन्हीसांजाच्या अगोदरचा विचित्र धूसर प्रकाश खोलींत भरला होता. वर अगर खालीं कुणाचीच चाहूल ऐकूं येत नव्हती. वसंत आणि उषा बाजारांतून अजून परत आलीं नसावीत. आपल्या

घशाला कोरड पडली आहेसं श्यामाला वाटलं, परंतु पाणी पिण्यासाठीं चटकन उठणं तिला नकोसं वाटलं. बखळींतल्या कोणत्या तरी एखाद्या झाडाच्या फांदीच्या टोकाची सांवली समोरच्या भिंतीवर किंचित् हालत होती तिच्याकडे पाहत ती जागच्या जागीं स्वस्थ पडली. कुणी तरी उंच आवाजांत कवाइतीचे निरनिराळे हुकूम सोडावे तसे शब्द तिला बखळीच्या बाजूनं ऐकूं आले. डोळे उघडण्यापूर्वींहि असेच शब्द ऐकल्याचा भास त्याला तिला झाला होता. पण तिला वाटलं होतं तें स्वप्न आहे. परंतु आतां जेव्हां ते शब्द तिनं पुन्हा अगदीं स्पष्ट स्पष्ट ऐकले तेव्हां मघांचा तो स्वप्नांतला भास नव्हता हें उघडच झालं.

उठून खिडकीपाशीं जावं आणि बखळींत खरोखरीच कवाईत चालली आहे कीं काय तें पाहावं असा विचार तिच्या मनांत आला. पण तिनं तसं केलं नाहीं. अंथरुणावर पडल्यापडल्याच कमी अधिक वेळेच्या अंतरानं उच्चारले जाणारे कवाइती-हुकुमांचे ते शब्द ती ऐकत राहिली.

आणि ते ऐकतां ऐकता मधेंच तिच्या मनानं एक तर्क केला त्याबरोबर ती स्वतःशींच दचकली.

ज्या तरुणानं मिरजेच्या स्टेशनवर तिच्या हातीं शस्त्र दिलं होतं त्याच्या शब्दासारखाच हा शब्द नव्हता काय ?...

अधिक लक्ष देऊन ऐकण्याचं तिनं ठरविलं. परंतु तितक्यांत हुकुमाचे ते शब्दच बंद झाले !

श्यामा मनाशीं आश्चर्य करूं लागली.

पण मग चार पांच मिनिटं गेलीं नाहींत तोंच सामुदायिक प्रार्थनेचे गंभीर स्वर तिच्या कानीं पडले; आणि तिनं जेव्हां

एकाग्रतेनं ऐकण्याचा प्रयत्न केला तेव्हां प्रार्थनेचे शब्दहि तिला ऐकूं येऊं लागले:—

नमस्ते सदा वत्सले मातृभूमे ।
त्वया हिंदभूमे सुखं वर्धितोहम् ॥
महा मंगले पुण्यभूमे त्वदर्थे ।
पतत्वेष कायो नमस्ते नमस्ते ॥ १ ॥
प्रभो शक्तिमन् हिंदराष्ट्रांगभूता ।
इमे सादरं त्वां नमामो वयम् ॥
त्वदीयाय कार्याय बद्धा कटीयम् ।
शुभामाशिषं देहि तत्पूर्तये ॥ २ ॥

... ... ... ...

... ... ... ...

मातृभूमीच्या सेवेसाठीं बद्धकटि होऊन त्या कार्यांत तिचे मंगल आशीर्वाद मागण्यासाठीं केलेल्या त्या प्रतिज्ञास्वरूप प्रार्थनेचे घोषस्वर ऐकतांना श्यामाच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. प्रार्थनेच्या प्रत्येक कडव्यागणिक तिच्या अंतःकरणाचा सद्गदितपणा वाढत गेला, आणि शेवटीं पहिल्या पालुपदाचा 'पतत्वेष कायो नमस्ते नमस्ते' हा अखेरचा चरण तिच्या कानीं जेव्हां पुन्हा पडला तेव्हां तर तिच्या शरीराचा थकवा पार नाहींसा होऊन कांहीं एका विलक्षण उत्साहाच्या लहरी तिच्या सर्वांगभर झर्रकन उठून गेल्या !

तिला राहवेना. ती अंथरुणावरून उठली आणि खिडकीशीं गेली. तिनं वाकून पाहिलं तों बखळींतल्या पिंपळाच्या पारालगतच्या मोकळ्या जागीं गणवेष केलेल्या साठ सत्तर तरुणांच्या मध्यभागीं उंच ध्वजापुढें मस्तक नम्र करून उजव्या पंजाचीं बोटं छातीशीं

आडवी करून लष्करी पविश्यांत उभा राहिलेला एक तरुण तिला दिसला.

त्यानं आपला प्रणाम संपवून मान उचलून दृष्टि वर केली तेव्हां त्याचा चेहरा पूर्णपणें तिच्या दृष्टीस पडला, आणि तो दिसल्याबरोबर तिनं एकदम दचकून आपला डावा हात वक्षःस्थलाला लावला.

तिनं झटकन् पुन्हा एकदां निरखून नजर टाकली, आणि मग खिडकींतून दूर होऊन आपली मोठी कातडी बॅग उघडून तिच्यांतील जंबिया तिनं काढला, आपल्या कमरेला खोवला, व ती जिन्याच्या पायऱ्या उतरून खालीं धावली !

तिच्या शरीराची श्रांत स्थिति पार नाहींशी झाली होती. उषा परत आली नसतांना आपण घर तसंच उघडं टाकून जात आहोंत याचंहि भान तिला राहिलं नव्हतं...

आतां ती त्याला भेटणार होती ! इतके दिवस ज्यानं खट्याळपणा केला तें दैव तिला अकल्पितपणें प्रसन्न झालं होतं. तिला आतां बिलकुल धीर उरला नव्हता !

# ११

" ताई !...ताईऽ !"

बाहेर बखळीकडे पाहत खिडकींत उभ्या असलेल्या श्यामानं दचकून वळून पाहिलं. दारालगत जिन्याच्या पायरीवर उषाक्का उभी होती, ती म्हणाली,

" किती हाका मारल्या तुला खालून ! तुला ऐकूं नाहीं आल्या ?"

" नाहीं."

" कमाल आहे."

" तूं शाळेंतून केव्हां आलीस ?"

उषा हसली. " इश्श. मला येऊन चांगला अर्धा तास झाला. मी आलें, वर येऊन इकडच्या खोलींत पुस्तकं ठेवलीं, पातळ बदललं, खालीं गेलें, चहासुद्धां केला. खालीं जातांना इकडे या खोलींत डोकावून पाहिलं तेव्हां तूं अशीच खिडकीशीं उभी होतीस. मला वाटलं माझी चाहूल तुला लागली असेल अन् तूं येशील खालीं. पण तूं आली नाहींस. शेवटीं चहा गाळला

तेव्हां तुला हाका मारल्या. तरी तूं आली नाहींस म्हणून वर आलें. म्हटलं करते आहे तरी काय ही? मला वाटलं कांहीं लिहिण्यांत गुंतल्या असतील लेखिकाबाई! पण इथें येऊन पाहतें तों तूं अजूनहि मघांसारखीच खिडकीशीं उभी! पाहते आहेस तरी काय येवढं?"

खिडकीपासून दूर होतांना श्यामानं पुन्हा एकदां बखळीकडे नजर टाकली. तिनं एक सुस्कारा टाकला, व मग ती उषाक्काजवळ येऊन म्हणाली,

"चहा निवून गेला होय?"

"नाहीं, मी झाकून आलें आहे." उषा म्हणाली, व मग खालीं गेल्यावर 'पाहते आहेस तरी काय येवढं?' असा जो प्रश्न तिनं श्यामाला केला होता त्याची तिला आठवण राहिली नाहीं. त्या प्रश्नाचं उत्तर श्यामानं मुद्दाम टाळलं असं तर तिला वाटण्याचं कांहींच कारण नव्हतं.

पण खरी गोष्ट मात्र अशी कीं श्यामानं तें टाळलं होतं. पांच वाजण्याच्या आधींपासूनच ज्या हेतूनं ती बखळीच्या बाजूकडच्या खिडकींत उभी राहिली होती तो बहिणीजवळ बोलून दाखविण्या-सारखा नव्हता.

तो आज पुन्हा दिसेल अशी तिची अपेक्षा होती.

जर दिसला तर पुन्हा त्याची गाठ घेण्याचा बेत तिनं मनाशीं केला होता.

काल तिची व त्याची अकल्पितपणें भेट झाली होती खरी, परंतु त्या भेटीनं तिचं समाधान झालं नव्हतं.

गणवेषांतील तरुणांच्या मध्यभागीं ध्वजापुढें उभा राहिलेला तोच तो अशी खात्री होतांच ती जंबिया काढून कमरेला खोवून

धावली तेव्हां आपल्याला तो आतां भेटणार या एकाच कल्पनेनं तिचं मन इतकं भरून गेलं होतं, की त्याच्याजवळ गेल्यावर आपण प्रथम काय बोलूं अगर आपण दृष्टीस पडल्यावर तो प्रथम काय म्हणेल किंवा विचारील याबद्दलचा ओझरतादेखील विचार तिनं केला नव्हता. त्वरेनं त्याच्याकडे जायचं येवढंच त्या क्षणीं तिला समजत होतं. परंतु, बखळीचं दार ओलांडून ती आंत शिरली, आणि मग मात्र तिच्या मनांत आलं, एकदम त्याच्या-पुढें जायचं कसं, अन् बोलायचं काय ! माझं नांव अमुक, तुमचं हें शस्त्र माझ्याजवळ फार दिवस राहिलं तें घ्या परत असं का ती एकदम म्हणणार होती !...

मनांत अशा शंका उद्‌भवल्यामुळें तिची गति मंद झाली, व चार पांच पावलं टाकल्यावर ती उभीच राहिली.

तिच्या अंगावरून दहा बारा मंडळी गेली, त्यांनीं तिच्याकडे जरा विस्मयानं पाहिलं. ही तरुण मुलगी इथें कशाला आली अशा अर्थाची त्यांची एकमेकांत नेत्रपल्लवी झाल्यासारखी दिसली. श्यामाच्या मनांत आलं, आपण इथें आलों ही फार अनुचित गोष्ट तर झाली नाहीं ! आपण परत जाणंच योग्य होईल काय ! परंतु त्याला भेटल्याशिवाय तसंच निघून जायला ती मुळींच तयार नव्हती. पुढें पाऊल टाकण्याचा तिला धीर होईना, पण तें मागंहि पडेना. ती क्षणभर तशीच थबकून उभी राहिली. तिच्या पुढून बखळीच्या दाराकडे आणखी कांहीं तरुण गेले त्यांच्या दृष्टीला धीटपणें दृष्टि देणं तिला फार कठीण झालं.

एक तरुण एकटाच जात होता. तिला पाहून त्याच्याहि चेहऱ्यावर आश्चर्य दिसलं. पण इतरांप्रमाणें निघून जाण्याऐवजीं तिच्यापुढें थांबून त्यानं विचारलं,

" आपलं काम आहे कांहीं ? "

तो मुकाट्यानं जाण्याऐवजीं बोलला याचंच श्यामाला मोठं समाधान झालं. तिचा संभ्रम कमी झाला. थोडा धीर आल्याप्रमाणें तिला वाटलं. ती किंचित् हसली, व होय, माझं काम आहे अशा अर्थानं तिनं मान हालविली.

तो तरुण थांबला. " काय काम आहे, सांगा. म्हणजे मला मदत करतां येण्यासारखी असेल तर करीन "–इतका अर्थ त्याच्या त्या थांबण्यांत उघड होता.

श्यामाच्या तें लक्षांत आलं. पण तिचं कोणाकडे काम होतं तें ती कसं सांगणार ? त्याचं नांवहि तिला माहीत नव्हतं. तिला पुन्हा फार गोंधळल्यासारखं झालं. कांहीं तरी बोललंच पाहिजे म्हणून ध्वजाच्या दिशेकडे नजरेनं खूण करून ती हलकेंच म्हणाली,

" त्यांना भेटायचं आहे..."

त्या शब्दांचा उच्चार पूर्ण होण्यापूर्वींच तिला वाटलं ऐकणाराला फार चमत्कारिक वाटण्यासारखे आहेत हे शब्द. परंतु ते तिच्या तोंडांतून निघून गेले होते. आतां ते परत घेतां येण्यासारखे नव्हते. तिच्या मनाचा गोंधळ अधिकच वाढला. तो तरुण आतां काय म्हणतो त्याची वाट पाहत ती स्तब्ध उभी राहिली.

पण तितक्यांत बखळीच्या दारांतून कोणी तरी ओरडलं होतं " राजा, अरे येणार ना ? ", आणि " आलों रे ! " असं त्या आवाजाला उत्तर देऊन त्या तरुणानं तिच्याकडे पाहिलं होतं व " मग जा ना पुढं. हरकत नाहीं." असं पुटपुटून तो दाराकडे दौडत गेला होता.

श्यामानं ध्वजाच्या बाजूला पाहिलं. बहुतेक मंडळी निघून गेली होती. पण तो एकटा नव्हता. चार पांच तरुण त्याच्यापुढें

उभे होते, व त्यांना तो कांहीं तरी सांगत होता. बोलतांना माने-भोंवतीं हातरुमाल ताणून दोन्ही हातांनीं त्याचीं टोकं ओढण्याचा चाळा तो करीत होता ही गोष्ट तेवढ्या ओझरत्या दृष्टिक्षेपांतहि तिच्या विशेष लक्षांत आली आणि तिला ती फार आवडली.

ती मग झटकन् पुढें झाली.

तिनं नमस्कार केला तेव्हां त्यानंहि केला, व तो जरी हसला नाहीं तरी त्याची दृष्टि प्रसन्न झाली. "तुम्हांला पूर्वीं कुठें तरी पाहिलं आहे आम्हीं"—त्याचे नेत्र किंचित् विकासित होऊन म्हणाले. आणि त्याच्या नजरेंतल्या त्या अभिप्रायानं धीर येऊन श्यामा म्हणाली,

"आपली एकदां भेट झाली आहे. चार महिने होऊन गेले. मिरजेच्या स्टेशनवर."

"होय. तुमच्या मेहेरबानीनं मला त्या दिवशीं जागा मिळाली."

"तुमची एक वस्तु माझ्याजवळ राहिली आहे."

"होय." तो हसला. "राहिली आहे खरी. त्या दिवशीं असं झालं, पुण्यास गाडी येऊन पोंचल्यावर मी तुमच्या डब्याकडे आलों. पण दारं, खिडक्या सारं आंतून बंद. खिडकीवर थाप मारून पाहिली पण उपयोग झाला नाहीं. मग अधिक प्रयत्न केला नाहीं तुम्हांला उठविण्याचा. म्हटलं राहीना का ती वस्तु तुमच्या-जवळ. न भेटतां जाणं वावगं दिसलं असेल जरा. पण...पण त्याबद्दलची दिलगिरी आतां—"

"छे छे!" श्यामानं झटकन म्हटलं, "दिलगिरी मींच प्रदर्शित करायला पाहिजे."

ती हसली. तोहि किंचित् हसला.

पण मग बोलणं एकदम बंद झालं. कां कोण जाणे पुढें काय बोलावं तें तिला अगदींच सुचेना. तोहि आपण होऊन कांहीं बोलला नाहीं. तिच्या मनांत येत होतं मुंबईत त्याला आपण कसं पाहिलं, आपण कशा रस्त्यांत अडविण्या गेलों, अन् तेवढ्यांत तो बसमधें चढून गेल्यामुळें थोडक्यांत चुकामूक कशी झाली, ती गमतीची हकीगत त्याला सांगावी. परंतु तिला असंहि वाटलं, नको, ती हकीगत सांगितल्यास त्याच्या भेटीसाठीं आपण किती उत्सुक झालों होतों तें कबूल केल्यासारखं होईल. आपल्या भेटीची इच्छा त्याच्या ठिकाणीं किती होती हें त्याच्या बोलण्या-वरून अजून उघड झालं नव्हतं. तें कळल्यावांचून असलं कांहीं बोलणं बरं नव्हतं....आणि तिला दुसरं तर कांहीं सुचेना. तोहि गप्पच राहिला. न बोलतां त्याच्याकडे नुसतंच पाहणं तिला जमेना.

कांहीं बोलणं सुचत नाहीं तर त्याचा जंबिया देऊन टाकावा आणि परत फिरावं...तिनं उजव्या हातानं वस्त्राखालीं झाकलेलं तें शस्त्र चाचपल्यासारखं केलं. दुसऱ्याच क्षणीं तिनं तें बाहेर काढलंहि असतं.

परंतु त्याच्या उजव्या हाताशीं उभ्या असलेल्या एका तरुणानं तितक्यांत आपलं डावं मनगट वर उचलून घड्याळाकडे स्वतः तर पाहिलंच, पण शिवाय त्याला तें दाखविल्यासारखा आविर्भाव केला.

त्यानं विचारलं, “ काय बापट, किती वाजले ? ”

बापट म्हणाला, “ साडेसहा वाजून गेले ना; एव्हांना आपण खर म्हणजे सभेच्या ठिकाणीं पोंचायला हवं होतं.”

“ असं ? ” त्यानं तो उद्गार अशा तऱ्हेनं काढला कीं आतां तो तेथून निघणार याबद्दल श्यामाला खात्री वाटली, आणि ती वाटल्याबरोबर कमरेकडे नेलेला आपला उजवा हात तिनं दूर केला.

त्याचा जंबिया आतांच परत न देण्याचं तिच्या मनानं तेवढया क्षणार्धांत ठरविलं होतं. आपण आतां तो परत दिला तर तो घेऊन तो निघून जाईल. फार तर जातां जातां कांहीं तरी औपचारिक बोलेल; आणि मग त्याची पुन्हा गाठ घ्यायला आपल्याला निमित्त काय राहणार ?... या सर्व गोष्टी तिच्या चटकन् मनांत आल्या, व ती त्याला म्हणाली,

" जंबिया उद्यां आणून परत देईन मी. आत्तां तो माझ्याजवळ नाहीं. कसा असणार ? मला अवचितच दिसलं अन् मग मी तशीच इकडे आलें."

खोटं बोलणं तिला नीटसं जमत नव्हतं, अन् त्यामुळें ती कांहीं तरी बडबल्यासारखं बोलत होती.

तो तिला म्हणाला, " जंबिया उद्यां दिलात तरी चालेल. त्याची कांहीं घाई नाहीं येवढी. मला मात्र जरा घाई आहे. आमची एक छोटीशी सभा आहे, तिकडे जायला पाहिजे लवकर. जाऊं मी ? "

त्यानं नमस्कार केला व पाऊलदेखील पुढें टाकलं.

तो अगदीं एकदम निघून जात आहे असं श्यामाला वाटलं. 'जरा थांबा' असं म्हणणं तिला शक्य नव्हतं. परंतु पर्यायानं तसं करण्यासाठीं—निदान त्यानं किंचित् थांबून मागं वळून तरी पाहावं म्हणून ती म्हणाली,

" मग उद्यां आणून देईन."

" चालेल."

" इथेंच येऊं ? "

त्यानं किंचित् विचार केला असावा. पण तो म्हणाला, " कांहीं हरकत नाहीं."

"याच वेळीं ?"

"हं." असं म्हणून आपल्या सहकाऱ्यांबरोबर निघून जाण्यापूर्वी त्यानं तिच्याकडे दृष्टि टाकली, व किंचित् हास्यहि केलं.

परंतु तेवढ्यानं श्यामाचं समाधान झालं नाहीं. तो आपल्याशीं जरा तुटकपणानंच वागला असं तिला वाटलं. तुम्हांला मी अवचित दिसलों म्हणजे कुठून दिसलों असं त्यानं विचारायला नको होतं काय? तुम्ही इतके दिवस पुण्यांतच होता कीं दुसरीकडे होता असा देखील प्रश्न त्यानं वास्तविक करायला हवा होता. परंतु तें कांहींच न करतां तो खुशाल चालता झाला होता. ही काय वागण्याची—विशेषतः एखाद्या स्त्रीशीं वागण्याची पद्धत झाली ?

पण त्याच्याविषयीं वाईट मत करून घेणं तिच्या जरा जिवावरच आलं. तिनं मनाशीं विचार केला, तो जाण्याच्या फार घाईत असल्यामुळें असं वागला असेल.

तथापि तिच्या स्वाभिमानानं तक्रार केली, घाईत असला म्हणून काय झालं ? चार औपचारिक आर्जवी शब्द बोलण्यांत असा कितीसा वेळ खर्च झाला असता ? तुम्ही कुठें राहतां, काय करतां, याची चौकशी त्यानं करायला नको होती ?... इतकंच काय तिचं नांव माहीत करून घेण्याची सुद्धां इच्छा त्यानं दर्शविली नव्हती !

आणि त्यामुळें तिलाहि त्याचं नांव विचारणं अशक्य झालं होतं !

तिला तो अकल्पितपणें भेटला होता खरा, परंतु त्या भेटीनं तिच्या मनाचं समाधान झालं नव्हतं. उलट तिन्हीसांजांच्या अंधुक होत चाललेल्या प्रकाशांत त्या बखळीच्या मोकळ्या जागेंत आपण एकट्याच उभ्या राहिल्या आहोंत हें जेव्हां तिच्या लक्षांत आलं तेव्हां तिचं मन अप्रसन्न आणि रुष्टच झालं.

तिची त्याची ही पहिली भेट मोठी चमत्कारिक झाली होती. तिनं वर पाहिलं तों पारावरच्या पिंपळाच्या दोन फांद्यांमधून चंद्राची द्वितीयेची कोर अगदीं पुसट दिसत होती. बखळींतल्या झाडांच्या शेंड्यांवर रात्रीच्या आसऱ्यासाठीं बसणाऱ्या पक्ष्यांची फडफड आणि चिंवचिंव चालली होती. जरा बाजूला उंच ध्वज वाऱ्याशीं खेळत होता...

त्याची भेट अशा स्थळीं होईल अशी तिची कधींच कल्पना झाली नव्हती; आणि भेट होऊनहि त्याचं नांव तिला अज्ञातच राहावं ही गोष्ट तर फारच विचित्र होती.

पण ती त्याला उद्यां पुन्हा भेटणार होती. त्या भेटींत आपण त्याला सारं सांगू अन् सारं विचारून घेऊं असा विचार मनांत येतांच तिला फार बरं वाटलं. ती परत घरीं गेली तेव्हां त्याच्या-बद्दलचे प्रतिकूल विचार तिच्या मनांत उरले नव्हते. उलट तिच्याशीं त्यानं जें थोडं संभाषण केलं त्यांतले गोड शब्द ती वेचून आठवूं लागली; आणि तिच्याशीं बोलतांना तो किती सुंदर दिसत होता, मधेंच तो आपल्या मित्रांकडे पाही व मग तिच्याकडे दृष्टि वळवी तेव्हां किती गमतीचं अस्फुट हास्य त्याच्या मुखावर उमटत होतं, गडद डाळिंबी रंगाची हाफ् पॅंट, उघड्या गळयाचा शुभ्र शर्ट आणि डोक्यावर विजारीच्याच रंगाची शिपाई थाटाची टोपी असा तो गणवेष त्याला किती शोभून दिसत होता, आणि मानेवर ताणलेल्या हातरुमालाचीं दोन्ही टोकं ओढून धरणाऱ्या त्याच्या भरदार हातांकडे पाहण्याचा मोह तिला कसा आवरावा लागला होता इत्यादि स्मृतिचित्रं तिच्यापुढें पुनःपुन्हा उभीं राहूं लागलीं.

रात्रीं निजण्यापूर्वी ती जेव्हां खिडकींत उभी राहिली तेव्हां बखळींत अंधार होता, परंतु अंधारांतहि संध्याकाळच्या भेटीच्या

वेळीं तो जसा ध्वजापुढें उभा राहिलेला तिला दिसला तसाच तो तिला पुन्हा दिसला होता व उद्यां आपण त्याची भेट घेऊं त्या वेळीं त्याच्याशीं काय काय बोलायचं त्याचे तिनं मनाशीं बेत केले होते...

आणि आज सकाळपासून तिचं सारं चित्त संध्याकाळच्या भेटीकडेच लागलेलं होतं. पांच वाजण्याच्या आधींपासूनच ती खिडकींत उभी राहिली होती. कांहीं वेळ तिला बखळींत कुणीच दिसलं नव्हतं. पण मग हलकेहलके मंडळी जमा होऊं लागली होती. साडेपांचच्या सुमाराला तर कवाईत देखील सुरू झाली. परंतु तो तिला दिसेना. आज कवाइतीचे हुकूम दुसराच एक तरुण सोडीत होता.

तो आज कां आला नसावा त्याचा तिला कांहींच तर्क करतां येण्यासारखा नव्हता. तिच्यानं खिडकी सोडून दूरहि जाववेना, आणि खिडकींत उभं राहून आपली अपेक्षा पूर्ण होईल असंहि तिला चिन्ह दिसेना. ती अतिशय खिन्न होऊन जागच्या जागीं उभी राहिली होती व त्यामुळेंच उषानं वर जिन्यांत येऊन 'ताई' अशी हाक मारली तेव्हां ती दचकली होती. 'खिडकींत उभं राहून पाहते आहेस तरी काय एवढं?' या उषाच्या प्रश्नाचं ती कसं उत्तर देणार? तिनं तें मुद्दामच टाळलं, आणि उषाला त्या प्रश्नाची पुन्हा आठवण होऊं नये म्हणून खालीं गेल्यावर चहा पितांना तिनंच उलट उषाच्या शाळेंतल्या हकीगतीबद्दल एका-मागून एक प्रश्न तिला केले.

मात्र एकीकडे बहिणीशीं बोलत असतांना तिच्या मनांत सारखं येत होतं, आतां तरी तो आला असेल काय?

चहा आटपल्यानंतर दोघी वरच्या खोलींत गेल्या तेव्हां उषा आरामखुर्चीत बसली पण श्यामा तिच्याजवळ बसली नाहीं. एक पुस्तक उचलून घेऊन ती खिडकीपाशीं जाऊन उभी राहिली. ती उषाकाशीं बोलत होती, पुस्तक वाचण्याचं नाटकहि करीत होती, परंतु तिचं खरं चित्त होतं बाहेर बखळीकडे !

सूर्यप्रकाश अगदीं कमी झाला, कवाईत संपली, कालच्याप्रमाणेंच प्रार्थनाहि सुरू झाली—

पण तिला तो दिसला नाहीं !

  

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिच्या नांवाचं एक पाकीट टपालांतून आलं. डॉक्टरकाकांच्या खार रोडच्या पत्त्यावर प्रथम जाऊन तें इकडे आलं होतं. पाकिटावर 'प्रतिज्ञा कचेरी, पुणें नं.२' असा छापील मजकूर होता.

श्यामानं पाकीट फोडलं व आंतल्या पत्रावरची सही आधीं पाहिली. 'शरद् केशव दर्शने'. सहीच्या वरती 'आपला नम्र' असंच लिहिलं होतं, आणि पत्राच्या प्रारंभीं 'कृ. सा. न. वि. वि.' असाच मायना होता. त्या मायन्यावर अशोकनं जो विनोद केला होता त्याची तिला आठवण झाली, आणि हें पत्र पाहायला अशोक आज हवा होता असं एकीकडे मनाशीं म्हणत ती तें वाचूं लागली:—

"आपलें पत्र मिळालें. हरिपुरा कॉंग्रेसनिमित्त निघालेल्या 'प्रतिज्ञे'च्या खास अंकांतील सर्व लेख आपणांस आवडले हें वाचून

समाधान झालें. 'प्रतिज्ञे'स लेखनसाहाय्य करण्याचें नुसतें अभिवचनच न देतां पत्राबरोबर आपण आपला एक नवा लेख धाडून दिला याबद्दल मी फार आभारी आहे.

आपली ही 'नवी चुकामूक' आपल्या पहिल्या 'हाके'इतकीच सरस वठली आहे. ज्या देशभक्तांना योग्य परिस्थितीची संधि मिळते त्यांना यश येऊन त्यांचीं नांवें लोकांच्या स्मरणांत राहतात; परंतु ज्या देशभक्तांची व अनुकूल संधीची चुकामूक होते त्यांची स्मृति कुणी ठेवावयाची असा प्रश्न कल्पून आपण जें शब्दचित्र काढलें आहे तें खरोखर फार रम्य आणि हृदयस्पर्शी झालें आहे. येत्याच अंकांत आपली ही 'चुकामूक' प्रसिद्ध करणार आहोंत.

आपल्याकडे 'प्रतिज्ञे'चे अंक पाठविले जातात ते आपल्याला व्यवस्थित पोंचतात ना ?

आमच्या या अवघड वृत्तपत्रीय प्रयत्नाबद्दल अशीच सहानुभूति ठेवून साहाय्य करीत जावें अशी विनंति करतों."

तें पत्र वाचून संपविल्याबरोबर श्यामा जिन्याच्या दाराशीं जाऊन वाकली व तिनं ओरडून विचारलं, "अक्का, ए अक्का ! वाजले किती ग ?"

"साडेआठ वाजून दहा मिनिटं."

"येवढेच ना ?" असं अर्धवट स्वतःशींच म्हणून श्यामा खोलींत परतली, व कपडे बदलूं लागली.

'प्रतिज्ञा' कचेरींत जाऊन संपादकांचा परिचय करून घेण्याचं तिनं मनाशीं ठरविलं होतं.

कपडे बदलल्यावर खालीं येऊन ती उषाला म्हणाली, "मी थोडी बाहेर जाऊन येतें ग."

" जेवायच्या वेळेच्या आंत येशील ना ?"

" हो हो, अगदीं खास."

रस्त्यावर पाऊल टाकल्यावर तिच्या लक्षांत आलं कीं, पुण्यांतल्या रस्त्यांची तिला फारच थोडी माहिती होती. परंतु 'प्रतिज्ञा' कचेरी कुठें असावी त्याचा तिनं मनाशीं थोडा अंदाज केला होता, व त्या अदमासानं जायचं तिनं ठरविलं होतं.

दोन चौक ओलांडून डाव्या बाजूला बराच वेळ गेल्यावर मात्र तिला शंका आली, आपण फार पुढे तर आलों नाहीं ? ती जराशी थबकली. डाव्या हातच्या अरुंद रस्त्यानं एक विद्यार्थी येतांना तिला दिसला. त्याला वाट विचारावी काय असं तिच्या क्षणभर मनांत आलं, परंतु तितक्यांत तिनं मान वर करून दूरवर दृष्टि टाकली व 'प्रतिज्ञा' अशी पाटीच तिच्या नजरेस पडली.

मग ती त्या अरुंद रस्त्यांत वळली व पुढें झाली.

ती जिना चढून जाऊन कचेरीच्या दाराशीं पोंचली तेव्हां दारालगतच्या लहानशा दालनांत दोन कोपऱ्यांत दोन तरुण कामांत गुंतलेले तिला दिसले. त्यांपैकीं एक हिशोब लिहीत असावा. दुसरा प्रुफं तपासण्यांत गुंतला होता. दाराच्या पातळ फळीवर तिनं टक-टक असा आवाज केला, तेव्हां त्या दोघांनींहि माना वर करून तिच्याकडं पाहिलं.

तिनं विचारलं, " प्रतिज्ञा कचेरी हीच ना ?"

प्रुफं वाचणारा तरुण चटकन उठला व म्हणाला," होय." त्यानं टेबलाच्या अलीकडच्या बाजूनी एक खुर्ची पुढं सरकविली, आणि विचारलं, " आपलं काय काम आहे ?"

तेवढ्यांत श्यामा बसली होती. टेबलावर पडलेल्या प्रुफांकडे तिची दृष्टि जातांच ती किंचित् हसली, आणि म्हणाली,

" हा माझाच लेख तुम्ही तपासताहांत वाटतं ? "

तो तिचा प्रश्न ऐकतांच प्रुफं तपासणारा इसम एकदम चकित झाला. " लेखिका श्यामा आपण काय ? " असा अगदीं आदर-सूचक प्रश्न विचारून तो पार्टिशनच्या पलीकडच्या भागांत गेला, व तेथील एक खुर्ची सरकवीत तेथूनच म्हणाला, " इकडे आंत या ना."

बाहेरची जागा सामान्य लोकांसाठीं होती. आणि 'प्रतिज्ञे'ची एक लेखिका या नात्यानं तिला अधिक सन्मानानं वागविणं आवश्यक होतं, इतका सगळा अभिप्राय त्याच्या त्या लहानशा वाक्यांत भरलेला होता. श्यामा आनंदित झाली व आंत जाऊन बसली.

तो म्हणाला, " शरद् आतां इतक्यांत येतीलच. दहा पांच मिनिटं वाट पाहावी लागली तर आपली हरकत नाहीं ना ? "

श्यामा म्हणाली, " मी बसतें. माझ्या येण्यानं तुमच्या कामांत व्यत्यय येऊं देऊं नका. माझ्या हस्तलिखितांत शुद्धलेखनाच्या फार चुका असतात का हो ? "

" असतात, परंतु फारशा नाहींत." असं उत्तर देऊन तो हसला व मग जवळच्या शेल्फवरचा 'मॉडर्न रिव्ह्यू'चा ताजा अंक काढून तिच्यापुढें ठेवून तो बाहेरच्या दालनांत परत गेला.

मॉडर्न रिव्ह्यूचा अंक चाळण्यांत तिनं पंधरा वीस मिनिटं घालविलीं. मग तिला वाटलं, आपण किती वेळ अशी वाट पाहत बसणार ? निरोप ठेवून जावं काय ?

तिनं बाहेरच्या दालनांत जाऊन पाहिलं तों तिथें कोणीच नव्हतं. निरोप सांगून जायचं झालं तरी त्या दोघांपैकीं कोणी तरी

येईपर्यंत बसणं तिला भाग होतं. ती परत येऊन आपल्या जागेवर बसली, व अंक चाळून पाहूं लागली. "जपानी महिलांची धनुर्विद्या: लेखक ब्रजमोहन चतर्जी"— या लेखांतील फोटोग्राफ तिला आकर्षक वाटले. ते पाहून त्यांतला मजकूर ती मधून मधून वाचूं लागली—

"जपानी स्त्रीला गृहकृत्यांची हौस आहे, पण त्यापलीकडे आपल्याला जीवन नाहीं असें ती मानीत नाहीं. गृहाबाहेरच्या सर्व क्षेत्रांत तिचें पाऊल पुरुषाच्या बरोबरीनें पडलेलें आहे. शिक्षण, कला, उद्योगधंदे, इतकेंच काय लष्कर, आरमार, अशा सर्व क्षेत्रांचे दरवाजे जपानी स्त्रियांना खुले आहेत. शरीरबलसंवर्धनाचा जपानी स्त्रीचा प्रयत्न कौतुकास्पद आहे. केवळ स्त्रियांसाठीं जपान-मध्यें किती तरी मोठमोठ्या व्यायामशाळा आहेत, व या सर्व शाळांत अलीकडे धनुर्विद्येचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर..."

वाचतां वाचतां श्यामा थांबली. बाहेरच्या जिन्यावर वाजलेलीं पावलं अगदीं जवळ आल्यासारखीं तिला वाटलीं.

तिनं अंक दूर केला व वर पाहिलं, आणि त्याबरोबर—

ती विलक्षण आश्चर्यचकित झाली.

काल संध्याकाळीं त्यानं तिची निराशा केली होती! आणि आतां ध्यानींमनींहि नसतांना तो तिच्यापुढें— अगदीं जवळ उभा होता!

त्याचं इथें काय काम होतं?...

मनाच्या संभ्रमामुळें ती जागची उठूं लागली असावी. कारण तो म्हणाला,

"बसा, बसा—"

ती परत बसली. तो तसाच उभा राहिला.

ती म्हणाली, " काल मी तुमच्याकडे येणार होतें..."

" आलां नाहींत तेंच बरं झालं..." तो म्हणाला.

बखळीला लागूनच ती राहत होती, अन् तिनं खिडकींत उभं राहून त्याची वाट पाहिली होती, याची त्याला काय कल्पना ? श्यामाला वाटलं सांगावं; पण तोच पुढें बोलूं लागला,

" त्याचं असं झालं, आमच्या संघाची एक शाखा तळेगांवला उघडायचा बरेच दिवस बेत चालला होता. तिथल्या लोकांची तार आली अन् मला जावं लागलं..."

तो थांबला, तेव्हां ती चटकन् म्हणाली,

" इथें या वेळीं भेट होईल अशी नव्हती मला कल्पना."

" मलाहि नव्हती."

" अन् त्यामुळें तुमचा जंबिया आतांहि परत देतां येत नाहीं मला."

तो हसला, " केव्हां एकदां तो परत देऊन टाकूं अशी घाई झाली आहे कीं काय तुम्हांला ? "

" नाहीं...उलट—" पुढें बोलण्याऐवजीं तिनं त्याच्याकडे अर्थपूर्ण दृष्टीनं पाहिलं.

" मग झालं तर..."

त्याचे ते शब्द तिला फार प्रिय वाटले.

त्यानं बाहेरच्या दालनाकडे पाहिलं व तिला विचारलं, " हे लोक कुठें गेले आहेत ? खालीं छापखान्याकडे ? "

" काय जणं ? मी आलें तेव्हां दोघेहि होते. त्यांनीं मला अगत्यपूर्वक इथें आंत बसविलं. आतां ते कुठें गेले आहेत कुणास ठाऊक ? दहा पांच मिनिटांत शरद् येतील असं मला सांगितलं म्हणून मी बसलें; पण अर्धा तास होऊन गेला तरी त्या गृहस्थांचा

पत्ता नाहीं. आतां कंटाळून जायच्या विचारांत होतें मी तोंच तुम्ही—"

"असं का?"

त्याच्या हसण्यांत थट्टेचा ध्वनि होतासं तिला वाटलं, व त्यामुळें ती कांहींशी गोंधळली. तें त्याच्या लक्षांत येऊं नये म्हणून तिनं चटकन् विचारलं.

"तुम्ही देखील शरद्नाच भेटायला आलांत?"

तो मघांप्रमाणेंच हसत म्हणाला, "हो...अं...तसं म्हणायला कांहीं हरकत नाहीं ...अं...तुमचं काय काम आहे?"

"कांहीं नाहीं. म्हटलं भेटावं अन् परिचय करून घ्यावा. 'प्रतिज्ञे'त मी मधून मधून लिहितें. त्यांनीं मला फार उत्तेजनपर पत्रं लिहिलीं, तेव्हां वाटलं कीं जाऊन भेटलं तर—"

त्याच्या चर्येवर एकदम विलक्षण आश्चर्य दिसलं. पण लगेच त्याचे नेत्र आनंदानं चमकले, व तो हसून म्हणाला,

"म्हणजे लेखिका श्यामा तुम्ही कीं काय?... पण तुम्ही तर मुंबईस असतां ना? मग इथें...?"

"तुम्हांला काय माहीत मी मुंबईस असतें हें?"

"वा, म्हणजे काय? तुम्हीं मला पहिलं पत्र अन् तुमची 'हाक' पाठवलीत ती मुंबईहूनच कीं. गेल्या आठवड्यांत तुमचं दुसरं पत्र आलं त्यावर पत्ता, तारीख कांहींच नव्हतं. ठेवलं असेल मीं तें अजून; दाखवतों...."

असं म्हणत तो तिला ओलांडून टेबलापलीकडच्या खुर्चीकडे जाऊं लागला.

"कधीं कधीं विसरतें मी पत्रावर तें सारं लिहायला. पण

म्हणजे..." अगदीं पूर्ण हास्य करून तिनं विचारलं, " 'प्रतिज्ञे'च्या संपादकांशींच मी बोलतें आहे म्हणायची!"

उत्तर देण्याऐवजीं त्यानं खणांतून पत्र काढून तिच्यापुढें ठेवलं आणि तो हसला.

श्यामाला त्या क्षणीं इतका हर्ष झाला होता कीं तो व्यक्त होईल कीं काय अशी तिला भीति वाटली. मिरजेस भेटलेल्या ज्या तरुणाविषयीं तिच्या मनांत आतुरता उत्पन्न होऊन वाढत गेली होती तो तरुण, आणि ज्याच्या लेखनाविषयीं व कार्याविषयीं तिला आदर वाटूं लागला होता तो शरद्— या दोन्ही व्यक्ती तिला अशा एकदम भेटाव्या ही घटना तिला जितकी चमत्कृतिपूर्ण तितकीच सुखाची वाटली.

त्यानं ठेवलेल्या पत्राकडे पाहण्याऐवजीं तिनं त्याच्याकडेच पाहून अतिशय प्रसन्न हास्य केलं.

मग उषाकाला कबूल केल्याप्रमाणें जेवणाच्या वेळेच्या आंत तिला घरीं परत जातां आलं नाहीं!

# १२

तिला जावंसं फार वाटे, पण लगेच तिच्या मनांत येई कीं वरचेवर जाणं बरं दिसणार नाहीं; त्यामुळें नंतरच्या दहा बारा दिवसांत श्यामा 'प्रतिज्ञा' कचेरींत अवघी दोन तीन वेळांच गेली. परंतु तेवढ्यांतहि तिला दिसून आलं कीं, त्या ठिकाणीं काम करणारी जी तीन चारच तरुण मंडळी होती त्यांची शरद्‌वर विलक्षण निष्ठा होती. वयानं ते शरद्‌च्याच बरोबरीचे होते, पण ते सर्वजण त्याला आपला नेता मानीत. त्याच्या कर्तृत्वाविषयीं त्यांच्या मनांत जो आदर होता तो त्यांच्या बोलण्याचालण्यांत व वागण्यांत पदोपदीं दिसे. 'प्रतिज्ञा' पत्र म्हणजे सर्वांनीं मिळून उचललेलं एक कार्य आहे या भावनेनं त्यांचे उद्योग चालत, व या कार्यांत शरद् सांगेल त्याप्रमाणें वागायचं ही जाणीव त्यांनीं मनाशीं धरलेली स्पष्ट दिसे. "शरद्‌ला विचारलं पाहिजे", "शरद्‌नं सांगितलं आहे" हे शब्द त्या कचेरींत पुनः पुन्हा तिच्या कानांवर येत.

ती प्रथम त्या ठिकाणीं गेली तेव्हां ज्यानं प्रुफं तपासतां तपासतां उठून तिचं स्वागत केलं होतं, तो तर शरद्‌विषयीं बोलूं लागला

कीं कौतुकानं किती बोलूं व किती नको असं त्याला झालं आहेसं ऐकणाराला वाटे, आणि इतर कोणत्याहि विषयावर सुरू झालेल्या बोलण्याला शरद्विषयींच्या वळणावर न्यायला तो उत्सुक असे. यामुळें त्याच्याकडून शरद्च्या पुष्कळच गोष्टी श्यामाला कळल्या. तिची व शरद्ची भेट झाली त्यानंतर दोन दिवसांनीं ती 'प्रतिज्ञे'च्या कचेरींत गेली तेव्हां तो एकटाच तिथं होता. तिला पाहतांच खुर्ची पुढें करून तो म्हणाला,

"शरद् आज इकडे येणार नाहीं; मघांशीच त्याच्याकडून निरोप आलाय."

त्याचं नांव बापू शेवडे व 'प्रतिज्ञा' कचेरींत तो उपसंपादकाचं काम करतो एवढं माहित होण्याइतकाच जरी श्यामाचा व त्याचा परिचय झालेला होता तरी त्याच्या त्या बोलण्याची थट्टा करावीसं तिला वाटलं, व ती म्हणाली,

"पण माझं तुमच्याकडे काम नसेल कशावरून?"

तो हसला व म्हणाला, "तुम्ही शरद्ला भेटायला आला असाल तर आलांत तशा परत जा अशा अर्थी नाहीं कांहीं मीं तुम्हांला सांगितलं."

ती हसली व त्याच्यापुढें प्रुफांचे कागद पडले होते त्यांकडे पाहून ती म्हणाली, "तुम्ही नेहमींच प्रुफं तपाशीत असतां वाटतं?"

"तुमची कोटी बरोबर आहे. वास्तविक आज कांहीं 'प्रतिज्ञे'च्या फॉर्मचीं प्रुफं तपासायचा दिवस नाहीं. पण शरद्चं एक पुस्तक छापलं जातंय त्याचीं हीं प्रुफं आहेत. प्रुफं तपासण्यांत मी निष्णात आहे."

"प्रुफं तपासणं म्हणजे एक मोठं अवघड काम आहे अशा आविर्भावानं तुम्ही बोलत आहांत."

" फारसं अवघड नाहीं. पण वाटतं तितकं सोपंहि नाहीं."

श्यामानं चटकन् विचारलं, " मला एकदां शिकून घ्यायचं आहे तें. तुम्ही शिकवाल ?"

" शरद्नं सांगितलं तर शिकवीन."

" मीं त्यांना याबद्दल विचारलं तर संमति देतील का ते ? इथें या तुमच्या कचेरींत नियमितपणें येऊन 'प्रतिज्ञे'चं कांहीं काम करतां आलं तर करावं असं माझ्या मनांत फार आहे."

'वा, अवश्य येत जा कीं' असं तो म्हणेल अशी तिची अपेक्षा होती; परंतु तसं उत्तर करण्याऐवजीं त्यानं तिच्याकडे पाहिलं, व नंतर टिपकागदानं टाकाचं टोक पुशीत तो म्हणाला, " असं होय ! "

श्यामा किंचित् थांबली व मग म्हणाली, " माझ्यासाठीं तुम्ही विचाराल शरद्ना ?

त्यानं मनाशीं किंचित् विचार केला आणि म्हटलं, " तसं नको. तुमचं तुम्हींच विचारावं हें चांगलं."

जरा वेळानं श्यामानं त्याला विचारलं, " प्रतिज्ञेंत तुम्ही किती लिहितां ? "

तो हसला व म्हणाला, " लिहितों मधून मधून. परंतु मला तितकंसं जमत नाहीं. मला कांहीं सुचलं तर लिहून काढतों आणि तें शरद्ला दाखवितों. त्याला पसंत पडलं तर तो म्हणतो बरं आहे, येत्या अंकांत घाल. परंतु बहुतकरून त्याला पसंत पडत नाहीं, अन् मग ते लिहिलेले कागद मी खुशाल टेबलाखालच्या या टोपलींत टाकून देतों.

" तसं करतांना वाईट नाहीं वाटत ?"

" शरद्नं सांगितल्यावर मला वाईट वाटायचं काय कारण ? "

हें वाक्य बोलतांना शरद्‌वरची त्याची निष्ठा त्याच्या स्वरांत अगदीं पूर्ण व्यक्त झाली.

श्यामा म्हणाली, " तुमची सर्वांची फार भक्ति दिसते त्यांच्यावर."

त्यानं हसून 'होय, बरोबर आहे तुम्ही म्हणता तें' अशा अर्थी मान हालविली, व मग तो किती तरी वेळ शरद्‌विषयींच बोलत राहिला, त्यावरून श्यामाला सहजगत्या पुष्कळच गोष्टी समजल्या.

शरद् दर्शनेच्या भोंवतीं हे समवयस्क तरुण आतांच गोळा झाले नव्हते. तो शाळेंत सहाव्या सातव्या इयत्तेंत असल्यापासूनच पांच पंचवीस विद्यार्थ्यांचं नेतृत्व सहज मिळवून कांहीं तरी विशेष उद्योगांत राहणारा विद्यार्थी म्हणून प्रसिद्ध होता. पुढें कॉलेजांत तर तो आणि त्याचे सहकारी म्हणजे सामान्य विद्यार्थ्या-हून फार निराळया मुलांचा संच समजण्यांत येत असे. त्याची घरची स्थिति त्याच्या पंजोबांच्या वेळीं फारच सधन होती, आणि आतां त्याच्या वडिलांच्या पश्चात्‌हि त्याला संसाराची जबाबदारी अगर चिंता वाहावी लागत नव्हती. 'दर्शन्यांचा राम' म्हणून पुण्यांत जें प्रसिद्ध मंदिर आहे तें त्याच्या पणजोबांनीं बांधलेलं. तें व त्यामागची मोठी बखळ त्याच्या मालकीची होती. या जागेंतच त्यानं दोन अडीच वर्षांपूर्वी 'सावधान संघ' ही संस्था काढली होती, व आपल्या उद्योगानं व समवयस्क सहकाऱ्यांच्या मदतीनं ती इतकी नांवारूपाला आणली होती कीं, तिच्या शाखा ठिकठिकाणीं निघूं लागल्या होत्या. या संघाचं उद्दिष्ट आणि कार्य त्यानं जरी शरीरबल-संवर्धनापुरतं मर्यादित केलं होतं, तरी आपल्या सामाजिक व राजकीय मतांचा प्रचार त्यायोगें पर्यायानं त्याला करतां आला होता; आणि आतां तो प्रचार प्रत्यक्ष रीतीनं करतां यावा म्हणून

त्यानं 'प्रतिज्ञा' पत्र काढलं होतं. त्याला स्वतःच्या अगर कुटुंबाच्या चरितार्थासाठीं पैसे मिळविण्याची गरज नव्हती हें जरी खरं असलं तरी तो कांहीं धनिक नव्हता. तथापि जो कांहीं पैसा त्याच्याजवळ होता तो त्यानं आपल्या कार्यात घातला होता. आपल्या हातून देशसेवा घडली पाहिजे अशी त्याची तळमळ होती, आणि ती तळमळ व त्याच्या अंगचे विविध गुण यामुळें त्याच्याभोंवतीं हे समवयस्क कार्यकर्ते हौसेनं व निष्ठेनं जमा झाले होते...

या साऱ्या गोष्टी बापू शेवडे याच्या तोंडून ऐकतांना श्यामाला सारखं वाटत होतं कीं तिच्या मनानं एखाद्या ध्येयभूत तरुणाचं चित्र तयार केलं असतं तर तें असंच असतं.

त्यानंतरच्या खेपेस ती 'प्रतिज्ञा' कचेरींत गेली तेव्हां शरद्‌ची भेट होण्याच्या बाबतींत आज तरी आपल्या वांट्याला निराशा येऊं नये असं तिला एकीकडे वाटत होतं, पण दुसरीकडे तिला अशी धास्तीहि वाटत होती कीं तो भेटला तर त्याच्याशीं मोकळेपणानं बोलण्याइतपत निर्विकार आपली वृत्ति राहील काय ? कारण जे त्याच्या ध्यानांत आल्यास आपल्याला लाजल्यासारखं वाटेल असे त्याच्याविषयींचे विचार आपल्या मनांत उद्‌भवले आहेत हें ती आतां स्वतःशीं नाकबूल करूं शकत नव्हती.

तिनं कचेरीच्या बाहेरच्या दालनांत पाऊल टाकायला आणि आंतल्या दालनांतून बापू शेवडे बाहेर यायला एकच गाठ पडली. तिला पाहतांच तो हसला व बाजूकडे मान झुकविल्याप्रमाणें करून म्हणाला, " आहेत."

तिनं शरद्‌बद्दल विचारण्याच्या आधींच त्यानं तो आहे म्हणून सांगितलं याचा तिला जरा राग आला कीं काय कुणास ठाऊक ! तिच्या भुवया किंचित् आकुंचित झाल्या. परंतु हें काय आपलं

रागावणं असं तिनं स्वतःशीं म्हटलं असलं पाहिजे. कारण तिचे डोळे लगेच हसले, व खालीं छापखान्याकडे जाऊं लागलेल्या बापू शेवडेला ती म्हणाली,

" आजहि तुमच्या हातांत प्रुफं आहेतच ! "

"Yes, you can call me a proof-man if you like."

त्याच्या त्या बोलण्यावर श्यामाला एक कोटी सुचली, परंतु लगेच तिला वाटलं आंतून शरद् हें सारं ऐकत असेल. तिनं फक्त बापूकडे पाहून हास्य केलं, व दुसऱ्याच क्षणीं तो लगबगीनं खालीं गेलासुद्धां.

ती पार्टिशनच्या आंत गेली. तेव्हां शरद् लिहिण्यांत गुंतलेला तिला दिसला. तिची चाहूल अगदीं जवळ लागली तेव्हां त्यानं दृष्टि वर केली व खुर्चीकडे डावा हात दाखविला. " काय ? " इतकंच म्हणून तो गप्प बसला.

'प्रतिज्ञे'चा अंक दुसरे दिवशीं प्रसिद्ध व्हावयाचा होता, व शेवटच्या फॉर्मची छपाई उरकण्याच्या घाईत सारीच मंडळी त्या वेळीं होती असं श्यामाला दिसून आलं. शरद् मधूनच तिला कांहीं विचारी अथवा सांगे, परंतु त्याचं खरं अवधान तिच्यापेक्षां कामाच्या गर्दीकडेच अधिक होतं. एका लेखावरचा जाड टाइपांतला मथळा शरद्ला विशेष पसंत नव्हता, व तो बदलून अधिक आकर्षक मथळा कोणता घालावा या विचारांत तो एका पाठकोऱ्या कागदावर निरनिराळे शब्द जुळवून पाहत होता. बापू पुनः पुन्हा खालून वर येत होता, आणि शरद्ला कांहीं तरी विचारून लगबगीनं खालीं जात होता. एरवीं हिशेब लिहिण्यांत गुंतलेला दिसणारा तो दुसरा तरुण मधेंच आला व म्हणाला, " ही

नवी जाहिरात आतांच आली आहे, ही मजकुरांत बसवायची कशी ?" मग त्या प्रश्नाचा निकाल लावण्यासाठीं त्या तिघांची किती वेळ तरी चर्चा झाली. इतक्यांत मुंबईच्या दैनिकांचे ताजे अंक शरद्च्या टेबलावर येऊन पडले, व मग त्यांतील ताज्या बातम्यांवरून नजर फिरविण्यांत तो बाकीच्या सर्वच गोष्टी विसरून गेल्याप्रमाणें दिसला. श्यामाशीं किती वेळांत तरी एक शब्ददेखील तो बोलला नाहीं.

परंतु त्याचा तिला मुळींच विषाद वाटला नाहीं. उलट त्या सर्वांची त्या घटकेला जी कामाची घाई उडाली होती ती पाहत बसण्यांत तिला सुख वाटलं. त्या स्थळाचा, तिथल्या कामाच्या धांदलीचा, व आपण कांहीं तरी विशेष महत्त्वाच्या उद्योगांत गुंतलों आहोंत अशी जी अत्यंत उत्साहाची वृत्ति त्या मंडळींच्या बोलण्या-चालण्यांत व गडबडींत तिला दिसली, त्या वृत्तीचा तिला अतिशय मोह पडला. या सगळ्या धांदलींत मला सहभागी होतां येईल का असा विचार तिच्या मनांत पुनः पुन्हा येत होता.

शरद्नं हातांतलं इंग्रजी वर्तमानपत्र दूर करून टेबलावर ठेवलं तेव्हां त्याची व तिची दृष्टादृष्ट झाली. तो किंचित् हसला, परंतु तें हसणं स्वगत असावं असं तिला वाटलं. तिची ती कल्पना बरोबर ठरविण्यासारखा त्यानं लगेच अर्धवट स्वतःशीं उद्गारहि काढला,

"च्. मला एक अर्ध्या तासाची सवड असायला हवी होती!"

त्यानं वर्तमानपत्रांत वाचलेल्या कोणत्या तरी गोष्टीशीं त्या उद्गाराचा संबंध असला पाहिजे असा तर्क श्यामानं केला. परंतु त्याचा नक्की अर्थ तिला कळला नाहीं. त्याबद्दल त्याला प्रश्न करावा किंवा नाहीं याविषयीं तिच्या मनाचा चटकन निश्चय होईना; परंतु तितक्यांत बापू पुन्हा वर आला व शरद् त्याला म्हणाला,

" एक घोटाळा झाला बघ."

" काय झालं ? " बापूनं विचारलं.

" एक अतिशय चांगला मजकूर आपल्या उद्यांच्या अंकांत यायला हवा असून तो येणार नाहीं."

" म्हणजे ? "

टेबलावरचा 'क्रॉनिकल'चा अंक उचलून त्याच्यापुढें करीत शरद् म्हणाला, " पंडित जवाहरलाल नेहरूंनीं स्पॅनिश लोकशाहीच्या पाडावाबद्दल फार सुंदर 'स्टेटमेंट' काढलेलं प्रसिद्ध झालंय बघ. हें सारांशरूपानं आपल्या उद्यांच्या अंकांत अवश्य यायला हवं होतं."

" मग हरकत काय आहे ? एक दीड कॉलमची जागा करतां येईल त्याच्यासाठीं."

" जागा करशील रे. पण भाषांतर कुणी करायचं ? "

'अर्थात् तूंच' अशा अभिप्रायानं जेव्हां बापूनं त्याच्याकडे पाहिलं तेव्हां शरद् नाइलाज असल्यासारखा हात चाळवून म्हणाला, " मी कसं करणार ? मला हा अग्रलेख आधीं पुरा केला पाहिजे ना ? छे, छे, हा मजकूर उद्यांच्या अंकांत आला नाहीं तर मला फार वाईट वाटेल. तूं करतोस एवढं भाषांतर ?"

" करतों मी. पण तुला तें पसंत पडायचं नाहीं, आणखी..."

त्या दोघांचीहि नजर आपोआप श्यामाकडे वळली, व त्या नजरेचा अर्थ काय असेल याचा विचारसुद्धां न करतां ती चटकन् म्हणाली, " मी करून पाहूं का ? कसं साधेल कोण जाणे, पण म्हणत असाल तर—"

शरद् हसला व हलकेच म्हणाला, " करा, अवश्य करा. त्यांतला महत्त्वाचा भाग कोणता त्याच्यावर मी खूण करून

देऊं काय? पण कशाला, तुम्ही तें सहज ओळखूं शकाल. हे कागद, ही पेन्सिल. लागा कामाला. मी माझ्या कामाला लागतों."

नंतर अर्ध्या तासानं शरद्नं आपल्या लेखाचा शेवटचा कागद पुरा करून टाक दूर ठेवून तिच्याकडे पाहिलं. तो आपल्याकडे पाहील म्हणून ती वाटच पाहत असलेली त्याला दिसली. त्यानं किंचित् हसून विचारलं, "तयार?"

"पाहा कसं काय जमलंय तें. दाखवायला मला फार भीति वाटते." असं हलकेच म्हणत तिनं कागद पुढें केले.

तिच्या पहिल्या कागदावरचा मथळा शरद्नं वाचला,

**'माद्रिद' पडलं! स्पॅनिश लोकशाहीचा अस्त झाला!**

"हेडिंग तर फार छान दिलं आहांत." तो म्हणाला.

मग तिनं तयार केलेलं तें भाषांतर त्यानं झटकन् वाचून काढलं व बाहेर बसलेल्या बापू शेवडेला हाक मारली. तो येतांच त्यानं म्हटलं, "छान तयार केलं आहे यांनीं. जाऊं दे एकदम कंपोजला. हें घे. अन् हा माझा लेख."

बापू त्याच्या हातांतले सारे कागद घेऊन गेला. शरद्नं तिच्याकडे पाहिलं, व कांहीं न बोलतां फक्त हास्य केलं. त्या हास्यांत आपल्याला हवं तें सर्व कांहीं मिळालं असं श्यामाला वाटलं... शरद् ज्याप्रमाणें तिला अकल्पितपणें भेटला होता त्याप्रमाणेंच त्याच्या उद्योगांत भाग घेण्याची तिची इच्छाहि आज अकल्पितपणें पुरी झाली होती... तिनं त्याच्याकडे पाहिलं. पण मग तिला आपल्या नजरेचा भरंवसा वाटेना, म्हणून तिनं लगेच दृष्टि दुसरीकडे वळविली. तेवढ्यांत ती हसली त्यावरून शरद् काय समजला असेल तेंच!

# १३

ती लायब्ररींतून परत आली तेव्हां उषा शाळेंत जायला निघालीच होती. तिनं विचारलं,

"हें काय! झाली तुझी जायची वेळ!"

"म्हणजे काय!" असं उद्‌गारून उषानं आपलं मनगटावरचं घड्याळ श्यामापुढें धरलं व म्हटलं, "बघ कीं!"

"खरंच कीं. माझी नव्हती कल्पना इतके वाजले असतील अशी. आता एकटं जेवायची शिक्षा भोगावी लागणार म्हणायची मला."

"नाहीं. तूं वेळेवर आली असतीस तरी माझ्याबरोबर जेवतां नसतं आलं तुला. थांबावंच लागलं असतं."

'तें कां!' अशा अर्थी श्यामानं नजर उचलली.

उषा म्हणाली, "पाहुणा येणार आहे एक."

"कोण!"

"अशोक."

"काय म्हणतेस!" श्यामाच्या स्वरांत आनंद व विस्मय दोन्ही सारखेच भरले होते.

" होय. नऊ वाजतां तार आली त्याची सकाळच्या एक्सप्रेसनं निघून येत आहे म्हणून."

" खरं ?"

" वर ठेवली आहे तुझ्या टेबलावर तार बघ. मी जाऊं ना ? अशोकला सांग मला शाळेंत जाणं भाग होतं म्हणून गेलें, माझ्यावर रागावूं नकोस. जमलं तर लवकर येईन परत."

श्यामा म्हणाली, " हा तुझा नेहमींचाच आहे आशीर्वाद. तूं कसली येतेस परत लवकर ?"

" तुझं म्हणणं खोटं नाहीं !" उषा जड आवाजानं म्हणाली, पण रस्त्यांत पाऊल टाकतां टाकतां तिनं वळून पाहिलं, व हसत म्हटलं, "...आतां एक महिनाच उरला ! मग..."

" मग साऱ्या पाहुण्यांना नोटीसच देणार असशील तूं, या किती येतां ते म्हणून !"

तिचा तो विनोद उषाला फार सुखाचा वाटला असावा. " तुझं आपलं कांहीं तरीच " असं पुटपुटून तिनं हसत मान मुरडली, व मग ती आपल्या रस्त्याला लागली.

श्यामा तिच्याकडे पाहत दाराच्या चौकटींत उभी राहिली. उषाच्या गतींत तिच्या अंतःकरणाचा सारा उल्हास व्यक्त होत होता. श्यामाच्या मनांत आलं, गंभीर प्रकृतीच्या स्त्रींत देखील सुखाच्या पूर्णतेचा समय जवळ आला, कीं वृत्तीचा खेळकरपणा दिसूं लागतोच म्हणायचा...

मे महिन्याच्या प्रारंभीं लग्न करण्याचं उषा व वसंत यांनीं ठरविलं होतं. लग्न झाल्यावर उषा शाळेंतली नोकरी सोडणार होती. नंतर संसार कुठें थाटायचा, कसा थाटायचा इत्यादींबद्दल त्या प्रेमिकांचे बेत आतांशा रोज चालत, आणि त्यांत श्यामा मोठ्या

आनंदानं भाग घेत असे. किती खोल्यांचा ब्लॉक घ्यायचा त्याविषयीं चर्चा चाले. उषानं म्हणावं,

" सैंपाकघर, जेवायची जागा सोडून तीन खोल्या तर पाहिजेतच ! एक बसायउठायची खोली, एक माझी अन् वसंतची मिळून, अन् एक तुला म्हणून स्वतंत्र—"

श्यामानं मान हालवून म्हणावं, " माझा कशाला हिशोब करतेस ? "

" म्हणजे काय ? "

" मी तुझ्यांत नाहीं राहणार. मियाबिबीच्या गुजगोष्टींत माझी अडचण कशाला ? मी आपली--"

" तर तर ! तुला माझ्याकडेच राह्यलं पाहिजे. सांगून ठेवतें आहे." उषानं असं म्हणत तिचा हात प्रेमानं धरून ठेवावा.

आणि वसंतनं त्यावर म्हणावं, " अग, पण तुझ्या पावलावर पाऊल टाकून ताईंनीं कांहीं जुळवलं असलं तर ? मग तूं कशी धरून ठेवणार त्यांना ? "

" चला ! " असं म्हणून श्यामा मान वेळावी व डोळे मोठाले करून वसंतकडे पाही.

मात्र तिचं मन तिला विचारी, उगीच कां हें रागाचं लटकं सोंग ?...तूं प्रेमांत सापडली नाहींस काय ?... ज्याचं प्रेम तुला हवं त्याच्या सहवासांत राहण्याचे बेत तूं गुप्तपणें करीत नाहींस काय ?...

स्वतःच्या मनाचं हें छेडणं तिला सुखाचंच वाटे, आणि मग उषा व वसंत यांच्या संभाषणांत ती अधिक हर्षभरानं सामील होई.

आतां उषाक्काच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहतांना तिला या आठवणी झाल्या, व त्यामुळें उषा दिसेनाशी झाली तरी ती आपल्या विचारांतच गर्क होऊन कांहीं वेळ दाराच्या चौकटींत तशीच उभी राहिली. दारावरून दोन टांगे भरवेगानं गेले व ते हाकणाऱ्यांचे " चला दादासाहेब! बाजू!" असे कर्कश आवाज तिच्या कानांवर पडले तेव्हां ती विचारांतून जागी झाली. मग तिला एकदम आठवलं कीं अशोकची तार तिला पाह्यची होती.

ती दारांतून वळली, व जिन्याच्या पायऱ्या चढूं लागली.

कलकत्त्याहून अशोकचं पंधरा दिवसांपूर्वी तिला पत्र आलं होतं, त्यांत त्यानं लिहिलं होतं, " माझं इथलं काम दोन तीन दिवसांत पुरं होईल. मग 'शांतिनिकेतन'ला जाण्याचा मीं विचार केला आहे. तिथें रवींद्रबाबूंनीं एका प्रसिद्ध रशियन चित्रकाराला सध्यां आणून ठेवलेला आहे. त्याची कीर्ति फार ऐकली आहे मीं. त्याची भेट घ्यावी अन् त्याचं काम पाहावं असं ठरवलं आहे. टागोर घराण्यांतल्या एका तरुणाची बरीच जानपछान झाली इथल्या मुक्कामांत. तोच मला घेऊन जाणार आहे. 'शांतिनिकेतन'मधें चार पांच दिवस राहीन, अन् मग तडक निघेन तो घरीं येईन. पुष्कळच दिवस इकडे राहिलों. आतां मुंबईसाठीं आजारी झालों आहे. (Home sick चं भाषांतर समजावं हें!) तूं केव्हां भेटशील, अन् आपण मनमुराद गप्पा केव्हां मारूं असं झालंय मला. मी कलकत्त्याहून परत आलों कीं तूं मुंबईस यायचं असं आपलं ठरलं आहे. तेव्हां तूं तयारींत रहा..."

पण तिनं उलट लिहिलं होतं, " मुंबईस परत आलास कीं तूंच इकडे ये. मला यायला सवड होईलसं दिसत नाहीं..."

त्यानंतरच्या पत्रांत त्यानं चेष्टा केली होती, " येवढं कोणतं

काम पत्करलं आहेस तिकडे पुण्याला कीं तुला मुंबईला यायला सवड नसावी ? तें कांहीं नाहीं तूं मुंबईस आलंच पाहिजेस. मी सोमवारीं मुंबईस पोंचेन... ”

परंतु श्यामाला आतां पुणं सोडून जाववत नव्हतं. कोणत्या कामांत ती होती तें ती काय सांगणार अशोकला ? तिनं त्याला लिहिलं होतं, “ श्रीमंतांच्या बंगल्यांच्या भिंतींवर चित्रं काढणं येवढं एकच काम जगांत आहे असं तूं समजतोस की काय ? मला खरंच काम आहे इथं. पुढें केव्हां तरी मी येईन. पण सध्यां नाहीं. तूंच एखादद्दुसऱ्या दिवसाची सवड काढून ये ना आमच्याकडे ! तुला भेटायची फार इच्छा आहे...”

तो मुंबईस येऊन पोंचेल त्या दिवशीं त्याला मिळावं अशा बेतानं श्यामानं हें पत्र टाकलं होतं. मधें तीन दिवस गेले तरी त्याच्याकडून कांहीं उत्तर आलं नाहीं तेव्हां तिला वाटूं लागलं होतं, अशोक रागावला कीं काय ? तोंच आज त्याची तार आली होती.

तिनं टेबलावरचा तारेचा कागद वाचला, व तिला किंचित् हसूं आलं.

“ Arriving Express. Hope return with Miss “Obstinate”...” (एक्सप्रेसनें येतो. कुमारी “हट्टीताई”स घेऊन मुंबईस परत येण्याची आशा आहे.)

त्याच्याकडे न जाण्याचा तिनं हट्ट केला म्हणून तो रागावला असला तरी तो खुशींत होता ! आतां तो भेटला कीं काय काय बोलेल ? आणि त्याला काय सांगावं अन् काय सांगूं नये असं तिलाहि होईल !...

पण तितक्यांत तिच्या मनांत आलं, आपण सारं सांगणार आहोंत काय त्याला? अगदीं निष्कपट राहिलों आहोंत का आपण? पूर्वी आपल्या वडिलांबद्दलचं एकच रहस्य त्याला न सांगण्याजोगं आपल्या हृदयांत होतं!...आतां त्याच्या जोडीला आपल्या अंतःकरणांत आणखी एक रहस्य निर्माण झालं नव्हतं काय?...

ती खिडकीशीं उभी होती. बखळींत रखरखीत ऊन्ह पडलं होतं. पारावरच्या पिंपळाची सावली जमिनीवर पडलेल्या डागासारखी भासत होती. श्यामाच्या मनांत आलं 'मी या खिडकीशीं येऊन बघितलं अन् पाहतें तों तो ध्वजापुढें प्रणाम करीत होता...' हें सारं आपण अशोकला सांगणार आहोंत काय?

हा प्रश्न मनांत येतांच तिनं उसासा टाकला.

कारण, कदाचित् शरद्‌विषयींच्या आपल्या भावनांची वाच्यता अशोकजवळ न करण्याचा निश्चय तिला करावा लागणार होता. कदाचित् ती त्याला अगदीं सगळं सगळं सांगूं शकणार होती; पण असाहि संभव होता कीं तिला कांहींच सांगावंसं वाटूं नये. सारं एका पत्रावर अवलंबून होतं. तिनं तीन दिवसांपूर्वी शरद्‌ला एक पत्र लिहिलं होतं. त्याच्या उत्तराची ती कालपासून वाट पाहत होती. तीन दिवसांत तिनं शरद्‌ची भेट घेतली नव्हती. तो काय उत्तर लिहितो यावर तिनं साऱ्या गोष्टी अवलंबून ठेवल्या होत्या. काल त्याचं पत्र आलं नव्हतं. आज तरी येईल काय? अन् त्यानं त्या पत्रांत भलतं कांहीं लिहिलं तर? तिला ती निराशा सह्य होण्याजोगी नव्हती!...

तिला एकदम वाटलं, आज उगीच येत आहे अशोक. या गोष्टीचा काय तो सोक्षमोक्ष झाल्यावरच तो आला असता तर बरं झालं असतं. ...पण शरद्‌नं चांगलं उत्तर लिहिलं अन् तें अशोक

इथें आलेला असतांनाच आपल्या हातीं पडलं तर ?... तर काय, फारच बहार होईल !...

उन्हांत चमकणाऱ्या पिंपळाच्या पानांकडे पाहतां पाहतां तिला वाटलं, असंच होणार. अशोक येत आहे हा एक प्रकारचा शकुनच आहे. शरद् तिला अनुकूलच उत्तर देणार. त्यानं नाहीं म्हणावं, अव्हेर करावा, असं काय होतं तिच्या पत्रांत ?

ती आठवूं लागली...तिनं लिहिलं होतं,

"...म्हणून भावनेच्या भरांत मी कांहीं तरी लिहीत आहे असं समजूं नये. मीं स्वतःच्या मनाला या बाबतींत वारंवार आणि पुष्कळ छेडून पाहिलेलं आहे, आणि यामुळें विचारांचा तोल सोडून माझी मी फसवणूक करीत आहे अशी किंचित् सुद्धां शंका मला वाटत नाहीं. मी या पत्रांत जें मागणार आहे तें मला किती उत्कटतेनं हवंसं वाटतं, तें मिळविण्यासाठीं मी वाटेल तें करायला किती आनंदानं तयार होईन, याचा मीं मनाशीं पूर्ण विचार केला आहे; व बहुतेक त्यामुळेंच हें पत्र लिहितांना माझ्या जागीं दुसरी एखादी मुलगी असती तर तिला संकोच वाटला असता, लाज वाटली असती— पण मला वाटत नाहीं.

पुढचा मजकूर वाचण्यापूर्वीच तुमच्यापासून मला काय हवं आहे तें बहुतेक तुम्हीं ओळखलंच असेल. तुमच्या मनांत असं येण्याचा संभव आहे कीं हिला विनयाची मर्यादा अगदींच कशी नाहीं ? इतक्या सरळ व स्पष्ट शब्दांत ही आपलं हृद्गत पुरुषाजवळ सांगूं कसं शकते ? अशा शंकेनं माझ्याविषयीं तुम्हीं प्रतिकूल ग्रह करून घेतलात तर माझ्या मागणीचा विचार तुम्ही त्या ग्रहानंच कराल असं भय मला वाटतं. म्हणून मला जें हवं तें मी इतक्या स्पष्टपणें मागूं कसं शकतें त्याबद्दल दोन शब्द लिहितें.

प्रेमाची मागणी पुरुषानं स्त्रीजवळ करावी असा संकेत आहे. माझी थोरली बहीण प्रेमांत सापडल्यावर तिचा वसंत तिच्याजवळ प्रेमाची मागणी करील म्हणून तिनं किती दिवस तरी वाट पाहिली, परंतु स्वतः त्या गोष्टीचा उच्चार त्याच्याजवळ केला नाहीं. माझ्या वयाच्या आणि माझ्याप्रमाणेंच शिकलेल्या बहुतेक मुलींची स्थिति कदाचित् अशीच असेल. स्त्रीनं मुग्ध राहण्याच्या या प्रकारांत स्त्री-सुलभ लज्जेचा भाग थोडासा असेल, मी नाहीं म्हणत नाहीं; परंतु त्याच खरं कारण मला वाटतं तें हें कीं, बहुतेक मुलींना आपल्याला नक्की काय हवं आहे अन् तें किती तीव्रतेनं आपल्याला हवं आहे याची स्पष्ट जाणीव नसते. मला अमक्या पुरुषाचं प्रेम पाहिजेच, तें मला मिळालं नाहीं तर माझं जीवित मला निरर्थक वाटेल, अन् म्हणून तें मिळविण्यासाठीं मी काय वाटेल तें करीन असा उत्कट अनुभव स्त्रीला क्वचितच येतो, आणि त्या कारणानं ती सहसा पहिला शब्द तोंडावाटे काढीत नाहीं. एखाद्याचं प्रेम मिळविण्या-साठीं वाटेल तें करीन अशी मनाची तयारी झाल्यावर केवळ विनय राखला पाहिजे या विचारानं स्त्री गप्प राहील काय? मला नाहीं वाटतं.

तुम्ही कदाचित् म्हणाल, तुमचा माझा परिचय फार दिवसांचा नाहीं अन् एवढ्याच परिचयावर मी हें असलं पत्र कसं लिहितें? पण या बाबतींत मला काय वाटतं तें सांगतें. जे गुण दिसले ते पुरेसे वाटले नाहींत, किंवा त्या गुणांबरोबरच कांहीं दोषहि कदा-चित् असतील अशी शंका मनांत असली तरच अधिक परिचय आवश्यक वाटतो. ज्या गुणांचा माझ्या मनाला अमर्याद मोह पडतो व ज्या गुणांच्या सहवासांत माझ्या जीविताचं सार्थक होईल असं मला वाटतं ते स्पष्ट दिसल्यावर परिचय किती दिवसांचा आहे

याचा विचार मीं काय म्हणून करावा? अगर तो अधिक होण्याची वाट मीं काय म्हणून पाहावी? किंबहुना अशी वाट पाहत केवळ सहवासाच्या दिवसांची संख्या वाढविणं मला फार अवघड होईल अशी मला भीति वाटते, म्हणूनच हें पत्र लिहिण्याचा उतावळेपणा मी विचारपूर्वक करीत आहे. कारण माझं अंतःकरण मी जों जों तपासतें तों तों एक गोष्ट मला अगदीं स्पष्ट दिसते ती ही, कीं मला तुमचा केवळ सहवास नको आहे, तर मला तुम्ही हवे आहांत हें तुम्हांला माहीत आहे या जाणिवेसकट तुमचा सहवास मला हवा आहे..."

याप्रमाणें आपल्या त्या पत्रांतला सारा मजकूर तिनं गेल्या तीन दिवसांत दहा वेळां आठवून पाहिला होता तसा तो आतां पुन्हा एकदां आठवून पाहिला, आणि तिच्या मनांत पुन्हा असंच आलं, कीं त्यानं नाहीं म्हणावं, अव्हेर करावा, असं काय होतं त्यांत? तिच्या पत्राचं शरद्कडून अनुकूलच उत्तर येणार! अशोक असतांनाच तें पत्र आलं तर दुधांत साखर पडेल...

अशा प्रकारें विचार केल्यावर तिच्या मनाची हुरहूर नाहींशी झाली आणि मग अशोक यायच्या आधीं खोली जरा नीटनेटकी करावी म्हणून ती तिथल्या वस्तूंची नीटनेटकी मांडणी करूं लागली.

ती आटपून रस्त्याकडच्या खिडकींतून तिनं डोकावून पाह्यला आणि एक टांगा दाराशीं उभा राह्यला एकच गाठ पडली. तिनं 'अशोक' अशी हाक मारून टाळी वाजविली व ती धावत खालीं गेली.

अशोक टांग्याखालीं उतरून उभा होता तो तिला पाहताच हसून म्हणाला,

" बरं झालं तूं हाक मारलीस. नाहीं तर कोणतं घर म्हणून मी पंचायतींतच पडलों असतों. घर नंबर लक्षांत ठेवला होता मीं, पण आयत्या वेळीं शंका आली कीं २६९ कीं ९२६ ? २, ६, ९ असे तीन आंकडे नक्की आठवत होते पण त्यांच्या अनुक्रमाची खात्री वाटेना."

श्यामा हसली व म्हणाली, " वा ! कलकत्त्यास जाऊन तुझी स्मरणशक्ति बरीच सुधारली म्हणायची. पण आमच्या घराची प्रसिद्ध खूण आहे ती कां नाहीं सांगितलीस टांगेवाल्याला ? "

" ती कोणती ? "

" दर्शन्यांचा राम. साऱ्या पुण्यांत प्रसिद्ध आहे तो."

" तो म्हणजे कोण ? राम कीं दर्शने ? " असं विचारून तो हसला.

तिनं त्याच्या त्या खट्याळ प्रश्नाला फक्त मानेनं उत्तर दिलं, आणि विचारलं, " हें काय रे, ही छोटी बॅग आणखी हें पार्सल इतकंच तुझं सामान ? "

" हो. आज रात्रीच्याच गाडीनं परत जायच्या बेतानं मी आलों आहे."

" हं तर तर. तूं पुष्कळ येशील तयारीनं पण आम्हीं जाऊं दिलं पाहिजे ना तुला ? "

अशोक म्हणाला, " तूं मला रात्रीं जाऊं देणार नसशील तर याच टांग्यांतून परत जातों कसा."

" बरं बरं ठाऊक आहे. ये." असं म्हणून ती त्याची बॅग घेऊन पुढें झाली व तो तिच्या मागोमाग जिना चढूं लागला.

वर गेल्यावर त्यानं विचारलं, "उषाक्का शाळेंत गेली वाटतं ?"

त्यानं काढलेला कोट खुंटीवर ठेवतां ठेवतां ती म्हणाली, " होय. अकरा वाजतां जावंच लागतं तिला ?"

"मला तर वाटलं मी येईन तेव्हां तूं तरी असशील कीं नाहीं कुणास ठाऊक ?"

"तें कां ?"

"तूं मोठ्या कामांत गढली आहेस ना. एक दिवस मुंबईस येण्यापुरतीसुद्धां सवड नाहीं तुला ! कसलं काम काढलं आहेस एवढं ? सांगणार आहेस कीं नाहीं मला ?"

"सांगणार आहे तर, पुष्कळ पुष्कळ सांगायचं आहे तुला. पण थांब. आधीं तुला चहा देतें." असं म्हणून ती वळली, परंतु तेवढ्यांत तिचा चेहरा प्रसन्नतेनं अन् हर्षानं किती खुलला होता तें अशोकच्या लक्षांत आल्यावांचून राहिलं नाहीं.

चहा पितां पितां तो म्हणाला, "तुझ्यासाठीं मीं काय आणलं आहे, ओळख."

पलीकडे टेबलावर ठेवलेल्या त्या पार्सलाकडे पाहत ती म्हणाली, " ओळखतां कसं येईल रे ? 'शांतिनिकेतन'ला गेला होतास तेव्हां तिथून कांहीं आणलं असशील, किंवा कलकत्त्याहून बंगाली मिठाई आणली असशील, किती तरी गोष्टी संभवतात. पण उषाक्कासाठीं कांहींच न आणतां माझ्या एकटीसाठींच भेट घेऊन येण्याचा वेडेपणा तूं केला असलास म्हणजे मात्र—"

"वा! म्हणजे तूं मला समजतेस तरी काय ?" असं म्हणत कप खालीं ठेवून तो उठला. पार्सलभोंवतालचा चपटा रंगीत दोरा तोडीत त्यानं म्हटलं, "बघ तरी."

तो पेटीभोंतालचं कागदी वेष्टण सोडीत असतांना श्यामा अगदीं उत्सुकतेनें पाहत होती. त्यानं पेटी उघडली तेव्हां आंतील वस्तु

पाहतांच उजवा तळहात तोंडाकडे नेत ती उद्गारली "अय्या! कुठें घेतलंस रे हें? कलकत्त्याला?"

"हं. तिथें 'अमेरिकन सेंट्रल मार्ट' म्हणून मोठं टोलेजंग दुकान आहे—"

त्यानं आणलेल्या भेटीची तिनं अगदीं हर्षभरानं प्रशंसा केली, त्याचे आभार मानले, व मग ती म्हणाली, "बरं, आतां तूं स्नान करणार का? जेवण तयार आहे. चल."

"येवढी सिगरेट संपूं दे."

"हरकत नाहीं. तंवर मी पाणी उपसून ठेवतें." असं म्हणून ती खालीं गेली.

कांहीं वेळानं अशोक खालीं आला. तिनं त्याला स्नानगृहांतली सारी व्यवस्था दाखविली, व "मी घेतों सारं, तूं जा" असं म्हणून त्यानं दार बंद केलं तेव्हां पानाच्या पट्टया करून ठेवायसाठीं ती वर गेली.

पार्सलाभोंवतालचा वरचा पिंगट पातळ कागद अन् आंतलं इंग्रजी वर्तमानपत्राचं मोठं वेष्टण टेबलावर तसंच पडलं होतं. तिनं ते कागद उचलले अन् टेबलाखालच्या टोपलींत टाकले. पण तितक्यांत त्या वर्तमानपत्राच्या नांवाकडे तिची नजर गेली, व तें दिसतांच तिनं तें टोपलींतून काढून घेतलं.

"शिकागो हेराल्ड" असं तें नांव होतं!

शिकागो!

ज्या ठिकाणीं तिचे वडील आहेत असं तिला दोन महिन्यांपूर्वीं समजलं होतं, पण आतां आहेत कीं नाहींत अशी तिला शंका व चिंता वाटूं लागली होती त्या ठिकाणचं वर्तमानपत्र होतं तें!

एखादी प्रिय वस्तु हाताळावी त्याप्रमाणें तिनं त्याची घडी साफ केली, व पान नीट पसरून त्यावरील मजकुरावरून ती सहज दृष्टि फिरवूं लागली. बहुतेक सबंद पान चित्रपटांच्या व दुकानांच्या जाहिरातींनींच भरलेलं होतं. मजकुराचे अर्धे पाव कॉलम इतस्ततः विखुरले होते तेवढेच. "टेनिसचा सामना!" "जलतरणाच्या शर्यती" "एका दुकानांतील धाडसी चोरी!" असलेच मथळे तिच्या नजरेस पडले. ती पान उलटून पाहणार तोंच उजवीकडच्या शेवटच्या कॉलमांतला एका परिच्छेदाचा वरचा मथळा तिला दिसला, व ती थबकली.

**An Indian Prince !**

**Evinces great interest in Film and Yoga !**

(एका हिंदी संस्थानिकाचें चित्रपट व योग याविषयींचें कुतूहल!)

'योग' शब्द वाचतांच श्यामानं श्वास आवरून घेतला.

खचित या बातमींत तिला आपल्या वडिलांच्याविषयीं कांहीं तरी—

पण तितक्यांत अशोकचीं पावलं जिन्यावर वाजलीं. तिनं त्या वर्तमानपत्राची घडी केली, व ती कपाटांत ठेवतां ठेवतां त्याला विचारलं, "ठीक झालं स्नान?"

"अगदीं फर्स्ट क्लास." टॉवेलनं केस घाशीत तो म्हणाला.

"मग चलच खालीं. जेवून घेऊं."

जेवतांना व जेवल्यावर गप्पा मारतांनाहि तिचं अर्धं लक्ष कपाटांत ठेवलेल्या त्या अमेरिकन वर्तमानपत्राकडे होतं. दोन वाजतां जेव्हां अशोक म्हणाला, "बरं निजूं आतां!" तेव्हां चटकन् ती म्हणाली, "नीज. प्रवासानं दमला असशील तूं. तुला जांभया

यायला लागल्या बघ. चांगली तासभर झोप काढलीस तरी हरकत नाहीं. तीन साडेतीनला चहा घेऊं आपण. अं ?"

"हं." असं म्हणून अशोक उठला. श्यामानं उषाक्काची खोली उघडली व कॉटवरचं अंथरूण झटकून देऊन विचारलं, "येवढं उसं पुरे तुला ?"

"रगड" म्हणून अशोकनं कॉटवर अंग टाकलं.

श्यामानं दार ओढून घेतलं, व आपल्या खोलींत येऊन कपाटां-तलं तें वर्तमानपत्र काढलं. ती खुर्चीवर बसली, व तो परिच्छेद वाचूं लागली,

"हिंदुस्थानांतील रजवाड्यांपैकीं एक बडे लक्ष्मीपति संस्थानिक 'महाराजा ऑफ विद्यापुरम्' यांचा मुक्काम सध्या येथील 'लॅंबेथ हॉटेल'मध्यें आहे. महाराजांनीं अमेरिकेंतील पूर्वेकडील प्रमुख शहरांचा दौरा केला असून येथून ते हॉलिवुडकडे वळणार आहेत. कित्येक वर्षांपासून येथें स्थायिक झालेले 'तिलकानंद' यांनीं त्यांच्या कांहीं व्याधीवर योगाचे उपचार केले त्यांचा गुण एखाद्या चमत्काराप्रमाणें आल्यामुळें महाराजांस योगाचा अभ्यास करण्याची इच्छा झाली आहे, व ते 'तिलकानंदां'चे भक्त बनले आहेत. त्यांना आपल्याबरोबर घेऊनच महाराज हॉलिवुडसाठीं येथून प्रयाण करणार आहेत. कदाचित् ते तिलकानंदांना आपल्या-बरोबर हिंदुस्थानासहि नेतील."

श्यामानं तो मजकूर पुन्हा वाचून पाहिला व मग अगदीं वरच्या बाजूस वर्तमानपत्राच्या अंकाची तारीख होती ती पाहिली. १५ डिसेंबर १९३७ अशी तारीख होती ती.

श्यामा मनाशीं हिशोब करून पाहूं लागली.

तिनं आपल्या वडिलांना शिकागोच्या पत्त्यावर 'केबल' धाडली होती ती या जानुआरीच्या तिसऱ्या आठवड्यांत.

योशिदाच्या मित्राचं पत्र तिच्या हातीं त्या वेळीं आलं होतं.

अमेरिकेहून पत्र यायला निदान सहा आठवडे लागतात. म्हणजे योशिदाच्या मित्रानं शिकागोहून तें पत्र लिहिलं असेल केव्हां ?...

तिनं चटकन उठून आपल्या बॅगमधून तें पत्र काढलं व त्यावरची तारीख पाहिली. २८ नोव्हेंबर १९३७ !

सगळं बरोबर जुळत होतं. योशिदाच्या मित्रानं कळविली ती बातमीहि बरोबर होती; अन् तिची 'केबल' निरुपयोगी ठरली होती तेंहि बरोबर होतं. नोव्हेंबर १९३७ मधें तिचे वडील शिकागोला होते, पण १९३८ च्या जानुआरींत ते नव्हते !

मध्यंतरीं त्यांनीं शिकागो सोडलं होतं.

ते आज घटकेला कुठें असतील कोण जाणे ! पण ते कोणा-बरोबर होते तें तिला आतां माहीत झालं होतं. त्यांचा शोध काढण्याचा नवा मार्ग एकदम खुला झाला होता ! इतकंच काय, ते आतां हिंदुस्थानांत परत येतील असाहि पुष्कळच संभव होता !...

कारण एका बड्या महाराजाच्या परिवारांत इतमामानं आल्या-बर अठरा वर्षांपूर्वीचा जुना गुन्हा अंगाला चिकटेल असं होणं जवळ जवळ अशक्य होतं.

श्यामानं उठून टेबलाच्या खणांतून नकाशाचं पुस्तक काढलं. ती आनंदानं हसत मनाशीं म्हणाली,

"विद्यापुरम् कुठें आहे कोणास ठाऊक ! महाराजा ऑफ विद्यापुरम् ! कधीं ऐकलंहि नव्हतं नांव !"

तिनं हिंदुस्थानचा नकाशा उघडला, व 'विद्यापुरम्' 'विद्यापुरम्' असं एखाद्या मंत्रासारखं तें नांव उच्चारीत ती आपल्या बोटाचं टोक त्या पानावरून फिरवूं लागली.

लवकरच तिच्या लक्षांत दोन गोष्टी आल्या. एक, हिंदुस्थान देश फार अफाट होता. अन् दुसरी, तिचं भूगोलाचं ज्ञानहि तितकंच अफाट होतं !

" उषाक्का मास्तरीण आहे. तिला विचारलं पाहिजे संध्याकाळीं हें विद्यापुरम् कुठें आहे तें !" असं मनाशीं म्हणून पुस्तक मिटून तिनं दूर ठेवलं, अन् ती खिडकीकडे गेली.

त्याच वेळीं खालीं रस्त्यावर पाण्याच्या धारा फेकीत म्युनिसिपालिटीची मोठी लाल मोटार गेली, व मातींतून उठलेला ओला ओला वास वर तिच्यापर्यंत पोंचला तो तिला फार आल्हादकारक वाटला.

कारण तिच्या स्वतःच्या हृदयांत या क्षणीं फार मोठा आनंद भरला होता !

पण तीच श्यामा दुसऱ्या दिवशीं सकाळच्या गाडीनं अशोक गेल्यावर दोन तासांनीं अशीच खिडकीशीं उभी होती तेव्हां तिच्या हृदयांत केवढं दुःख उद्भवलं होतं !

अशोकला निरोप देऊन स्टेशनवरून घरीं यायला तिला जवळ जवळ आठ वाजले. मग ती कांहीं वेळ उषाक्काच्या खोलींत गप्पा मारीत बसली. त्यानंतर उठून ती स्नानाला गेली. स्नान आटपून वर जाण्यासाठीं ती जिन्याकडे वळत होती तोंच

पोस्टमन दारांत आला, व त्यानं एक लिफाफा तिच्यापुढें केला. तिनं तो हातीं घेतला अन् पाहिलं तों तिकिटांवर पुण्याचा छाप होता. शरद्‌चं पत्र होतं तें यांत शंकाच नव्हती !

ती झटकन् वर आपल्या खोलींत गेली. अधीर व किंचित् घाबरलेल्या मनानं तिनं पाकीट उघडलं, व आंतला कागद काढला.

" नमस्कार विनंति विशेष " असा मायना होता !

पत्राच्या अखेरीस सही होती, " आपला नम्र शरद् केशव दर्शने " !

ती पाहिल्यावर पत्र वाचायचं सामर्थ्यच तिच्या मनाला उरलं नाहीं ! घाव सोसायला सिद्ध झाल्याप्रमाणें तिनं आपला अधर आंत घेऊन दाबला, व शून्य दृष्टीनं कुठें तरी पाहत ती जागच्या जागीं उभी राहिली !

# १४

टिळक-स्मारक-मंदिराच्या प्रवेशद्वाराजवळ येऊन पोंहोचल्यावर तिनं पाहिलं तो डावीकडच्या, उजवीकडच्या, साऱ्या रस्त्यांनीं लोकांच्या झुंडीच्या झुंडी तिथें येऊन थडकत आहेत असं तिला आढळून आलं. वळवाची मुसळधार वृष्टि झाल्यावर तांबूस दाट पाण्याचे खळखळाट द्रुतगतीनं कुठें तरी एके ठिकाणीं येऊन आपटून तूं पुढें कीं मी पुढें असं करीत एकमेकांत मिसळतात त्याची त्या गर्दीकडे पाहून तिला आठवण झाली.

घरून येतांना रस्त्यानं इकडे सभेकडेच निघालेल्या लोकांचे लहानमोठे घोळके तिच्या दृष्टीस पडले होते व अनेकांचे अनेक प्रकारचे उद्‌गारहि तिच्या कानांवर आले होते. 'आजच्या सभेला खूप मजा येणार खास!', 'अहो भाऊसाहेब, सभेला येत नाहीं का? वाः म्हणजे हें काय?... अरे कामं रोजचींच आहेत. अशी सभा पुन्हा पाहायला नाहीं मिळायची!', 'ए दाम्या, ताईला कशाला घेऊन चाललास सभेला? मारामारी झाली म्हणजे?', 'आमच्या दादाला मीं विचारलं तेव्हां तो म्हणाला मारामारी

काय होते विशाद! ‘सावधान संघा’चे सारे सभासद हजर राहून व्यवस्था ठेवणार आहेत’, ‘पण मी म्हणतों विरुद्ध पक्षानं भरविलेल्या या सभेपासून शरद् दूर राहला असता तर काय बिघडलं असतं?’, ‘हट लेका, तुला कांहीं कळत नाहीं; हीच सभा जिंकण्यांत खरी मौज आहे. शरद्नं गांवभर पत्रक वाटलं आहे तें तूं वाचलं आहेस ना? त्यांतला मुद्दा मला तरी पटतो बाबा’ —इत्यादि उद्‌गार ऐकत ऐकतच श्यामाला रस्त्यानं जावं लागलं होतं.

त्या वेळीं तिच्या मनांत निरनिराळ्या दोन स्मृतिमालिकांतील दुव्यांची वाकडीतिकडी गुंतागुंत होत होती. तिच्या पत्राला शरद्‌कडून जें उत्तर आलं होतं त्याविषयींचा विस्मय आणि खेद तिच्या मनांत अजूनहि ताजा होता; आणि साऱ्या पुण्यांत प्रक्षोभ उडविणारी आजची संध्याकाळची ही सभा शरद्‌च्या ज्या कृत्यांतून उत्पन्न झाली होती त्या कृत्याच्या व त्यामागोमाग झालेल्या घटनांच्या हकीगती गेल्या चार पांच दिवस वृत्तपत्रांतून तिनं वाचल्या होत्या त्याहि तिच्या मनाच्या अगदीं वरच्या पृष्ठभागावर तरंगत होत्या.

वर्षप्रतिपदेच्या चार दिवस अगोदर ‘प्रतिज्ञे’चा खास अंक निघाला, त्यांतल्या अग्रलेखांत शरद्नं जो एक विलक्षण निश्चय जाहीर केला त्यायोगें युद्धांतला पहिला बॉंब पडल्याप्रमाणें झालं होतं; आणि नंतरच्या चार पांच दिवसांत पुण्याच्या लोकांच्या तोंडीं तर दुसरा विषय उरला नव्हताच, पण खालीं मालवणपासून तों वर नागपूरपर्यंतच्या साऱ्या छोट्या-मोठ्या वर्तमानपत्रांत त्याच एका विषयावर उलटसुलट मतप्रतिपादनाच्या चकमकी उडून राहिल्या होत्या. शरद्‌च्या निश्चयाबद्दल बहुतेक वर्तमानपत्रांनीं

त्याची पाठ थोपटली होती, परंतु ज्या वर्तमानपत्रांना त्याचा निश्चय पसंत नव्हता त्यांनीं कठोर शब्दांत त्याचा निषेध केला होता, इतकंच नव्हे तर त्या सर्वांनीं एकमुखानं सवाल केला होता, "सनातन हिंदुधर्माचे पुण्यांतले सारे अभिमानी मेले काय ? शरद् दर्शने यांनीं हिंदुसंघटनाच्या नांवाखालीं जो हा धडधडीत भ्रष्टाकार योजला आहे तो पुण्यांतले खरे धर्माभिमानी लोक उघड्या डोळ्यांनीं पाहणार आहेत काय ?"

या आव्हानाची वास्तविक गरजच नव्हती. शरद्चा विलक्षण निश्चय 'प्रतिज्ञे'च्या खास अंकांत जाहीर झाल्यावर जुन्या धार्मिक मताचे पुण्यांतले लोक कांहीं वेळ अगदीं स्तिमित होऊन गेले. शरद् दर्शनेनं योजलेला डाव अगदीं बिनतोड आहे असं त्यांना वाटलं, व यावर कांहीं उपायच नाहीं अशा कल्पनेनं ते हतबुद्ध झाल्यासारखे दिसले. परंतु काय वाटेल तें असलं तरी शरद्नं योजलेल्या डावाचा प्रतिकार केलाच पाहिजे असं म्हणणारे कांहीं लोक त्यांच्यांत निघालेच; आणि मग शरद्चा निश्चय हाणून पाडण्याची चळवळ हलकें हलकें उभी राहूं लागली.

अशी विरोधी चळवळ होणार हें शरद् ओळखूनच होता, व काय वाटेल तें झालं तरी आपली योजना पार पाडायचीच अशा कृतनिश्चयानंच त्यानं ती 'प्रतिज्ञे'च्या खास अंकांत जाहीर केली होती. अस्पृश्यतेचं सक्रिय निवारण करण्याच्या बाबतींत स्पृश्य हिंदु अजूनहि केवढी अनास्था दाखवीत आहेत, व ज्या ज्या ठिकाणीं समाजांत मिसळण्याच्या अस्पृश्यांच्या नैसर्गिक इच्छेला केवळ रूढीचे व संकेताचे निर्बंध उभे आहेत त्या त्या ठिकाणचे अडसर काढून दारं उघडल्याखेरीज अस्पृश्यांना एकंदर हिंदु समाजाविषयीं परकेपणाच कसा वाटत राहील, आणि हिंदूंच्या राष्ट्रीय सामर्थ्यांत

व एकोप्यांत कसं मोठं वैगुण्य राहील, इत्यादि प्रश्नांची मांडणी शरद्नं आपल्या त्या अग्रलेखांत अत्यंत आवेशानं केली होती. त्या लेखाच्या अखेरीस त्यानं लिहिलं होतं,

"जो परमेश्वर सर्व भूतांच्या ठिकाणीं असल्याचें आपला धर्म सांगतो, ज्या परमेश्वराच्या घरीं उच्चनीच रावरंक असा भेद नाहीं, ज्या परमेश्वराची उपासना करण्याचा सर्वांना सारखाच अधिकार आहे असें प्रत्यक्ष भगवंतापासून तों दहा वीस रुपयांची बिदागी घेऊन परमार्थ शिकविणाऱ्या कीर्तनकारापर्यंत सर्वजण सांगतात, त्या परमेश्वराच्या मंदिरांत अस्पृश्यांना प्रवेश नसावा ही तर अन्यायाची, अधर्माची, राष्ट्रविघातक मूर्खपणाची परमावधि म्हटली पाहिजे! भक्तिपूर्ण अंतःकरणानें देवाचें दर्शन करून साधें तुळशीपत्र वाहिलें तरी तो संतुष्ट होऊन भवसागरांतून तुम्हांला मुक्त करील असा रोमहर्षक आशेचा संदेश ज्या वैदिक धर्माच्या प्रचारकांनीं दिला, त्याची शिकवणूक खचित अशी नाहीं, कीं हा साधा भक्तिमार्ग फक्त उच्चवर्णीय हिंदूंसाठीं राखून ठेवावा, आणि अस्पृश्यांना मंदिरांतून हाकून बाहेर काढावें! ज्याच्या भक्तश्रेष्ठांत ब्राह्मणांप्रमाणेंच शिंपी, न्हावी, महार, मांग, सारे होऊन गेले, ज्यानें संत सखूचें रूप जितक्या आवडीनें घेतलें तितक्याच हौसेनें व तत्परतेनें महाराचें रूप घेऊन 'जोहार' म्हणून ललकारी ठोकली, त्या विठ्ठलाच्या पंढरपूर येथील मंदिरांत विधवांना आणि अस्पृश्यांना खुला प्रवेश नसावा ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट होय! अस्पृश्यांना बंद असलेल्या या असल्या मंदिरांच्या कळसाकळसांतून आवाज निघत आहेत कीं अस्पृश्य हे स्पृश्यांचे फक्त गुलाम आहेत! आणि हे आवाज जोंपर्यंत अस्पृश्यांच्या अंतःकरणाला घरे पाडीत आहेत, तोंपर्यंत त्यांच्या ठिकाणीं

स्पृश्यांबद्दल एकभाव व जिव्हाळा उत्पन्न होणें शक्य नाहीं, तीव्र राष्ट्राभिमान निर्माण होणें शक्य नाहीं. लोंबत राहिलेल्या छकलांप्रमाणें अस्पृश्य हिंदु समाजाला चिकटून राहिले आहेत. प्रतिष्ठेच्या, निश्चित योगक्षेमाच्या, अथवा राजकीय हक्काच्या आमिषानें आपला कोणीहि हितशत्रु त्यांना सहज ओरबाडून दूर करील! करील कशाला?—ही विच्छेदनाची क्रिया सुरू आहे. ती आपल्याला दिसत नाहीं! दिसली तरी 'मला काय त्याचें?' म्हणून आपण स्वस्थ बसतों. आणखी किती दिवस आपण असे स्वस्थ बसणार?

चार दिवसांनीं वर्षप्रतिपदा येत आहे! त्या शुभ मुहूर्तावर प्रत्येक स्पृश्य हिंदूनें प्रतिज्ञा करावी, कीं अस्पृश्यतेचा कलंक नाहींसा करण्यासाठीं मला जें जें शक्य आहे तें तें मी करीन. मला काय शक्य आहे या प्रश्नाचा मी स्वतः मनाशीं विचार करूं लागलों तेव्हां मला दिसून आलें कीं, मी अस्पृश्यता मानीत नाहीं. अस्पृश्य माझ्या घरीं येतात, खातात पितात, मी त्यांच्या वस्तींत जातों, त्यांच्या घरीं खातों, हें सगळें खरें असलें तरी एक गोष्ट मीं अजून केलेली नाहीं. करणें मला शक्य असून करावयाचें माझ्या मनांत अद्यापि, कसें कोण जाणे, आलें नाहीं. पण आतां आलें आहे; व जें मी करण्याचें योजीत आहे त्याला बरेंचसें सार्वजनिक घटनेचें स्वरूप येणें अपरिहार्य असल्यामुळें त्याचा संकल्प येथें जाहीरपणें करणें मला इष्ट व आवश्यक वाटतें.

माझ्या पणजोबांनीं बांधलेलें राममंदिर येत्या रामनवमीस रामजन्माच्या उत्सवाची सुंदर संधि साधून मी अस्पृश्यांस खुलें करणार आहे!..."

शरद्च्या अग्रलेखाचा हा बॉंब पडल्यावर उलट सुलट चर्चेचा भडका महाराष्ट्रभर उडाला, व खुद्द पुणें शहरांत तर त्याला

लवकरच युद्धाचं स्वरूप आलं. सुधारक राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांनीं आनंद व्यक्त केला, परंतु सनातनी लोक संतापले, व त्यांच्या संतापाला संघटित स्वरूपहि येऊं लागलं. 'सनातन धर्म-संरक्षक समिति' आणि 'आर्यसंस्कृतिपालन मंडळ' या संस्था जाग्या झाल्या. त्यांनीं हस्तपत्रकं वाटलीं, छोट्या सभा केल्या, आणि अखेर टिळक-स्मारक-मंदिरांतली आजची जाहीरसभा बोलावली. या सभेच्या निमंत्रण-पत्रिकेवर जरी त्रेपन लोकांच्या सह्या होत्या तरी कदाचित् विशेष मोठा समाज तिला जमला नसता. परंतु 'आजच्या संध्याकाळच्या सभेला मी हजर राहणार आहे' अशा आशयाचं शरद्चं पत्रक सकाळीं वाटलं गेलं होतं, आणि त्यामुळें सभेला विराट् स्वरूप आलं होतं...

शरद्चा तो अग्रलेख श्यामानं प्रथम वाचला तेव्हां तिची मनः-स्थिति विलक्षण झाली होती. ज्या व्यक्तीवर आपण लुब्ध आहोंत तिचं एखाद्या कृत्याबद्दल अत्यंत कौतुक करण्याची विलक्षण उत्सुकता वाटावी, परंतु तें कौतुक करण्याची शक्यता उरलेली नसावी यासारखी तरुण स्त्रीला क्लेशकारक होणारी दुसरी गोष्ट क्वचितच असेल. शक्य असतं तर तो अग्रलेख वाचून झाल्या-बरोबर, अथवा कदाचित् त्यांतील मुख्य आशय लक्षांत आल्यावर पुढें न वाचतांच ती शरद्कडे धावत गेली असती, आणि—

परंतु या कल्पनांचा आतां काय उपयोग होता? कारण त्याचं अभिनंदन करण्यासाठीं, त्यानं जो निश्चय जाहीर केला तो पार पाडण्याच्या कामीं हवं तें साहाय्य करण्यांत आपल्याला धन्यता वाटेल असं त्याला सांगण्यासाठीं तिच्या मनाला उत्कंठा वाटत होती हें जितकं खरं, तितकंच तिनं स्वतःशीं केलेल्या नव्या निश्चयाप्रमाणें त्याच्याकडे ती अशी जाऊं शकत नव्हती हेंहि खरं.

तिच्या पत्राला त्यानं धाडलेल्या उत्तरांत यापुढें तुम्ही माझ्याकडे येऊं नका असं त्यानं थोडंच लिहलं होतं! परंतु तिनं विचारलेल्या मुख्य प्रश्नाला त्यानं जें उत्तर दिलं होतं तें वाचून श्यामाच्या मनाला तीव्र निराशेचा एवढा मोठा आणि इतका अनपेक्षित धक्का बसला होता कीं, त्या आवेगांत तिला वाटलं होतं, झालं संपलं सारं! आतां आपण पुन्हा कधीं शरद्च्या दृष्टीस पडूं नये हेंच उत्तम!...

शरद्नं लिहिलेल्या पत्राची भाषा अत्यंत नम्र होती. जें आपल्याला सांगायचं तें सांगतांना तिच्या भावनांचा किंचित्हि उपमर्द होऊं नये अशी जाणीव ठेवूनच एकेक शब्द लिहिला गेला असावा असं त्याच्या लिहिण्यावरून स्पष्ट दिसण्यासारखं होतं. त्यानं लिहलं होतं.

"...तुमच्या बुद्धिमत्तेबद्दल, आणि महत्त्वाकांक्षी स्वभावाबद्दल मला येवढ्या अल्प परिचयांतहि किती आदर वाटूं लागला तें वर जें लिहिलं त्यावरून तुमच्या ध्यानांत येईल असं वाटतं. मीं अंगीकारलेलं कार्य असं आहे कीं, त्यांत जेवढे सहकारी मला मिळतील तेवढे थोडेच आहेत. माझ्याभोंवतालीं जी मंडळी अंतःस्फूर्तीनं गोळा झाली आहेत त्यांतल्या कोणाहिपेक्षां तुमची बुद्धिमत्ता श्रेष्ठ ठरण्यासारखी आहे. अर्थात् तुमचं सहकार्य तुम्हीं देऊं करतांच तें मीं कृतज्ञतापूर्वक स्वीकारावं. परंतु दुर्दैवानं तुम्ही पुरुष नसून स्त्री आहांत, अन् माझ्याशीं सहकार्य करण्याची तुमची इच्छा निर्लेप नाहीं. ती इच्छा खोटी आहे असं मी म्हणत नाहीं, परंतु ती मुळांत प्रेमांतून उत्पन्न झालेली आहे, आणि अशा प्रेमाला तर मला बिलकुल उत्तेजन देतां येणार नाहीं... मला संसार करायचा नाहीं, कार्य करायचं आहे. माझ्यासारख्या माणसानं

प्रेमाच्या भानगडींत पडूं नये. महत्त्वाकांक्षी पुरुषाच्या मार्गांत स्त्री ही एक धोंड आहे असं म्हणतात तें मला खरं वाटतं. तुमचा उपमर्द करण्याचा माझा हेतु असणं शक्यच नाहीं हें तुम्हांला मान्य व्हायला हरकत नाहीं. आणि माझ्या शब्दांचा गैर अर्थ तुम्ही करणार नाहीं अशी मला खात्रीहि वाटते. खरोखरच माझी अशी समजूत आहे कीं, संकटाशीं झगडत कार्य करण्यासाठीं पुढें झाल्यावर स्त्रीचं प्रेम वर्ज्यच मानलं पाहिजे. मी मनाशीं अशी प्रतिज्ञा करूनच आजपर्यंत वागत आलों आहे, आणि म्हणून तुमच्या पत्राला अत्यंत नम्रपणें पण स्पष्टपणें असंच उत्तर देणं मला भाग आहे कीं—"

अशा तऱ्हेचं उत्तर श्यामानं अपेक्षिलं नव्हतं. त्याच्याकडून काय उत्तर येतं कोण जाणे अशी धाकधूक जरी तिला वाटली होती तरी मनांतल्या मनांत तिला विश्वास होता कीं, आपल्या प्रीतीचा त्याच्याकडून स्वीकार होईल. या विश्वासानं तिच्या हृदयाला धीर मिळाला होता, अन् त्याच्या पत्राला विलंब झाला तो तिला सुसह्य वाटला होता. आणि आतां त्यानं असं लिहिलं होतं! केवळ तिच्या प्रेमाचा त्यानं अव्हेर केला नव्हता, तर प्रीतीची महती व शक्तिच त्यानं अमान्य केली होती!...

तिच्या मनांत आलं, उठावं, शरद्कडे जावं, अन् त्याच्याशीं खूप भांडावं! त्याला विचारावं स्त्री ही एक महत्त्वाकांक्षी पुरुषाच्या मार्गांतली धोंड आहे असं तुम्ही मानतां याला पुरेसा आधार आहे काय? तुम्हीं इतिहास वाचला नाहीं काय? मोठमोठ्या पुरुषांचीं चरित्रं तुम्हांला निराळीच साक्ष देत नाहींत काय? ज्यांना कार्याची स्फूर्ति स्त्रियांच्या प्रेमामुळेंच मिळाली व संकटांनीं माजविलेल्या अंधःकारांतहि त्या प्रेमामुळेंच ज्यांना प्रकाश दिसला

अशा किती मुत्सद्दयांचीं, कलावंतांचीं, शास्त्रसंशोधकांचीं, रण-झुंजारांचीं नांवं तुम्हांला सांगूं ?...

परंतु तिनं आपलं मन आवरलं होतं.

त्याच्या त्या उत्तरानं तिच्या मनावर आघात झाला होता खरा. परंतु त्या वेदनांच्या भरांत मनांत येईल तसं वागण्याइतका तिनं आपला तोल सुटूं दिला नव्हता. आपल्या प्रेमाचा दुसऱ्यावर जुलूम करणं मानी स्त्रीला विटंबनेसारखं वाटतं; परंतु प्रेमाच्या बाबतींत पराभव मान्य करण्यासहि मानी स्त्री सहसा तयार होत नाहीं. श्यामा पराभव पत्करणार नव्हती. कायमची निराशहि व्हायला तयार नव्हती. परंतु शरद्शीं यापुढें कसं वागायचं हें मनाशीं नीट ठरवायला हवं होतं. तें ठरेपर्यंत त्याची गाठभेट घेऊं नये असा तिनं बेत केला होता; व त्याप्रमाणें ती वागली होती.

त्यामुळें त्याचा तो सुंदर अग्रलेख वाचतांच त्याच्याकडे जायची अतिशय तीव्र इच्छा जरी तिला झाली होती तरी तिनं ती आवरली होती. त्या अग्रलेखानं उडालेली सारी खळबळहि तिनं पुढच्या चार दिवसांत दूर राहून पाहिली होती.

परंतु आज सकाळीं शरद्चं पत्रक जेव्हां तिच्या हातीं पडलं व तिनं वाचलं तेव्हां मात्र तिचा निश्चय पालटला. त्या पत्रकाच्या अखेरीस त्यानं लिहिलं होतं, " आज संध्याकाळची सभा माझ्या विरोधकांनीं भरविलेली असली तरी जाहीर सभा आहे. तेथें जावयाचा हक्क सर्वांना आहे. मी स्वतः तेथें जाणार आहे. भाषण करण्याची परवानगी मागणार आहे. अस्पृश्यांना माझें राममंदिर खुलें करण्याचा माझा निश्चय ज्यांना पसंत असेल त्या सर्वांनीं सभेला अवश्य यावें. सभेंत दंगाधोपा होणार अशा बातम्या उठल्या आहेत त्यांवर बिलकुल विश्वास ठेवूं नये. सभेची

व्यवस्था आमच्याकडे नाहीं. ज्यांनीं ती बोलावली त्यांच्याकडे आहे. परंतु आमच्या 'सावधान संघा'च्या सर्व शाखांचे सभासद सभास्थानीं हजर असतील. सभेंत पूर्ण शांतता व शिस्त राखली जावी यासाठीं 'सावधान संघ' काय करूं शकतो त्याचा पुण्याच्या नागरिकांना अनुभव आहेच. तेव्हां माझ्या निश्चयाविषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या सर्व पुरुषांस व स्त्रियांसहि विनंति, कीं सारेजण सभेला या! निर्धास्तपणें या!"

"स्त्रियांसहि?" श्यामा स्वतःशींच हसली होती.

जणूं शरद् जवळच आहे अशा कल्पनेनं ती स्वतःशींच पुटपुटली, "स्त्री पुरुषाच्या मार्गांतील धोंड आहे ना? मग स्त्रियांना हें पाचारण कशाला?..."

ती आणखी हसली होती, पण सभेला जाण्याचा तिनं निश्चय केला होता.

सभेला गर्दी होणार हें तिनं ओळखलं होतं. पण रस्त्यांतले थवे पाहून तिला वाटलं होतं 'इतकी गर्दी?' आणि प्रत्यक्ष सभेच्या ठिकाणीं येऊन पोंचल्यावर तर पंधरा वीस हजारांचा तो प्रचंड समुदाय पाहून ती चकितच झाली.

आणि त्या क्षणीं एका विलक्षण आनंदाच्या ऊर्मीचा तिला अनुभव आला. 'शरद्च्या हाकेला धावून हे हजारों लोक आले होते! लोकांना शरद् किती प्रिय आहे! अन् मलाहि!'—हा विचार मनांत येऊन जातांच कांहीं एका मृदु हर्षाच्या उमाळ्यानं तिचा कंठ दाटून आला.

◆ ◆ ◆

सभेच्या अध्यक्षस्थानीं पंडित केदारशास्त्री यांची योजना केली होती. ते प्रास्ताविक भाषण करूं लागले तों उपरोधिक हशानं, टाळयांनीं, व " माहीत आहे, माहीत आहे ! " " समजलं हो, पुरे करा ! " अशा उद्‌गारांनीं त्यांचा सत्कार होऊं लागला. त्या प्रचंड सभेंत अधिक भरणा कोणत्या मताच्या लोकांचा होता हें उघड होऊं लागलं, आणि ते लोक भाषणं ऐकून घ्यायला कितपत तयार आहेत त्याचाहि अंदाज दिसला. ध्वनिक्षेपक यंत्रापुढें अध्यक्ष कांहीं वेळ ओरडत राहिले, पण आपली अवस्था अधिक केंविलवाणी करून घेण्यांत हशील नाहीं असं त्यांच्या लक्षांत येतांच ते मटकन् खालीं बसले. " आतां प्रथम सुप्रसिद्ध साहित्यिक रं. गो. मिसाळ भाषण करतील " असं ते बसतां बसतां पुटपुटले. सभेचा नूर पाहून मिसाळांच्या सनातनी छाप चेहऱ्यावरच्या झुपक्या मिशा थरथरूं लागल्या होत्या, व लठ्ठ कांचांच्या चष्म्यामागच्या त्यांच्या बटबटीत डोळयांपुढें काजवे चमकूं लागले होते. तथापि घशांत उभा राहिलेला भीतीचा आवंढा त्यांनीं खालीं पोटाकडे रेटला, व घामाघूम होऊं लागलेल्या वामहस्तानं मिशा चेपून ते उठले आणि पुढें आले. परंतु ते यंत्राजवळ पुरते आले नाहींत तोंच ठिकठिकाणाहून आरोळ्या उठल्या, " रं. गो. ! Go ! रं. गो. ! Go back ! " मिसाळांनीं त्यांतच सुरुवात केली,

" अध्यक्षमहाराज ! व सभ्य स्त्रीपुरुषहो ! "

तितक्यांत एका कोपऱ्यांतून दोनचार घोडीं खिंकाळावीं तसा हशा एकदम ऐकूं आला, व त्यामुळें सारीच सभा खो खो करून हसूं लागली.

मिसाळ चिडले. ते गर्जले,

" आपण सर्व सभ्य असाल असं वाटलं होतं. पण तसं दिसत नाहीं. तेव्हां—"

परंतु त्यांचं हें बोलणं लोकांना उपमर्दकारक वाटलं, आणि ज्या बाजूला मघांशी तें अश्वहास्य उठलं होतं तिकडून 'शब्द परत घ्या! असभ्य कोणाला म्हणतां?' अशी आरोळी आली व ती सगळ्याच लोकांनीं उचलली. तिच्यांतच पुन्हा मघांची रं. गो.! Go back! ही आरोळी देखील मिसळली! सावधान संघाचे स्वयंसेवक लोकांना उठूं अगर जागचे हालूं देत नव्हते. पण ते त्यांच्या तोंडावर हात कसा ठेवणार? " ऐका! शांत राहा " या त्यांच्या नम्र आरोळ्यांची कोलाहलांत भर मात्र पडल्यासारखी झाली. रं. गो. मिसाळ रानहाक्यांच्या गोंगाटानं बावरलेल्या एखाद्या काळविटासारखे आपलीं कल्पित शिंगं रोखून जिथल्या तिथें उभे राहिले. त्यामुळें हशा, टाळ्या, 'शब्द परत घ्या!' 'रं. गो.! Go back' इत्यादि घोषणांना आणखी जोर चढला.

तितक्यांत शरद् अध्यक्षांच्या कानाशीं लागलेला लोकांना दिसला; व त्यांच्याशीं तो काय बोलत असावा याबद्दलचे तर्क त्यांच्यांत सुरू होतात न होतात तोंच तो स्वतः यंत्रापुढें येऊन उभा राहिला. सुप्रसिद्ध साहित्यिक रं. गो. मिसाळ कसे मागे सटकले तें कोणाच्या लक्षांतहि आलं नाहीं. सारी सभा एकदम स्तब्ध होऊन शरद्‌चा आवाज ऐकूं लागली. तो म्हणाला,

" मित्र हो, ही जाहीरसभा असल्याकारणानं आपल्याला इथं येण्याचा हक्क आहे हें जितकं खरं, तितकंच ज्यांनीं ही मूळ बोलावली त्यांच्या आमंत्रणावरून आपण आलां असल्यानं सभा चालविण्याचा हक्क त्यांचा आहे व त्यांच्या योजनेप्रमाणं जीं भाषणं होतील तीं शांतपणें ऐकण्याचं कर्तव्य आपलं आहे हेंहि

खरं आहे! (अधिकच स्तब्धता.) माझ्या कृत्याचा निषेध करण्यासाठीं ही सभा आहे. मी स्वतः इथें हजर आहे! इतकंच नव्हे, तर इथें होणाऱ्या भाषणांना उत्तरादाखल भाषण करण्याची परवानगी अध्यक्षांकडून मीं आत्तांच मिळवली आहे! (टाळ्यांचा प्रचंड गजर) तेव्हां माझ्या सन्मित्रांचीं भाषणं आपण अगदीं शांतचित्तानं ऐकून घ्यावींत अशी मी आपणांस प्रार्थना करतों."

शरद् दूर होऊन आपल्या जागेवर बसला. सभा पूर्ण स्तब्ध झाली. मिसाळांनीं आपल्या भाषणास पुन्हा सुरुवात करावी अशी सुचना त्यांना द्यायसाठीं अध्यक्ष त्यांच्या खुर्चीकडे पाहूं लागले. पण ते कोठें दिसेनात! त्यांनीं केव्हांच गुपचुप Go back केला होता!

मग पुण्यांतील सनातनी पक्षाचे तीन वावदूक आधारस्तंभ वैद्यालंकार हंबरडे, तात्यासाहेब पुराणे वकील, आणि यज्ञमार्तंड गलगले यांचीं एकामागोमाग भाषणं झालीं, व तीं श्रोत्यांनीं विशेष गडबड न करतां ऐकून घेतलीं.

हंबरडे वैद्यांनीं अस्पृश्यांची स्थिति वाटते तितकी करुणास्पद नाहीं व त्यांना अन्यायानं वागविण्यांत येतं ही अविचारी आणि मूर्ख लोकांनीं उठविलेली केवळ एक मतलबी कोल्हेकुई आहे असं म्हणून आपल्या भाषणाला प्रारंभ केला; आणि मग चातुर्वर्ण्यासंबंधींचे गीतेंतले श्लोक, संतांच्या अभंगांतील व ओव्यांतील उतारे यांच्या साहाय्यानं चातुर्वर्ण्य आणि स्पृश्यास्पृश्यभेद या गोष्टी प्रत्यक्ष भगवंतानीं निर्माण केल्या आहेत असा निर्वाळा देऊन, शेवटीं आवाज उंच करून ते म्हणाले,

"शरद् दर्शने यांच्यासारखे सुशिक्षित पदवीधर कुणाच्या तरी नादीं लागून आपल्या धर्माची खरी परंपरा विसरतात, आणि ज्या-

योगें हिंदु समाजाचा घातच व्हावा अशा गोष्टींचा सुधारणा म्हणून पुरस्कार करतात हें पाहून आम्हां सनातनी लोकांना फार वाईट वाटतं. स्वतःचा असा बुद्धिभ्रंश होऊं न देतां ते जर आमच्यांत राहतील आणि सनातनी हिंदु धर्माची पताका फडकत ठेवतील तर आमचं पुढारीपण त्यांना आम्ही आनंदानं देऊं. परंतु त्यांची बुद्धि चळली त्याला काय करायचं ? मतांचा कांहीं कोणी कुणावर जुलूम करूं शकत नाहीं ना ? परंतु शरद् दर्शने यांनीं आतां स्वतःच्या सुधारकी मतांचं पिल्लू हळूच समाजांत सोडून द्यायचा घाट घातला आहे; आणि म्हणून आपण सर्व हिंदुधर्मप्रेमी सनातनी लोकांनीं जागृत होऊन त्यांच्या उपक्रमाचा जोरानं प्रतिकार केला पाहिजे. आपण म्हणाल कीं प्रतिकार कसा करायचा ? मी सांगतों आपल्याला ! येत्या रामनवमीच्या दिवशीं दर्शन्यांच्या राममंदिरांत अस्पृश्य प्रवेश करणार आहेत ना ? ठीक आहे. आपण त्या दिवशीं रस्त्यावर आडवे पडून मंदिराचा दरवाजाच अडवून टाकूं, आणि ओरडून सांगूं कीं, हिंदु धर्माच्या रक्षणासाठीं आमच्या देहांचे बळी देण्यास आम्ही तयार आहोंत ! आमच्या मेलेल्या शरीरांवरून चालत गेल्याखेरीज अस्पृश्यांना या पवित्र राममंदिरांत प्रवेश मिळणार नाहीं ! स्वराज्यापेक्षांहि स्वधर्माची किंमत अधिक आहे; अस्पृश्यता अन्यायाची आहे, अस्पृश्यता म्हणजे कलंक आहे इत्यादि ओरड्यांत कांहीं एक अर्थ नसून हिंदुधर्मांतून फुटून जाऊं इच्छिणाऱ्या मतलबी लोकांचा तो एक डाव आहे—या सर्व गोष्टी आपण लक्षांत घेतल्या पाहिजेत, आणि वेळच आली तर सत्याग्रहाला तयार असलं पाहिजे. तशी वेळ आतां आली आहे असं मला मोठ्या दुःखानं म्हणावं लागतं. शरद् दर्शने आपला हट्ट सोडायला तयार नाहींत. तेव्हां आम्हांलाहि हट्ट केला पाहिजे व

तो आम्ही करून दाखवूं. रामनवमीच्या दिवशीं आम्ही सनातनी लोक दर्शन्यांच्या राममंदिराचं प्रवेशद्वार अडवून टाकूं, आणि त्या ठिकाणीं पडणारं पहिलं शरीर माझं असेल ! ”

ही भीषण प्रतिज्ञा करून हंबरडे वैद्य खालीं बसले तेव्हां सभेंतील सनातनी लोकांनीं टाळ्या वाजविल्या. परंतु त्या टाळ्यांच्या आवाजापेक्षां सभेंत जो उपरोधिक हशा पिकला त्याचाच आवाज मोठा होता.

नंतर पुराणे वकिलांचं भाषण झालं. पुराणे वकील म्हणजे पुण्याच्या जाहीर व्यासपीठावरील एक विनोदमूर्ति समजली जाई. त्यांचं बेफाट आचरट वक्तृत्व पुण्याच्या श्रोत्यांना करमणुकीचं एक साधन वाटे, व त्यामुळेंच ते कोणत्याहि विषयावर बोलले व बोलतांना त्यांनीं कोणालाहि शिव्या दिल्या तरी त्यांचं भाषण ऐकून घेण्यास लोक नेहमीं तयार असत. किंबहुना त्यांनीं अद्वातद्वा बोलावं व आपल्याला पोटभर हसायला मिळावं हीच लोकांची अपेक्षा असे, आणि ती त्यांच्याकडून पुरी झाली कीं ते खूष असत. त्यामुळें आजहि पुराणे वकील बोलायला उठलेले दिसतांच ‘ऐका ऐका’, ‘गप्प बसा’ अशा आरोळ्या झाल्या आणि लोक उत्सुकतेनं ऐकूं लागले. पुराणे वकिलांनीं भाषणाला प्रारंभच असा केला कीं, “एका वेड्या माणसाला ताळ्यावर आणण्यासाठीं आजची सभा आहे. शरद् दर्शन्याच्या बापाला मी ओळखीत होतों. ( मोठा हशा आणि टाळ्या ) ते माझे मोठे स्नेही होते. अहो, हा शरद् लंगोटी नेसत असे तेव्हांपासून मी त्याला पाहतोंय. ( प्रचंड हशा ) लहानपणापासून हा मुलगा विलक्षण हुशार. पण हा हुशार हेंच बिघडलं. कारण हुशार मनुष्य वेडं झालं कीं फारच वेडं होतं. पण शरद्नं जसा वेडं व्हायचा निश्चय केलाय

त्याचप्रमाणें त्याला वेडं होऊं न देण्याचा निश्चय आम्हीं केलेला आहे."

अशी सुरुवात करून पुराणे वकिलांनीं भाषणाचं चऱ्हाट नेहमीं-प्रमाणें वळलं. त्यांनीं नेहमींप्रमाणें गांधींना शिव्या दिल्या, गुज-राथ्यांना शिव्या दिल्या, 'अरे तुम्ही काय ब्राह्मणांच्या पोरांना भंग्यांच्या पोरींशीं लग्न करायला सांगणार ?' असा प्रश्न विचारून अस्पृश्यतानिवारकांची हेटाळणी केली, आणि अखेरीस ते म्हणाले,

"अस्पृश्यांना मंदिरप्रवेश मिळवून देण्याचं हें खूळ आपण वेळींच गाडून टाकलं पाहिजे. शरद् अजून बच्चा आहे. त्याला कांहीं अक्कल नाहीं. असली तरी त्यानं ती गहाण टाकली आहे. पण त्याचे हे चाळे आम्ही उघड्या डोळ्यांनीं पाहूं असं त्याला वाटतं काय ? दर्शन्यांचं राममंदिर अस्पृश्यांना कसं खुलं होतं तें आम्ही पाहूंच ! शरद्ला वाटत असेल हें राममंदिर आपल्या मालकीचं आहे तेव्हां आपण त्याचीं दारं उघडायला अगर झाकायला पूर्ण मुखत्यार आहोंत. पण ही चूक आहे त्याची. मी वकील आहे. मी कायदा जाणतों. वहिवाटीचा म्हणून एक हक्क असतो हें शरद् विसरला आहे. आज साठ-सत्तर वर्षे फक्त स्पृश्य हिंदु या मंदिरांत येऊन दर्शन घेत आहेत. त्यामुळें या मंदिरावर स्पृश्य हिंदूंचा हक्क निर्माण झाला आहे. हें मंदिर शरद्च्या एकट्याच्या खाजगी मालकीचं नाहीं. तुम्हां आम्हां हजारों स्पृश्य हिंदूंच्या मालकीचं तें आहे. निदान त्यावर शरद्ला कितपत मालकी हक्क सांगतां येईल हा प्रश्न उपस्थित करण्यासारखा आहे; आणि तो आम्ही, म्हणजे 'सनातन धर्म-संरक्षक समिति', 'आर्यसंस्कृतिपालन मंडळ' या संस्थांच्या सभासदांनीं उपस्थित करायचं ठरवलं आहे. आम्हीं कोर्टांत अर्ज गुदरला आहे, कीं

'दर्शन्यांचा राम' ही जागा सार्वजनिक मालकीची समजली जावी अशा स्वरूपाची आज साठ-सत्तर वर्षांची तिची वहिवाट आहे, व ज्या अर्थी, स्पृश्य हिंदूंच्या भावना दुखविण्यास कारण होईल अशा तऱ्हेचा त्या जागेचा उपयोग शरद् दर्शने यानं करायचं ठरवलं आहे त्या अर्थी मेहेरबान कोर्टानं Injunction म्हणजे तात्पुरता मनाई हुकूम शरद् दर्शने याजवर बजावावा ! कोर्टानं असा मनाई हुकूम काढला तर बरंच झालं ! न काढला तरी शरद्चा बेत कसा हाणून पाडायचा तें आम्ही जाणतों ! "

पुराणे वकील बसले तेव्हां लोकांनी मनापासून टाळ्या वाजविल्या. श्रोत्यांपैकीं जे सनातनी होते त्यांना वाटलं पुराण्यांनीं अगदीं दणदणीत भाषण केलं; आणि बाकीच्यांना वाटलं त्यांनीं आपल्या अपेक्षेप्रमाणें आपली भरपूर करमणूक केली.

त्यानंतर यज्ञमार्तंड गलगले बोलायला उठले. त्यांची ती भस्मचर्चित बुटकी तुंदिल मूर्ति शालजोडीचा पट्टा वामभुजावरून लपेटीत जेव्हां यंत्राजवळ आली तेव्हां सभेंत कुतूहलात्मक कुजबुज झाली, व एक दोघे ओरडले, " लवकर आवरा हो ! "

ती सूचना ओळखून यज्ञमार्तंडांनीं छोटंसंच भाषण केलं.

'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्' इत्यादि पुरुषसूक्तांतील भाग म्हणून दाखवून त्यांनीं समाजपुरुषाची कल्पना विशद करून सांगितली, व चारी वर्णांतील लोकांनीं आपलीं विहित कर्मे संतोषानं करीत राहिल्यानंच सबंद समाजाचं श्रेयस् व शांति, पुष्टि, तुष्टि कशी साध्य होते त्याचं विवेचन केलं. आणि अखेर शरद्नं योजिलेली गोष्ट अखिल स्पृश्य हिंदु समाजाला किती दुःखदायक व संतापकारक वाटत आहे त्याचं वर्णन करून ते म्हणाले,

" हें राममंदिर ज्यांनीं बांधलं ते शरद् दर्शन्यांचे पणजोबा

दाजीसाहेब दर्शने किती कर्मठ व कट्टे सनातनी होते त्याचा शरद्‌ना विसर पडला असेल, पण महाराष्ट्राला पडणार नाहीं. शरद्‌चे आजोबा काकासाहेब यांचाहि धर्माभिमान फार जाज्वल्य होता. शरद्‌चे वडील दादा दर्शने हे तर माझे स्नेही होते. यज्ञमूर्ति बापटांनीं शनिवार पेठेंतल्या साठ्यांच्या बखळींत जेव्हां मोठा यज्ञ केला तेव्हां दादांनीं एक हजार रुपयांची देणगी दिली होती. अशा धर्माभिमानी कुलांत जन्मलेल्या शरद्‌नीं आपलं वडिलार्जित राममंदिर अस्पृश्यांस खुलं करण्याचं मनांत आणावं ही मोठी खेदकारक घटना म्हटली पाहिजे. मी शरद्‌ना प्रणिपातपूर्वक विचारतों कीं, हा भ्रष्टाकार आपल्या पणजोबांना, आजोबांना वडिलांना रुचला असता असं तुम्हांला वाटतं का ? आम्हां इतरेजनांच्या भावनांची गोष्ट क्षणभर सोडूं. पण ज्यांनीं हें मंदिर बांधलं व ज्या तुमच्या कुलपुरुषांनीं त्याचं वैभव पुढं वाढविलं, त्यांच्या भावनांचा विचार तुम्ही करायला नको काय ? नीट विचार करा, आणि या धर्मविच्छेदक कृत्यापासून परावृत्त व्हा ! हें तुमचं अमंगल कृत्य पाहून तुमचे पितर स्वर्गात खचित कष्टी होतील ! त्यांना सद्‌गति मिळावी येवढं तुमचं खास कर्तव्य आहे व तें तुम्ही पार पाडलंच पाहिजे !"

यज्ञमार्तंड गलगल्यांनीं भाषण संपविलं तेव्हां सनातनी श्रोत्यांनीं टाळ्यांचा गजर केला. त्यांच्या भाषणांतील अखेरचा तो पितरांचा उल्लेख फारच नाट्यपूर्ण होता यांत संशय नाहीं.

अध्यक्षांनीं खूण केल्यावरून शरद् बोलण्यासाठीं पुढें येऊं लागलेला दिसतांच लोकांनीं टाळ्या वाजविल्या. शरद्‌नं बोलण्यास प्रारंभ केला तेव्हां सभेंत अगदीं पूर्ण स्तब्धता झाली. " मित्रहो " अशी सुरुवात करून तो अगदीं शांत व गंभीर चेहऱ्यानं बोलूं

लागला. आजच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यामध्यें हिंदुसमाजाच्या सामर्थ्याचं आणि एकजूटीचं केवढं महत्त्व आहे, ही एकजूट निर्माण करण्यासाठीं स्पृश्यास्पृश्य भेद नाहींसा करून सर्व हिंदूंना सार्वजनिक जीवितांत सारखेच हक्क उपभोगूं देणं किती आवश्यक आहे, या गोष्टीकडे दुर्लक्ष केल्यामुळें हिंदुसमाज आंतून पोखरला जाऊन कसा विस्कळित होत चालला आहे, आणि याचा फायदा घेऊन इतर समाज हिंदूंवर किती प्रकारें आक्रमण करीत आहेत, अस्पृश्यता धर्माच्या व न्यायाच्या दृष्टीनं पाहिल्यास हिंदुसमाजावरील एक मोठा कलंक तर आहेच परंतु राष्ट्राच्या राजकीय लढ्याच्या दृष्टीनं देखील ती केवढी मोठी आपत्ति ठरली आहे व ठरणार आहे—इत्यादि मुद्द्यांचं त्यानं मोठं मुद्देसूद आणि तर्कशुद्ध विवेचन केलं. आणि नंतर किंचित् आवाज चढवून तो म्हणाला,

"...या सर्व कारणांसाठीं तुम्ही आम्ही सर्वांनीं मिळून हा घातुक स्पृश्यास्पृश्य भेद नाहींसा करण्यासाठीं जें जें शक्य तें तें ताबड-तोब केलं पाहिजे. ही गोष्ट माझ्या अंतःकरणाला पटली, आणि म्हणून माझ्या पणजोबांनीं बांधलेल्या राममंदिरांत अस्पृश्यांना पूर्ण प्रवेश देण्याचं मीं ठरविलेलं आहे. या गोष्टीस कोणाचा विरोध होईल व कुणाचा पाठिंबा मिळेल याचा मीं आपल्या मनाशीं नीट हिशोब आधींच केलेला आहे, व तसा तो केला असल्यामुळें आजच्या सभेंतील भाषणांचं मला आश्चर्य वाटत नाहीं. या पुणें शहरांत कांहीं सनातनी लोक आहेत हें मला माहीत आहे, परंतु बहुसंख्य नागरिक माझ्या मताचे आहेत असाहि मला विश्वास आहे. आतां या सभेंत अध्यक्षांकडून माझ्या निषेधाचा ठराव मांडला जाईल तो प्रचंड बहुमतानं फेटाळला जाईल याबद्दल मला बिलकुल शंका नाहीं. ( प्रचंड टाळ्या ) आपला असा पाठिंबा

इतका स्पष्ट दिसत असतांना मीं सनातनी लोकांच्या विरोधाची डर काय म्हणून बाळगावी ? माझ्या आधीं ज्या विद्वानांचीं भाषणं झालीं त्यानीं घातलेल्या परोपरीच्या दहशतीची मीं काय म्हणून किंमत करावी ?

वैद्यालंकार हंबरडे म्हणतात रामनवमीच्या दिवशीं सनातनी लोक मंदिराच्या प्रवेशद्वारांत आडवे पडतील, आणि स्वतः वैद्यालंकारांचं शरीर सगळ्यांत पुढें असेल. हरकत नाहीं. केव्हां तरी आणि कुठें तरी आपली काया आघाडीवर ठेवण्याची हंबरड्यांना स्फूर्ति होत असली तर मला त्यांत आनंद आहे ! ( हशा ) त्यांना मी इतकंच नम्रपणानं परंतु निश्चयानं सांगतों कीं, सनातन्यांचीं आडवीं झालेलीं शरीरं न दुखावितां अलगद उचलून वाटेवेगळीं करण्याचं सामर्थ्य व कौशल्य 'सावधान संघा'च्या स्वयंसेवकांच्या अंगीं आहे कीं नाहीं त्याचा अनुभव त्यांनीं जरूर घ्यावा ! ( मोठा हशा ).

पुराणे वकिलांनीं राममंदिर कुणाच्या मालकीचं असा प्रश्न आपल्या कायदेबाज डोक्यांतून काढला आहे. त्यांनीं मनाई-हुकमासाठीं कोर्टाकडे अर्ज केला आहे. त्याचा निकाल कोर्ट कसा करील तें आज सांगतां येत नाहीं. परंतु मी इतकंच म्हणतों, कीं एका दृष्टीनं पाहिलं तर हें मंदिर माझ्या वडिलार्जित मिळकतीपैकीं असल्याकारणानं त्याची व्यवस्था माझ्या मताप्रमाणें करण्यास मी एकटा पूर्ण मुखत्यार आहे. आणि दुसऱ्या दृष्टीनं पाहिलं तर राम-मंदिर माझं नसून लोकांचं आहे—लोकांसाठीं आहे—हें मी मान्य करतों. मी त्या मंदिराचा विश्वस्त आहे, परंतु तें माझं एकट्याचं नसून लोकांचं आहे ! पण तें लोकांचं आहे म्हणूनच तें सर्व लोकांचं—स्पृश्य, अस्पृश्य सर्व हिंदूंचं, किंबहुना श्रीरामाची पूजा

करण्याची इच्छा उद्यां मुसलमान, यहुदी, पारशी यांना झाली तर त्यांचं देखील मानलं पाहिजे! या मंदिराचं नांव 'दर्शन्यांचा राम' असं आहे म्हणजे ज्यांना ज्यांना दर्शन घेण्याची इच्छा असेल त्या सर्व 'दर्शन्यां'चा हा राम आहे ना ! ( टाळयांचा गजर )

तेव्हां या मंदिराचं नांव सार्थ करण्यासाठींच तिथें अस्पृश्यांना मुक्तद्वार ठेवण्याचा मीं बेत केला आहे. या माझ्या निश्चयापासून मी विचलित होणं शक्य नाहीं. मी यांत हिंदुधर्माचा घात करीत नसून खरा हिंदु धर्म व खरी हिंदु संस्कृति यांवरचा एक कलंक पुसून टाकीत आहे. आणि हिंदूंचं सामाजिक आणि राजकीय बल ज्यायोगें वाढेल अशीच एक गोष्ट करीत आहे. ही माझी श्रद्धा आहे; माझ्या वाडवडिलांचे आत्मे या माझ्या कृत्यानं संतुष्टच होतील याबद्दल माझी खात्री आहे. माझ्या पितरांच्या सद्‌गतीला बाधक होईल असं कृत्य माझ्या हातून घडत आहे असा इशारा यज्ञमार्तंड गलगल्यांनीं मला दिला. माझ्या वाडवडिलांची स्तुति केल्याबद्दल व हा इशारा दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. परंतु मला त्यांना असं विचारावंसं वाटतं, कीं त्यांच्या स्वतःच्या पितरांना सद्‌गति मिळवून देण्याचं कार्य त्यांच्या शिरावर आधींच असतांना मज गरिबाच्या पितरांची उठाठेव त्यांनीं कशाला करावी ? माझ्या पितरांच्या आत्म्यांना सुख कशानं होईल तें माझं मला ठरवूं द्या कीं !"

हा टोला ऐकतांच सभेंत खूपच मोठा हशा झाला, व तें उपरोधिक वाक्य उच्चारून शरद्‌नं आपलं भाषणच संपविल्याचं लोकांच्या लक्षांत आलं तेव्हां टाळयांचा एकच गजर किती वेळ तरी होत राहिला.

तो गजर ऐकल्यावर यज्ञमार्तंड, वेद्यालंकार, पुराणे वकील

यांची छाती धडधडूं लागली. सभेपुढें मांडल्या जाणाऱ्या निषेधपर ठरावाचं नशीब त्यांना स्पष्टच दिसूं लागलं. तुम्ही शरदूला बोलायची परवानगी दिलीत त्याचा हा परिणाम अशा अर्थाची नजर त्यांनीं अध्यक्षांकडे टाकली. अध्यक्षांची अवस्था आधींच तोंडचं पाणी पळाल्यासारखी झाली होती व निषेधाचा ठराव सभेपुढें मांडण्याची कामगिरी कशी पार पाडावी या विवंचनेंत ते ठरावाचा कागद हातांतल्या हातांत चाळवीत होते. यज्ञमार्तंड, हंबरडे वैद्य इत्यादींनीं झाल्या प्रकाराबद्दल आपल्याला दोष द्यावा याचा मात्र अर्थ त्यांना कळेना. शरदूला बोलूं दिलं नसतं तर त्यानं बोलण्याचा हट्ट घेतला असता आणि सभा बहुतांशीं त्याच्या बाजूची असल्यामुळें शेवटीं त्याचाच विजय झाला असता इत्यादि गोष्टी ओळखून आपण जें केलं तें केलं, असं अध्यक्षांनीं त्या मंडळींना आपले खांदे हालवून व हातवारे करून सागण्याचा प्रयत्न केला. त्या मंडळींत चाललेली ती नेत्रपल्लवी आणि करपल्लवी ज्यांच्या लक्षांत आली ते श्रोते मोठमोठ्यानं हसूं लागले, व ते कां हसतात तें पाहण्यासाठीं भोंवतालच्या लोकांत थोडीशी गडबड झाली.

ती गडबड चालू असतांच अध्यक्ष उठून उभे राहिले व भाषण करण्याच्या भानगडींत न पडतां त्यांनीं फक्त निषेधाचा ठराव सभेपुढें मांडला.

ठराव नापास होणार हें उघडच दिसत होतं. परंतु अनुकूल मतांच्या वेळीं दीडदोनशेंच हात वर झाले, आणि प्रतिकूल मतांच्या वेळीं मात्र हजारों हातांचं दाट जंगलच उठल्यासारखं दिसलं, हें पाहतांच लोकांचा उत्साह अनावर झाला व त्यांनीं टाळ्यांचा गजर करून मोठमोठ्या आरोळ्याहि ठोकण्यास कमी केलं नाहीं.

त्या उल्हासांत आणि आरड्याओरड्यांतच सभा संपली, आणि

लोकांचे मोठमोठे लोंढेच्या लोंढे दोन्ही तिन्ही प्रवेशद्वारांनीं बाहेर पडूं लागले त्या वेळीं ज्याच्या त्याच्या तोंडून शरद्चं नांव निघत होतं.

गर्दी ओसरल्यावर मग घरीं जावं अशा विचारानं जरा बाजूस होऊन उभ्या राहिलेल्या श्यामाला लोकांच्या तोंडचे ते उद्‌गार ऐकूं येत होते. कुणी म्हणालं, 'पाहिलंत शरद् दर्शनेला किती अनुयायी आहेत ते'! कुणी म्हटलं, 'अहो उगीच का या सभेला हजर राहण्याचा बेत त्यानं केला; सभा जिंकण्याची खात्रीच होती त्याला पहिल्यापासून!', एक म्हणाला, 'भाषण मोठं बहारीचं केलं, नाहीं शरद्नीं? यज्ञमार्तंड, हंबरडे, पुराणे, सगळ्यांना अगदीं साफ लोळवून टाकलं!' दुसरा म्हणाला, 'शरद्नं कावा कसा केला तुझ्या लक्षांत आलं का? मिसाळांच्या व्याख्यानाच्या वेळेस सभा शांत करण्याच्या निमित्तानं त्यानं जें छोटं भाषण केलं त्या भाषणानंच आपला अर्धा अधिक कार्यभाग त्यानं साधून घेतला!' यावर पहिला हसला व उद्गारला, 'मोठा लबाड आहे शरद् हं!'...

शरद्चं सुंदर भाषण ऐकून व त्यानं सभा जिंकली हें पाहून त्याच्यांत व आपल्यांत उद्भवलेल्या अंतराची जाणीवच विसरल्यासारखं श्यामाला झालं होतं, आणि तिचं अंतःकरण शरद्बद्दलच्या अभिमानाच्या आनंदानं भरून आलं होतं. तिच्या अंगावरून जाणाऱ्या लोकांचे ते निरनिराळे उद्गार ऐकणं तिला फार सुखाचं वाटलं.

तशी ती किती वेळ उभी राहिली असती कोण जाणे. परंतु आपल्याच विचारांत गर्क होऊन ती ओसरत चाललेल्या गर्दीकडे पाहत असतांना कुणी तरी आपलं नांव घेऊन हाक मारली असं तिला वाटलं, तेव्हां तिनं वळून बघितलं.

बापू शेवडे तिच्यापुढें हसत उभा होता.

"...अरे! ..." येवढाच उद्‌गार तिच्या तोंडून बाहेर पडला, व तो भेटेल अशी कल्पना नसल्यामुळें वाटलेला विस्मय ओसरतांच ती त्याच्याकडे पाहून हसली.

"कशी झाली सभा?" तो विचारीत होता.

"उत्तम!" असं म्हणतांना तिचे ओठ किती प्रसन्नतेनं दूर झाले, अन् तिच्या तेजस्वी नेत्रांत केवढी मनोहर चमक दिसली! जणूं ती मनाशीं म्हणाली, शरद्‌च्या गुणांचं कौतुक माझ्याइतकं तुम्ही त्याचे निकटवर्ती स्नेही देखील करूं शकणार नाहीं!

"तुम्ही होतां कुठें इतके दिवस?" बापूनं विचारलं.

"इथेंच होतें कीं."

"मग अजीबात आलाच नाहींत कचेरींत?"

"उद्यां येणार आहे." ती चटकन म्हणाली.

"सांगूं का शरद्‌ला?—"

"त्यांनीं चौकशी केली माझी?"

"होय. दोन तीनदां म्हणाला तो, कां येत नाहींत—"

शरद्‌नं तिला आपल्या मनांतून अजीबात काढून टाकलं नव्हतं तर! ... मग आतां तिनं आपल्या मनाशीं जो नवा बेत केला होता त्याप्रमाणें वागायला कांहींच हरकत नव्हती! ... तिचा ऊर आनंदानं भरून आला. ती हसली, आणि अर्धवट स्वतःशींच बोलल्याप्रमाणें तिनं मघांचेच शब्द पुन्हा उच्चारले,

"उद्यां येणार आहे."

"या या." बापू शेवडे म्हणाला, "केव्हां येतां? दुपारीं कदाचित् आम्ही कचेरींत असूं नसूं. सकाळीं मात्र खास आहोंत. रामनवमीच्या दिवशीं मोठा हातघाईचा झगडा होणार हें उघड

आहे. तेव्हां कशी कशी तयारी करायची याचा विचार करायसाठीं उद्यां सकाळीं नऊ वाजतां शरद्‌नं बैठक बोलावली आहे."

" होय? मग उद्यां नऊ वाजतां मी हजर आहे असं समजा."

" अवश्य या." तो दूर होऊं लागला, पण पुन्हा वळून त्यानं विचारलं, " आत्तां शरद्‌ला भेटणार का? तो पाहा तिकडे व्यासपीठावर— "

" नको." ती म्हणाली, " उद्या मात्र खचित येईन हं."

बापू शेवडे मग व्यासपीठाकडे लगबगीनं गेला, आणि आतां अगदीं मोकळया झालेल्या प्रवेशद्वारानं श्यामा बाहेर पडली.

ती स्वतःशीं हसत होती.

शरद्‌च्या या नव्या चळवळींत अगदीं प्रामुख्यानं भाग घेऊन त्याला साहाय्य करण्याचा तिनं निश्चय केला होता. स्वतःची उपयुक्तता व शक्ति त्याला पटवून देण्याचं तिनं ठरविलं होतं. स्त्री पुरुषाच्या मार्गांतील धोंड होय अशा कल्पनेनं प्रेमांत न सापडण्याची त्याची प्रतिज्ञा होती काय? ठीक, स्त्रीचं प्रेम पराक्रमी पुरुषाला किती साहाय्यक होऊं शकतं याची जाणीव त्याला करून देण्याची, व अखेर त्याचं मन जिंकण्याची प्रतिज्ञा तिलाहि करतां येत होती!

झपाझप पावलं टाकणाऱ्या श्यामाकडे त्या वेळीं कुणी निरखून पाहिलं असतं तर त्याला खचित वाटलं असतं, कोणत्या गुप्त निश्चयाचा उल्हास या तेजस्वी देखण्या मुलीच्या अंतःकरणांत मावेनासा झाला आहे!

# १५

त्या आवाजामुळें ती जागी झाली, कीं ती जागी झाली म्हणून ते आवाज तिला ऐकूं आले याचा निर्णय तिला करतां येईना. जागं होण्यापूर्वी तिला जें स्वप्न पडत होतं त्यांतलाच तो गोंगाट असावा असं तिला क्षणभर वाटलं होतं. पण तसं नव्हे असं लक्षांत येतांच तिनं डोळे किलकिले करून उघडले होते. बखळीकडल्या उघड्या खिडकींतून अरुणोदयाचा धूसर प्रकाश खोलींत शिरलेला तिला दिसला, व पहाटेची गार झुळूक येऊन तिच्या अंगाला स्पर्श करीत म्हणाली, ऊठ कीं. पण चादर अधिक-च लपेटून घेऊन तिनं पुन्हा डोळे झाकले. मघांचं तें स्वप्न तिला नक्की आठवत नव्हतं. पण तें फार सुखदायक होतं येवढं तिला अंधुक स्मरत होतं. तें पुन्हा सुरू व्हावं म्हणून तिनं प्रयत्न केला, परंतु भित्र्या पाखराप्रमाणें तें जागृतीचा स्पर्श होतांच उडून गेलं तें गेलंच. तें पुन्हा येईना. तो गोंगाट मात्र तिला अधिक स्पष्ट ऐकूं येऊं लागला. झांजा वाजत होत्या, टाळ्या वाजत होत्या,

झिंगटावर टोले पडत होते, अन् "रामा होऽऽ दाशरथे!" असे घोषहि चालू होते.

शेजारच्या राममंदिरांत काकड आरती चालू असली पाहिजे.

अंगावरची चादर दूर टाकून श्यामा उठली, आणि खिडकी· जवळ जाऊन दुमडलेल्या हातांवर रेलून उभी राहिली. रोज ती उठे तेव्हां तिच्या अंगावर उन्हं आलेलीं असत, त्यामुळें प्रातःकाळच्या या पहिल्या प्रहराचं स्वरूप पूर्वीं कधीं तिच्या दृष्टीस पडलं नव्हतं. ती वृत्तीनं मोठी भाविक होती असं नव्हे, तथापि बखळींतलीं तीं झाडं, त्यांच्या पर्णराजींना मंद झोके देणाऱ्या वायुलहरी, रात्रीच्या विश्रांतीच्या झाडांवरच्या जागा सोडून किलबिल करीत उठून उडून जाणारे पक्षी, अशा त्या शांत वातावरणावर मंदिरांतल्या त्या आरतीमुळें कसल्या तरी पावित्र्याचं आवरण पसरल्यासारखं तिला वाटलं. ती कांहीं वेळ तशीच उभी राहिली. तिकडे मंदिरांत एक आरती संपली, जयघोष झाला, आणि दुसरी आरती सुरू झाली. "युगें अठ्ठावीस विटेवरी उभा!..." श्यामाला लहान· पणीं पाठ केलेल्या आरत्या आठवल्या, व ती मनाशीं आश्चर्य करून म्हणाली, ही तर विठ्ठलाची आरती ना? राममंदिरांत ही म्हटली जाते?... असेलहि... तिला या बाबतींत फारशी माहिती नव्हती. देवळांत जाऊन आरती ऐकण्याची हौस तिला कधीं वाटली नव्हती.

तिच्या एकदम मनांत आलं, आज बुधवार, षष्ठीचा दिवस, नव्हे काय? आतां रामनवमीला अवघा तीनच दिवसांचा अवकाश उरला होता. शनिवारीं रामजन्माचा उत्सव होणार, आणि अस्पृश्यांना मंदिर खुलं होणार. त्या प्रसंगाची सर्व प्रकारची तयारी करण्यांतच शरद् सध्यां गुंतलेला होता, आणि गेले चार

दिवस तिनं त्या कामीं रात्रंदिवस खटपट केली होती. होय, ती शरद्च्या प्रमुख सहकाऱ्यांपैकीं एक पूर्णत्वानं झाली होती! स्वतः शरद्नं ही गोष्ट मान्य केली होती! सहज बोलतां बोलतां निघालेले त्याचे कित्येक उद्गार तिनं आपल्या स्मृतींत साठविले होते!

शरद्च्या चळवळींत भाग घेऊन आपल्या कर्तृत्वाविषयीं त्याची खात्री पटविण्याचं मनाशीं ठरविल्यावर पहिली गोष्ट तिनं केली होती ती ही कीं, शहरांतल्या निरनिराळ्या भागांत बायकांच्या सभा भरवून अस्पृश्यांना मंदिरप्रवेश देण्याबद्दल अनुकूल ठराव त्या प्रत्येक सभेंत तिनं पास करून घेतला होता. शहरांतल्या साधारण सुशिक्षित व पुढारलेल्या स्त्रियांचा पाठिंबा शरद्च्या योजनेला तिनं मिळवून दिला होता. सोमवारीं तिसऱ्या प्रहरीं ती 'प्रतिज्ञा' कचेरींत गेली तेव्हां पंधरा वीस मिनिटंच तिथं बसल्यावर ती उठली व म्हणाली,

"बरं, मी जातें आतां."

शरद् हसून म्हणाला होता, "कां घाई कसली?"

"सभा घेतली आहे."

"आत्तां?"

"हो, चार वाजतां. सेवासदनांतल्या बायकांची सभा ठरविली आहे. अन् मग सहा वाजतां रास्ता पेठेंत—"

"हं! म्हणजे अगदीं जवाहरलाल नेहरूंप्रमाणें झंझावाती प्रचार सुरू केलाय म्हणायचा तुम्हीं?"

"हा उपहास कीं स्तुति समजायची मीं?" असं विचारतांना तिच्या ओठांवर जरी थोडंसं हास्य दिसलं होतं तरी तिच्या दृष्टींत गांभीर्य भरलेलं होतं.

तें पाहून शरद् चटकन् म्हणाला होता, "छे छे, उपहास बिलकुल नाहीं. तुम्ही किती उत्साहानं काम करीत आहांत आणि तुमची मला केवढी मदत होत आहे तें मला स्पष्ट दिसत आहे. तुम्ही प्रत्येक सभेंत इतकं सुंदर भाषण करतां असं मीं ऐकलं आहे, कीं तुमच्या या सभांविरुद्ध तुमच्याजवळ तक्रार करायची आहे मला."

त्याच्या त्या बोलण्याचा रोख लक्षांत न आल्यामुळें किंचित् गोंधळून श्यामानं विचारलं,

"तक्रार? ती कशासाठीं?"

"ती अशासाठीं कीं तुमच्या या सभा फक्त बायकांसाठीं असतात, अन् त्यामुळें तुमचं भाषण ऐकायची संधि आम्हांला मिळत नाहीं. तुम्ही यायच्या आधीं मी आणि बापू याबद्दलच बोलत होतों, तेव्हां मीं त्याला म्हटलं आपण गेलों खुशाल बायकांच्या सभेंत तर काय होईल?".

त्याच्या बोलण्यांतला खोडकरपणा उचलून ती म्हणाली होती,

"काय होईल? हाकून दिलं जाईल, समजलांत? केवळ बायकांसाठीं भरलेल्या सभेंत पुरुषांनीं यायचं म्हणजे काय?

"वा! म्हणजे आम्ही पुरुष तुमच्या दृष्टीनं अस्पृश्यच म्हणायचे!"

श्यामा मान वेळावीत म्हणाली, "हो हो अस्पृश्यच, आणि या अस्पृश्यतेचं निवारण आमच्याकडून होईल अशी उगीच आशा बाळगूं नका."

"नशीब!" असं म्हणून त्यानं आपलं बोट कपाळाच्या मधोमध टेकलं होतं, व त्याचा तो गांभीर्याचा नाटकी आविर्भाव पाहून ती मोठ्यांदा हसली होती.

मनांतल्या मनांत ती म्हणाली होती, तुम्ही इतके विनोदी असाल अशी नव्हती कल्पना!

त्या दिवशीं रात्रीं रास्ता पेठेंतील सभा उरकून ती घरीं आली तेव्हां बापू शेवडे तिची वाट पाहत बसला होता. तो तिला म्हणाला,

. "एक आनंदाची बातमी तुम्हांला कळविण्यासाठीं शरद्‌नं मुद्दाम मला पाठविलं आहे."

हातांतली बॅग टेबलावर टाकून उभ्याउभ्याच ती म्हणाली "सांगा लवकर."

"सनातनी लोकांनीं मनाईहुकूम मिळावा म्हणून अर्ज केला होता ना, तो कोर्टानं फेटाळून लावला!"

टाळी वाजविल्यासारखं करून श्यामा म्हणाली,

"होय? शाबास. म्हणजे पहिली चकमक जिंकली म्हणायची आपण."

"अगदीं हेच उद्‌गार शरद्‌नं काढले निकाल कळल्याबरोबर अन् तो मला म्हणाला आधीं त्यांच्याकडे जा."

श्यामानं चटकन् विचारलं, "त्यांना कां नाहीं घेऊन आलांत?" मात्र तो प्रश्न तोंडांतून गेल्यावर तिला वाटलं, उगीच विचारलं आपण. कारण तिच्या कामाची प्रशंसा करण्यांत शरद् मुळींसुद्धां कसूर करीत नव्हता हें जसं तिला स्पष्ट दिसूं लागलं होतं, त्याप्रमाणेंच तो एकदम सारं दूरत्व सोडणार नाहीं हेंहि समजण्याइतका तिनं त्याचा स्वभाव ओळखला होता.

बापू तिचा निरोप घेण्यासाठीं उभा राहिला होता. तो म्हणाला,

" त्याला काम फार असतं तेव्हां मीं नाहीं त्याला म्हटलं चल म्हणून. पण तुम्हांला बजावायला त्यानं मला सांगितलं आहे कीं उगीच फार श्रम करूं नका."

श्यामा हसली व म्हणाली " जें घडवून आणायचं मीं योजलं आहे त्यासाठीं कितीहि श्रम पडले तरी मला त्याचा त्रास होणार नाहीं."

" काय योजलं आहांत ?"

तिनं मान हलवली व डोळे मिचकावून म्हटलं, " इतक्यांत सांगायचं नाहीं."

बापूनं हसून म्हटलं, " तरी पण ? मला सांगा कीं, शरद्‌ला चकित करायचा तुमचा बेत असेल तर वाटल्यास मी त्याला कळूं देणार नाहीं."

" वा ! म्हणजे त्यांच्याविरुद्ध तुम्हीं न् मीं कट करायचा होय ?"

" कट राहूं द्या. पण सांगा ना काय योजिलं आहांत तें."

श्यामा म्हणाली, " सांगूं ? तुम्ही उत्सवाच्या दिवशीं अस्पृश्यांच्या स्त्रियांनाहि घेऊन येणार आहांत ना ? मीं असा बेत केलाय कीं निदान शेंपन्नास तरी सुशिक्षित स्त्रिया उत्सवाला आणायच्या, आणि स्पृश्य-अस्पृश्य अशा साऱ्या स्त्रियांनीं मिळून रामाच्या पाळण्याला झोके द्यायचे ! कशी काय आहे माझी कल्पना ?"

" वा, वा ! अतिशय चांगली कल्पना आहे. शरद्‌ला सांगितली कीं तो—"

एकदम हात हालवून श्यामा म्हणाली, " हं हं त्यांना नाहीं सांगायची हं. निदान आज नको. माझ्या कल्पनेप्रमाणें तयार होणाऱ्या बायकांचीं नांवं मी नोंदून घेतें आहे. ही माझी यादी चांगली भरगच्च झाली कीं, मग सांगायचं त्यांना."

"माझी खात्री आहे कीं तुम्ही मनांत आणाल तें करून दाखवाल." असं म्हणून बापूनं तिचा निरोप घेतला होता.

काल मंगळवारचा सबंद दिवस तिनं कामांत घालविला होता. शहरांतल्या सार्वजनिक कामांत नेहमीं भाग घेणाऱ्या दोन तीन स्त्रिया व शाळाकॉलेजांतल्या कांहीं विद्यार्थिनी तिला मदत करण्यास तयार झाल्या होत्या, व निरनिराळ्या पेठा वाटून घेऊन सगळ्यांनीं घरोघर फेरी काढली होती. त्यांची ती फेरी पुष्कळच यशस्वी झाली होती. श्यामाच्या यादीवर आतां तीस पसतीस नांवं लिहिलीं गेलीं होतीं, अन् उरलेल्या तीन दिवसांत हीं नांवं तिपटीनं वाढतील असा विश्वास धरायला हरकत दिसत नव्हती. काल एका घरांत तर श्यामाला फार गमतीचा अनुभव आला होता.

त्या घरांतली बाई पासष्ट वर्षांची म्हातारी होती. तिला पाहिल्यावर श्यामाला वाटलं होतं हिला कुठलं पटायला आपलं म्हणणं! आल्या पावलीं परतावं हें चांगलं. पण अगदीं चिकट मिशनऱ्याप्रमाणें वागायचं तिनं ठरवलं असल्यामुळें ती परतली नाहीं. इतर घरीं ती जसं बोलली तसंच या म्हातारीजवळहि ती बोलत राहिली. आणि आश्चर्य असं कीं, म्हातारीनं तिला प्रतिपादलं तर नाहींच, पण तिचं सारं बोलणं ऐकल्यावर ती म्हणाली,

"फार चांगलं करते आहेस बाई तूं. अग, देवाच्या देवळांत चांडाळ सुद्धां पवित्रच होतो. कुठल्या शास्त्रांत सांगितलंय अमक्याला देवळांत येऊं द्यावं अन् अमक्याला येऊं देऊं नये म्हणून! अग, रामानं तर शबरीचीं उष्टीं बोरं खाल्लीं होतीं!"

श्यामाला फार कौतुक वाटलं त्या म्हातारीच्या बोलण्याचं; आणि उत्सवाला यायचं तिनं कबूल केलं तेव्हां तर श्यामाला वाटलं,

या वृद्धेचं एक नांव सुशिक्षित स्त्रियांच्या शंभर नांवांच्या किंमतीचं होतं.

निरोप घेतांना मोठ्या आनंदानं अन् आदरानं तिनं वाकून नमस्कार केला, तेव्हां म्हातारी म्हणाली,

"तूं फार चांगलं काम करते आहेस. ये हं. दर्शन्यांचा राम मोठं जागतं दैवत आहे. तुझी ही सेवा फुकट जायची नाहीं. लवकरच तुला मनाजोगा नवरा मिळून तुझे हात चुड्यांनीं भरतील. ये!"

या म्हातारीची गोष्ट शरद्ला केव्हां सांगूं असं झालं होतं तिला. अर्थात् तिचा तो आशीर्वाद सांगण्यासारखा नव्हता. पण...

या साऱ्या आठवणींत श्यामा इतकी दंग होऊन गेली कीं, आरतींची गडबड केव्हां शांत झाली, अन् बखळींत सूर्याचीं किरणं केव्हां पसरलीं तें तिच्या लक्षांतहि आलं नाहीं.

"हें काय! आज इतक्यांत उठलीस! असे शब्द तिनं ऐकले तेव्हां ती आपल्या विचारांतून जागी झाली, व तिनं वळून पाहिलं.

उषा उठून आपल्या खोलींतून बाहेर येऊन खालीं निघाली होती.

"झालें खरी जागी! कशी कुणास ठाऊक!" असं म्हणून ती बहिणीजवळ गेली, व मग जिना उतरतां उतरतां ती म्हणाली, "चहा पाहिजे बाई अक्का लवकर."

स्नान आटोपून वर जातां जातां श्यामानं पाहिलं तों चांगले नऊ वाजायला झाले होते. 'अगबाई' असं स्वतःशीं उद्गारून ती उषाक्काला म्हणाली,

" मला गप्पा मारण्यांत तूं गुंतवलंस बरं का. वास्तविक आज मी खूप लवकर उठलें तेव्हां मनाशीं म्हटलं होतं आज आठ वाजतां बाहेर पडायचं, पण शेवटीं रोजचीच वेळ आली."

उजव्या हातांत पोलकं धरून अर्धवट ओल्याच अंगाभोंवतीं साडीचा पदर डाव्या पंजानं लपेटून उभ्या राहिलेल्या श्यामाच्या चेहऱ्यावर आणि केसांवर स्नानाच्या पाण्याचे ओघळ अजून तसेच होते त्यांकडे पाहत उषाक्का म्हणाली,

" शाबास! शरद्नीं असं केलं अन् शरद्नीं तसं केलं अशी बडबड करतांना भान विसरलीस तूं; अन् आतां मलाच म्हणतेस काय कीं—"

" चल चल!" असं म्हणून श्यामा वर पळाली. तिनं खोलीचं दार लावून घेतलं अन् कपडे करण्यास आरंभ केला. आतां दोन अडीच तास ती बाहेर हिंडणार होती, आणि घरीं परत येण्यापूर्वी शक्य तर 'प्रतिज्ञा' कचेरींत जाऊन तिथें शरद् भेटला तर पाहणार होती.

आरशापुढें उभं राहून ती केसांवरून फणी फिरवीत होती तों बाहेरून दारावर टिचक्या वाजल्या, व 'ताई' अशी उषाक्काची कुजबुजल्यासारखी हाक तिला ऐकूं आली.

हातांत कंगवा तसाच धरून दाराशीं येऊन तिनं विचारलं " काय ग ?"

पुन्हा हळू आवाजांत उषाक्का म्हणाली " दार उघड."

" कां ?"

" शरद् आले आहेत."

" अगबाई !" असा उद्गार श्यामाच्या तोंडून बाहेर पडला. तो आज या वेळीं येईल अशी तिला यत्किंचित् सुद्धां कल्पना नव्हती.

मात्र तिच्या उद्गारांत केवळ येवढ्याबद्दलचा विस्मयच नव्हता; त्यानं आपल्याकडे यावं ही तिची फार दिवसांची इच्छा पूर्ण झाल्याच्या आनंदामुळें तिच्या मनाचा एकदम गोंधळ उडून गेला होता. तिनं दार उघडलं, हातांतील फणी ठेवून दिली, टेबलावरचा पसारा आवरला, आणि त्याच्यासाठीं खुर्ची नीटनेटकी मांडून तिच्यावरची गादी ती झटकत होती तोंच दारांतून त्यानं विचारलं,

" येऊं का ? काय चाललं आहे ? "

तिनं फक्त हसून त्याच्याकडे पाहिलं.

खुर्चीवर बसण्यापूर्वीं खिडकीजवळ उभं राहून बाहेर पाहत तो म्हणाला,

" आमच्या बखळीला इतकं लागून आहे तुमचं घर ! "

'होय या खिडकींतनंच तुम्हांला कवायत घेतांना मीं प्रथम पाहिलं' असे शब्द श्यामाच्या अगदीं ओठांवर आले होते. पण ती कांहीं बोलली नाहीं. तिनं नुसती मान हालविली.

मग खुर्चीवर बसतां बसतां खिशांतला एक लखोटा काढून त्यानं विचारलं.

" हें कुणाचं पत्र असेल ? ओळखतां येईल का तुम्हांला ? "

" हो, त्यांत काय अवघड आहे ? ज्या पत्राची आपण वाट पाहत आहोंत तेंच असणार हें. महात्मा गांधींना राममंदिराबद्दलची सारी हकीकत कळवून त्यांचा संदेश तुम्हीं मागविला तो आलेला असणार खास. होय ना ? "

शरद्नं मान हालवून हास्य केलं व लखोट्यांतील कागद काढून तिच्या हातीं दिला.

गांधींच्या हातचं पत्र आपल्याला आज वाचावयास मिळत

आहे या भावनेमुळें, आणि अक्षरहि विशेष सुबोध नसल्यामुळें श्यामा एकेक शब्द सावकाश मोठ्यांदा उच्चारीत मजकूर वाचूं लागली—

"मैं अिस बात को देख फूला नहि समाता कि आपने अपने राममंदिर में हरिजनों को प्रवेश करने देना तय किया है। मैं आप को और आप के सहकारियों को हार्दिक बधाअी देतां हूँ!"

श्यामानं तो मजकूर पुन्हा एकदा वाचला व वाचतांना जे शब्द तिला अपरिचित होते ते स्वतःशींच पुनः पुन्हा उच्चारल्या-सारखे केले. शेवटच्या वाक्यांतील 'हार्दिक बधाई' हे शब्द तिला जरा गंमतीचे वाटले, आणि पत्राची घडी करून शरद्पुढें धरून ती हसत म्हणाली,

"हं, सांभाळा आपली हार्दिक बधाई"

शरद् म्हणाला "वा, ही हार्दिक बधाई कांहीं माझी एकट्याची नाहीं. तुमचीदेखील आहे."

"ती कशी?"

"नीट वाचा कीं, गांधींनीं लिहिलंय तुमचं आणि तुमच्या सहकाऱ्यांचं मी अभिनंदन करतों."

"पण तुमच्या सहकाऱ्यांत माझी होते का गणना?" श्यामानं मुद्दामच खवचटपणानं विचारलं. तिच्या मनाला हवे ते शब्द त्याच्या तोंडून वदविण्याची इच्छा त्या क्षणीं एकदम तिच्या मनांत उद्भवली होती.

शरद् म्हणाला, "वा, वा, असं कसं म्हणतां? तुमची गणना नाहीं होत तर कुणाची होते? किंबहुना या चळवळींत तुमच्या-इतकं मोलाचं सहकार्य मला दुसऱ्या कुणाकडूनच मिळालेलं नाहीं.

गांधींचं हें पत्र उघडल्याबरोबर तें दाखवायला आधीं तुमच्याकडे आलों यावरून—"

तें वाक्य त्यानं पुरं केलं नाहीं. परंतु तो पुढच्या शब्दांसाठीं घोटाळला यांतच मोठा अभिप्राय होता, व श्यामाला सध्यां तेवढा पुरेसा होता. त्याची प्रतिज्ञा खोटी करण्यासाठीं तिनं जें नाजुक युद्ध आरंभिलं होतं त्यांतली पहिली फेरी ठीक झडली होती तर!

ती हसून म्हणाली, "ठीक ठीक. गांधींनीं धाडलेल्या या हार्दिक बधाईचा वाटा माझ्या हक्काचा आहे म्हणायचा! तो तुमच्याकडून घेतांना मला फार आनंद होतो. हिंदींत कसं म्हणायचं, 'फूले नहि समाता'—असंच ना?"

"फूले नाहीं. फूला नहि समाता!" तिची चूक दुरुस्त करून शरद् मोठ्यानं हसला.

"बरं फूला नहि समता! ही हिंदीची भानगड कांहीं नीट जमत नाहीं मला!"

ती मनापासून हसली, व मग दाराकडे वळून म्हणाली, "चहा आणतें अं. घेणार ना?"

त्यानं नुसतं हास्य करून रुकार दर्शविला; परंतु त्या वेळच्या त्याच्या दृष्टींत जो भाव दिसला तो अगदीं नवीन होता, अन् तो कितीहि संकोचानं त्याच्या नेत्रांत तरळत असला तरी तिच्या शोधक नजरेंतून तो सुटण्यासारखा नव्हता.

इतक्या हर्षभरानं ती खालीं गेली कीं रॅकवरच्या कपबशा तिनं भराभर काढल्या तेव्हां उषाक्का म्हणाली,

"अग फोडतेस कीं काय कपबशा? जरा हळू!"

'वेडे! तुला काय माहीत?...' श्यामा मनाशीं म्हणाली.

तिनं स्टोव्ह जोरानं पेटविला, अन् त्याच्या ज्योतीच्या फवाऱ्याचा मोठा आवाज ऐकत ती मनाशीं विचार करूं लागली. तिच्या श्रमांचं मोल तिला मिळालं होतं. आतां उरलेल्या तीन दिवसांत इतकी प्रचंड खटपट करायची कीं उत्सवानंतर साऱ्या जगानं म्हणावं, श्यामा होती म्हणून उत्सव इतका यशस्वी रीतीनं पार पडला... मग शरद्‌ला विचारूं आपण, स्त्रीचं प्रेम म्हणजे पुरुषाच्या मार्गांतली धोंडच वाटते का अजून ?...

# १६

रामनवमीच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे रविवारीं सकाळच्याच गाडीनं कांहीं कामासाठीं शरद्‌ला मुंबईस जावं लागलं होतं. मंगळवारीं सकाळच्या एक्सप्रेसनं तो परत निघाला. तो बरीशी जागा पाहून आपलं सामान बाकावर ठेवीत असतां त्या बाकावर आधींच बसलेल्या एका इसमाच्या हातांतल्या वर्तमानपत्रांतला मोठमोठ्या टाइपांतला मथळा त्याच्या दृष्टीस पडला.

## दर्शन्यांचें राममंदिर अस्पृश्यांना खुलें झालें !

शनिवारच्या उत्सवाची हकीगत आज वृत्तपत्रांत आली होती तर !

शरद् खालीं उतरला, आणि मिळालीं तेवढीं सर्व वर्तमानपत्रं घेऊन परत आपल्या जागेवर येऊन बसला. त्यानं डब्यांत इकडे तिकडे पाहिलं तों किती तरी उतारूंनीं वर्तमानपत्रं उघडून डोळयां-समोर धरलीं होतीं. वाचतां वाचतां मध्येंच ती मंडळी शेजारच्या माणसांजवळ कांहीं उद्गार काढीत त्यावरून आपल्या राममंदिरां-

तल्या उत्सवाच्या हकीगतीच ते सारे लोक वाचीत होते असं शरद्च्या लक्षांत आलं. गाडी सुरू झाल्यानंतर वर्तमानपत्रं चाळून पाहण्यास त्यानं प्रारंभ केला.

टाइम्स, क्रॉनिकल, फ्री प्रेस इत्यादि इंग्रजी वर्तमानपत्रांनींहि दर्शन्यांच्या राममंदिरांतील उत्सवाच्या बातमीला बरंच प्रमुख स्थान दिलं होतं. पण दहा वीस ओळींपलीकडे त्यांनीं त्या उत्सवाची हकीगत दिली नव्हती. पुण्यामुंबईच्या मराठी वृत्तपत्रांत मात्र ज्याच्या त्याच्या खास बातमीदाराकडून आलेले सविस्तर वृत्तान्त छापलेले त्याला आढळले. तो एकेका वृत्तपत्रांतली हकीगत सावकाश वाचून पाहूं लागला.

प्रथम जें पत्र त्यानं उघडलं त्यांतल्या वृत्तांतांत जागोजाग त्याची प्रशंसा केली होती. 'शरद् दर्शने यांची अप्रतिम व्यवस्था', 'शरद्चें हृदयस्पर्शी भाषण', 'शरद् किती लोकप्रिय आहे त्याचें स्पष्ट चिन्ह', असे शब्दप्रयोग त्यांत जिकडे तिकडे पसरलेले होते व 'उत्सवासाठीं जमलेले हजारों लोक शरद् दर्शने यांच्या धाडसी उपक्रमाचें कौतुक करीत व त्यांच्या कुशल नेतृत्वाचीं स्तुतिस्तोत्रें गात घरोघर परतले' अशा प्रकारें त्याचा समारोप केला होता.

ती हकीगत वाचून शरद्ला बरं वाटलं नाहीं. त्यानं नाराजीनंच हातांतलं तें पत्र दूर टाकलं. मग दुसरं उघडून त्यानं त्यांतल्या रिपोर्टाचा शेवटचा भाग आधीं वाचला.

" ...या चळवळीच्या निमित्तानं, अन् प्रत्यक्ष उत्सवाच्या दिवशीं शरद् दर्शने यांनीं आपल्या मनाचा जो खंबीरपणा दाखविला, आपल्या अनुयायांची प्रभावी संघटना तयार करण्याचं जें चातुर्य प्रगट केलं, आणि अवघ्या दहा दिवसांच्या अवधींत रात्रंदिवस परिश्रम करून पुण्यनगरीच्या स्मरणांतून सहसा जाणार

नाहीं असा रामजन्मोत्सवाचा अपूर्व सोहळा घडवून आणण्यांत समाजसेवेची जी विलक्षण कळकळ..."

"हं:!" असा उद्गार काढून शरद्‌नं तें पत्र टाकून दिलं!

शरद् दर्शने या नांवाच्या गृहस्थाला तो पूर्णपणें ओळखीत होता. त्याच्या अंगीं खरोखर कोणते गुण किती प्रमाणांत होते व उत्सवाच्या बाबतींत त्याची कामगिरी किती होती, हें त्याला ठाऊक होतं. शरद्‌ची प्रशंसा वाचण्याची त्याची इच्छा नव्हती. ज्या व्यक्तीच्या बहुमोल साहाय्याबद्दल त्याच्या मनांत मोठी कृतज्ञता उत्पन्न झाली होती, व जिच्या कामाविषयीं गौरवपर उद्गार इतरांनींहि काढलेले ऐकण्याची उत्सुकता त्याला वाटत होती, ती व्यक्ति निराळीच होती.

त्यानं तिसरं पत्र उघडलं, अन् त्यांत दिलेल्या हकीगतीवरून धावती नजर टाकतांना जेव्हां त्याला हवं तें नांव बरेच ठिकाणीं दिसलं तेव्हां ती समग्र वाचायला त्यानं सुरुवात केली—

"...दर्शन्यांच्या राममंदिराजवळ प्रातःकालच्या पहिल्या प्रहरापासूनच कोणत्या प्रकारचें वातावरण तयार झालें होतें त्याची कल्पना आतांपर्यंत केलेल्या वर्णनावरून वाचकांना आली असेलच. परंतु या वातावरणांत विशेषच चैतन्य जिच्यामुळें निर्माण झालें ती गोष्ट आम्हीं अजून सांगितली नाहीं. यज्ञमार्तंड गलगले, हंबरडे वैद्य, पुराणे वकील वगैरे सनातन्यांचे पुढारी जातीनें हजर राहण्याऐवजीं ऐनवेळीं घरीं लपून बसल्यामुळें त्यांचा सत्याग्रह म्हणजे एक फुसका बारच ठरला. सुमारें नऊ वाजतां दहा पांच लोक हातांत काळीं निशाणें घेऊन आले, "स्पृश्य हिंदूंनो, आपल्या हक्कांना जागा!" "मंदिर खोलना हराम हय!" असे जयघोष पुटपुटत

मंदिराच्या दरवाजापुढें येरझारा घालीत हिंडले, आणि आपली कींव करून हसण्यापलीकडे रस्त्यावरच्या प्रचंड गर्दीतले हजारों लोक अगर सावधान संघाचे स्वयंसेवक आपली दखलगिरीदेखील घ्यायला तयार नाहींत असें उमजल्यावर ते आले तसे निघून गेले ! हा प्रकार झाल्यानंतर वातावरणांतला क्षुब्धतेचा भाग शिल्लक उरलाच नाहीं. पावित्र्य व गांभीर्य तेवढें राहिलें. मंदिराच्या द्वारावरचा चौघडा झडत होता, सनईच्या जोडीचे उंच मधुर आलाप सतत निघत होते, दवण्याचा उग्र प्रसादगंध हवेंत दरवळला होता, मंदिरांत जाणाऱ्या व दर्शन घेऊन येणाऱ्या स्त्री-पुरुषांची सारखी रीघ लागून राहिली होती. जन्मोत्सव पाहण्यासाठीं थांबून राहिलेल्या लोकांनीं सभामंडप व देवळाचें आवार नुसतें फुलून गेलें होतें !

आणि अशा या उल्हासांत व गांभीर्यांत नवीनच चैतन्याची भर टाकणारी एक गोष्ट सुमारें अकरा वाजतां घडली.

ती अशी कीं जणूं इशारा दिल्याप्रमाणें नगाऱ्याची टिपरी एकदम बदली, झांजा जोरांत वाजल्या, कर्णे फुंकले गेले; व हें सारें कशाकरतां म्हणून लोक चमकून पाहतात तों—

सुमारें दोनशें स्पृश्यास्पृश्य स्त्रियांचा मोठा थवा मंदिराच्या प्रवेशद्वारापाशीं येऊन थडकला. या थव्याच्या अग्रभागीं एक तरुण तेजस्वी श्यामल स्त्री होती. तिचें नांव श्यामा..."

होय, तिचं नांव श्यामा ! तरुण, तेजस्वी, श्यामल... !

शरद्ला तिच्या मुद्रेवरचं त्या वेळचं सात्त्विक तेज अजूनहि स्पष्ट आठवत होतं. तिच्याकडे त्यानं हसत दृष्टि टाकली होती. तिनंहि किंचित् हास्य केलं होतं. मग चटकन वळून त्यानं स्वयंसेवकांच्या मुख्याला खूण केली होती, व त्याची शिटी वाजल्याबरोबर दहा

स्वयंसेवक पुढें होऊन देवळांतली गर्दी फोडूं लागले होते, व श्यामानं आपल्या बरोबरच्या स्त्रियांना घेऊन आंत प्रवेश केला होता!...

कांहीं वेळ हातांतलं वृत्तपत्र दूर करून उत्सवांतल्या नंतरच्या गोष्टी शरद् आपल्या मनाशीं आठवत राहिला. त्या आठवणी त्याला फार सुखाच्या वाटत होत्या... प्रत्यक्ष रामजन्माची घटका जवळ आली तेव्हां त्यानं छोटंसं भाषण केलं होतं. ध्वनिक्षेपक यंत्राची व्यवस्था केल्यामुळें देवळांत अफाट गर्दी झाली असूनहि लोक अगदीं शांत होते. त्यानं भाषण संपविलं तेव्हां जवळच असलेली श्यामा त्याला हळूच म्हणाली होती,

"किती सुंदर बोललांत!"

आणि ते शब्द ध्वनिक्षेपकांतून साऱ्या लोकांना स्पष्ट ऐकूं गेले होते. बोलून चालून तें यंत्र! त्याला कोठून तारतम्य असणार? दुसरी एखादी स्त्री असती तर आपले खाजगी शब्द सगळ्यांनीं ऐकले हें पाहतांच चपापली असती, गोंधळली असती, लाजली असती. श्यामानं तसं कांहीं एक केलं नाहीं. तिच्या मुद्रेवर संभ्रम यत्किंचित्हि दिसला नाहीं. जणूं जो पुरुष आपल्याला प्रिय आहे त्याची प्रशंसा मनांत भरली असतां जनांत लपविण्याचं काय कारण असं तिचे टपोरे डोळे आव्हानपूर्वक विचारीत होते. तिची मुद्रा गोरीमोरी झाली हाती. पण ती लज्जेनं नव्हे, श्रमांनीं. तिच्या कपाळावरच्या घर्मबिंदूंचा अलंकार तिच्या त्या वेळच्या आवेशाला किती शोभत होता!...

आणि मग थोड्याच वेळानं प्रभु रामचंद्राला पाळण्यांत घालण्यांत येऊन स्पृश्य-अस्पृश्य स्त्रिया मिळून त्याला झोके देऊं लागल्या, व श्यामानं तयार केलेल्या दहा विद्यार्थिनींच्या संघानं

ध्वनिक्षेपक यंत्रापुढें येऊन पाळण्याच्या गीताचे पहिले चरण म्हटले तेव्हां ते ऐकल्याबरोबर प्राकारांतल्या हजारों लोकांचीं अंतःकरणं भावनावश होऊन आंदोलित झालीं होतीं, व टाळ्यांचा प्रचंड गजर उठला तो किती वेळ तरी निनादत राहिला होता !

"या हो रघुवीरा । अवतारा । घ्या भारतभयहरणा ॥ ध्रु०॥
स्पृश्यास्पृश्यपणा । दैत्य महा । निर्दालुनि उद्धरणा ॥ १ ॥
ब्रह्मक्षात्रगुणा । भक्तजनां । वितरा सौख्यनिधाना ॥ २ ॥

तें गीत दोन दिवस अगोदर श्यामानं जेव्हां त्याला म्हणून दाखविलं होतं तेव्हां त्यानं हसून आश्चर्यानं विचारलं होतं,

"आपल्या कल्पनांना इतकं अनुरूप असं हें गाणं कुठून मिळविलंत तुम्हीं ?"

ती म्हणाली होती, "कुठून का असेना, तुम्हांला आवडलं कीं नाहीं सांगा. कारण नवमीच्या दिवशीं उत्सवांत हें दहा बारा मुलींनीं सुंदर रीतीनं म्हणावं अशी माझी कल्पना आहे."

"वा, वा ! फारच सुंदर !"

"काय ? कल्पना कीं गाणं ?"

"दोन्ही. पण हें इतकं अर्थपूर्ण गीत कुठून काढलंत सांगा ना !"

कांहीं उत्तर करण्याऐवजीं श्यामानं आपल्या डाव्या हाताचं मधलं बोट आपल्या डोक्याला लावण्याचा अभिनय केला होता, व तो करतांना तिचं तिलाच हसं आलं होतं.

"हं !—छान ! तुम्ही मला कशाकशानं चकित करणार आहांत कुणास ठाऊक !"

यावर कांहीं तरी बोलण्यासाठीं तिचे ओठ विलग झाले होते, परंतु तितक्यांत पार्टिशनच्या बाहेरच्या बाजूस बापू शेवडे

आल्याची चाहूल झाली होती, आणि मग ती आपली खुर्ची सरकवून उठली होती. ती काय बोलणार होती याबद्दलच्या कल्पना करीत ती निघूनं गेल्यावरहि तो कांहीं वेळ बसला होता.

आत्तां आगगाडींतहि खिडकीबाहेर पाहतां पाहतां तो त्या कल्पना करीत बराच वेळ राहिला, आणि गाडीच्या चाकांचा रुळांवर फारच मोठा आवाज झाला व कोणतं तरी स्टेशन आलं तेव्हां तो त्या विचारांतून जागा झाला.

ठाण्याच्या स्टेशनांत गाडी शिरली व उभी राहिली. शरद्नं वर्तमानपत्र पुन्हा डोळयांसमोर धरलं, आणि उरलेली हकीगत वाचण्यास प्रारंभ केला.

ती वाचून झाल्यावर त्यानं त्या पत्राची व्यवस्थित घडी केली आणि ती आपल्या पिशवींत घालून ठेविली.

श्यामाला ती हकीगत वाचायला दिली पाहिजे. आतां दुपारीं 'प्रतिज्ञा'कचेरींत ती आल्यावांचून राहणार नाहीं. ती भेटली कीं...

असे विचार करीतच शरद् दुपारीं दीडाच्या सुमारास कचेरींत गेला. त्यानं गाडींत वाचलेलीं सारीं वर्तमानपत्र तिथें सकाळींच येऊन पडलीं होतीं, आणि त्यांतल्या रिपोर्टांच्या मजकुरावर तांबड्या पेन्सिलीच्या खुणा करुन बापूनं तीं सारीं त्याच्या टेबलावर ठेवलीं होतीं. त्यांकडे पाहून शरद् म्हणाला,

"सगळीं वाचलीं आहेत मीं गाडींत."

"असं का? मग हीं सगळी श्यामाताईच्याकडे पाठवून देऊं?" बापूनं विचारलं.

"धाड वाटलं तर" शरद्नं उत्तर दिलं. आपण त्यांतलं एक पत्र मुद्दाम घडी करून तिला देण्यासाठीं पिशवींत घालून आणलं आहे ही गोष्ट बापूपासून आपण कां लपवीत आहोंत असं त्याच्या मनांत आल्यावांचून राहिलं नाहीं. असा लपंडाव त्यानं पूर्वी कधींच केला नव्हता. तो स्वतःशींच हसला.

बापूनं विचारलं, "कां हसलास? पाठवूं नको होय?"

शरद् पुन्हा खोटं बोलला, "छे छे, तशा अर्थी नाहीं हसलों. पाठवायला कांहींच हरकत नाहीं. पण त्या येतीलच ना इकडे आतां केव्हां तरी?"

"कुणास ठाऊक येतात कीं नाहीं. काल सबंध दिवसांत त्या आल्या नाहींत."

"असं! मग पाठव."

बापूनं चिठी लिहली, आणि ती चिठी व वर्तमानपत्रं ऑफिसच्या शिपायाबरोबर श्यामाकडे पाठवून दिलीं.

शिपाई परत आला तेव्हां शरद् एकटाच होता. त्यानं त्याला विचारलं, "काय रे, होत्या का घरांत?"

"होत्या."

"काय करीत होत्या रे?"

"मला भेटल्या नाहींत. त्यांच्या बहिणीनं चिठी वाचली अन् वर्तमानपत्रं घेतलीं. त्यांनीं सांगितलं श्यामाताई आज तीन दिवस अंथरुणावर पडून आहेत."

"म्हणजे!"

"रविवारींच त्यांना खूप ताप भरला म्हणे."

"असं?"

मग शरद् कचेरींत फार वेळ थांबला नाहीं. 'प्रतिज्ञे'च्या येत्या

अंकांत रामनवमीच्या उत्सवाची समग्र हकीगत देण्यासाठीं तो लिहून तयार करीत होता. परंतु लिहिण्याकडे त्याचं लक्ष लागेना. बापूसाठीं त्यानं एक चिठी लिहून त्याच्या टेबलावर ठेवली, व तो परत येण्याची वाट न पाहतां साडे तीन वाजण्याच्या सुमारास तो बाहेर पडला.

खाली शरद् कुणाशीं तरी बोलल्यासारखं तिला स्पष्ट वाटलं म्हणून श्यामानं डोळे उघडले अन् कानोसा घेतला. तो वर येई-तोंपर्यंत आपण उठून नीटनेटकं बसावं असं तिच्या मनांत आलं, परंतु तिला अतिशय थकवा वाटत होता. आज तिच्या अंगांत ताप विशेष नव्हता, परंतु दोन दिवस लागोपाठ आलेल्या तापा-मुळें तिचे हातपाय अगदीं गळल्यासारखे झाले होते, आणि डोळ्यांवर अजूनहि ग्लानि होती. तिनं डोळे मिटून घेतले व शरद्ची जिन्यांत चाहूल होईल म्हणून ती वाट पाहत राहिली.

परंतु बराच वेळ झाला तरी शरद् वर आला नाहीं. शेवटीं श्यामानं ठरविलं कीं तो आल्याचा आपल्याला केवळ भास झाला असावा. कदाचित् आपल्याला तें एक लहानसं स्वप्नच पडून गेलं असावं. परंतु काय आश्चर्य! त्याचा शब्द किती स्पष्ट ऐकूं आला होता आपल्याला! उषाक्का वर आली तर शरद् येऊन गेले काय असं तिला विचारावंसं तिच्या मनांत आलं; परंतु उषाक्काहि वर आली नाहीं, आणि मग श्यामा किती तरी वेळ तशीच डोळे मिटून स्वस्थ पडून राहिली.

शरद्चा आवाज तिला पुन्हा ऐकूं आला तेव्हां ती मनाशीं

म्हणाली आतां फसायचं नाहीं. त्याचीं पावलंहि जिन्यांत वाजल्यासारखीं वाटलीं तरी तिनं ठरवलं, छे हाहि भासच असला पाहिजे.! पण मग कुणी तरी आपल्या कॉटकडे हलकेंच पावलं टाकीत आलं आणि उभं राहिलं असं जेव्हां तिला वाटलं, इतकंच नव्हे तर शरद्‌चा श्वासोच्छ्वास तिला ऐकूं आला तेव्हां मात्र डोळे तसेच मिटून ठेवणं तिला अशक्य झालं.

हाहि भासच ठरला तर ?—अशा शंकेनं तिनं डोळे हळूच किल-किले केले, आणि शरद् आपल्यासमोर उभा असून खालीं नजर करून आपल्याकडे पाहत आहे याबद्दल खात्री होतांच तिनं डोळे पुरते उघडले अन् हसल्यासारखं केलं.

"वा, छान!" येवढंच तो हसत म्हणाला. जणूं त्याची परवानगी न घेतां तिनं आजारी पडून अंथरूण धरावं हा तिनं अपराध केला होता!

ती हलकेंच म्हणाली, "बसा."

"असूं दे." असं म्हणून तो उभाच राहिला.

श्यामानं डोळ्यांची उघडझाप केली व म्हटलं,

"थोड्याच वेळापूर्वी तुम्ही माझ्या स्वप्नांत आलां होतां."

"स्वप्नांत ?"

"हो. तुम्ही खालीं आलांत, कुणाशीं तरी बोललांत, आणि वर यायच्याऐवजीं निघून गेलांत असं मला अगदीं स्पष्ट स्वप्न पडलं."

तो हसला. "तें स्वप्न नव्हतं. मी खरोखरच मघांशी आलों होतों."

"छे. कांहीं तरीच. आलां होतां तर मग मधेंच कुठें नाहींसे झालांत ?"

" उषाक्कांनीं सांगितलं कीं त्यांचं तुम्हीं ऐकलं नाहीं अन् डॉक्टरचं औषध अजून घेतलं नाहीं, म्हणून माझे स्नेही डॉक्टर आपटे हौदापाशीं राहतात त्यांच्याकडे जाऊन त्यांना बोलावून आलों."

म्हणजे त्याचं मात्र आपण ऐकणारच असं त्याला वाटत होतं तर ! त्याच्या वागण्यांतला तो अर्थ लक्षांत येतांच ती हसली व म्हणाली, " पण औषधाची खरंच गरज नाहीं. आज कुठं आहे ताप मला ? "

तिनं गळ्यापर्यंत चादर ओढून घेतलेली होती, पण डावा हात बाहेर काढून वक्षभागावर टेकलेला होता. शरद्नं चटकन खालीं वाकून आपला हात तिच्या हातावर टेकला, आणि मग तिच्या कपाळाला स्पर्श करून तो म्हणाला,

" ताप नाहीं काय ? कुणी सांगितलं ?"

" नाहीं म्हणजे फारसा नाहीं."

" अन् उद्यां जास्त येणार नाहीं अशी कुणी हमी घेतली आहे वाटतं ? "

आला तरी त्याचं कांहीं महत्त्व नाहीं अशा अर्थाचा तिनं आपल्या जिवणीनं आणि डाव्या डोळ्यानं अभिनय केला.

शरद् म्हणाला, " आदितवारीं ताप भरल्याबरोबरच डॉक्टरला तब्येत दाखवायला हवी होती. निदान मग काल तरी. पण उषाक्का म्हणाल्या तुम्ही मुळीं ऐकानांतच. मीं त्यांना म्हटलं तुमची बहीण इतकी हट्टी असेल अशी नव्हती माझी कल्पना. "

तापाच्या श्रमांनीं कांहींसे डवरलेले डोळे त्याच्याकडे अगदीं स्थिरपणें लावून तिनं विचारलं,

" तें कां ? तुमच्याशीं मी हट्टानंच वागतें आहे ना ? "

त्यावर तो काय उत्तर देतो तें ऐकण्याची तिला फार इच्छा होती. परंतु त्याच्या दृष्टीची चलबिचल होऊन मुद्रेवर जो भाव व्यक्त झाला तेवढ्यावरच संतुष्ट राहणं तिला भाग पडलं.

कारण तितक्यांत डॉक्टर आपटे आले. त्यांच्याबरोबर उषाक्काहि वर आली.

डॉक्टरनीं श्यामाची तपासणी केली, व मग स्टेथॉस्कोप खिशांत ठेवीत त्यांनीं विचारलं,

" कडू मिक्श्चर घ्याल ना ? "

श्यामाला अवसर न देतां शरद् म्हणाला, " अहो विचारतां काय डॉक्टर ! घ्यायला हवं असलं तर घेतीलच."

उषाक्का पायगतीं उभी होती ती म्हणाली, " कसली घेते ती ! औषधाचा पेला पुढें ठेवून तासन् तास बसेल अन् शेवटीं ओतून देईल. औषध घ्यायच्या बाबतींत लहान मूल पुरवलं अशी हट्टी आहे."

शरद्नं श्यामाकडे पाहून विचारलं, " होय ? "

ती नुसती हसली.

डॉक्टर म्हणाले, " बरं, मिक्श्चर राह्यलं. चार पुड्या पाठवतों. त्यांतल्या तीन दोन दोन तासांनीं देऊन आज सरवा, अन् उरेल ती उद्यां सकाळीं द्या."

" विशेष कसला ताप नाहीं ना ? " उषाक्कानं विचारलं.

" छे छे." डॉक्टर म्हणाले, " श्रमाचा आहे ताप, दुसरं काय ! यानीं किती श्रम केले असतील याची कल्पना आहे कीं आम्हांला. बाकी शरद्, नवमीच्या उत्सव मात्र अगदीं अपूर्व झाला यांत शंका नाहीं."

"या होत्या म्हणून." शरदनं नजरेनं श्यामाकडे खूण करून म्हटलं.

"यांत काय शंका!" डॉक्टर म्हणाले, "पण आतां चार दिवस यांनीं विश्रांति घेतली पाहिजे हो. बहुतकरून ताप येणार नाहीं पुन्हा. पण अगदीं अंथरुणावर पडून राहिलं पाहिजे. आलं ना लक्षांत? हं. रात्रीं झोप कशी काय लागते वगैरे कळवा मला उद्यां सकाळीं. पुड्या धाडून देतों आत्तां. जाऊं आतां?"

डॉक्टर उठूं लागले तेव्हां उषाक्का म्हणाली, "चहा ठेवलाय ना."

"चहा? तो कशाला हवा होता?"

श्यामा म्हणाली, "उगीच थोडा."

"बऽरं घेऊं या." खुर्चीवर परत बसत डॉक्टर म्हणाले. "तुमच्यासारख्या मोठमोठ्या मंडळीबरोबर चहा प्यायची संधि आयती चालून आली असतांना नाहीं कां म्हणा?"

"मी मोठी केव्हां झालें बाई? मला तर दादहि नाहीं!"

"आजचीं वर्तमानपत्रं वाचलीं नसाल तुम्ही म्हणून असं बोलतांहा." डॉक्टर म्हणाले, "सगळ्यांतनं उत्सवाच्या मोठमोठ्या हकीगती फडकल्या आहेत. अन् तुमचीं दोघांचीं नांवं!"

"होय?" अशा अर्थाचा चोरटा कटाक्ष श्यामानं झटकन् शरद्‌कडे टाकला, व त्याच्या नजरेनंहि तिला चटकन् उत्तर दिलं.

उषाक्कानं चहा आणला, व गप्पागोष्टींत आणखी दहा पंधरा मिनिटं घालवल्यावर मनगटावरच्या घड्याळाकडे पाहून डॉक्टर म्हणाले, "हेः! आतां जायलाच पाहिजे."

त्यांना पोंचवायसाठीं शरद् व उषा दोघंहि खालीं गेलीं. शरद् परत वर आला तेव्हां उषा त्याच्याबरोबर नव्हती.

तो तिच्याजवळ बसला, व म्हणाला,

"बरं वाटतंय्? कांहीं वाचून दाखविलं तर ऐकण्याइतपत हुशारी आहे का?"

"काय वाचणार?"

पिशवींतून वर्तमानपत्र काढीत तो म्हणाला, "यांत तुमची किती स्तुति आली आहे बघा."

"तिची नाहीं येवढी हौस मला. 'प्रतिज्ञ'च्या येत्या अंकांत मला किती शाबासकी मिळेल त्याची वाट पाहतें आहे मी."

"होय?... इकडे येण्यापूर्वी तेंच लिहीत होतों मी. उत्सवाची साद्यंत हकीगत तर देणारच आहे मी. परंतु शिवाय रामचरित्रांतल्या एका प्रसंगाचं वर्णन एक कॉलमभर देणार आहे. तो मजकूर मीं कां लिहिला तें फक्त मला अन् तुम्हांलाच कळेल. तुम्हांला आवडला तरच छापणार आहे. दाखवूं?"

त्यानं खिशांतून कागद बाहेर काढले, व भुवयांना किंचित् अठी पडावी इतक्या आश्चर्यानं पण हसत श्यामानं ते त्याच्या हातांतून घेतले. तिनं आपलं उसं जरा अधिक उंच करण्यासाठीं उशी चाळवली, व ती वाचूं लागली—

"श्रीरामचंद्रांच्या चरित्रांतली एक कथा जितकी चमत्कृतिमय तितकीच अर्थपूर्ण आहे. कथा आबालवृद्धांच्या परिचयांतली आहे. परंतु तिच्यांतल्या एका विवक्षित अभिप्रायाकडे लोकांचें लक्ष गेलेलें नाहीं.

कथा अशी कीं रामलक्ष्मण वसिष्ठऋषींच्या आश्रमांत असतांना जनक राजाकडून आमंत्रण आलें कीं सीतेच्या स्वयंवरास आपण राजकुमारांना घेऊन यावें....

वसिष्ठ रामलक्ष्मणांना घेऊन निघाले...

अरण्यांतून जातां जातां वाटेंत एके ठिकाणीं एक शिला पडलेली दिसली...

रामाला वाटलें आपल्या मार्गांतील ही एक धोंड...

परंतु वसिष्ठमुनि म्हणाले, तूं चुकतोस, ही एक सुप्त दिव्य शक्ति आहे...

आणि खरोखरच रामाला जी शिला वाटली होती ती एक तेजस्वी स्त्री असल्याचें अखेर दिसून आलें...

"

... ... ...

श्यामानं पुढचा मजकूर वाचला नाहीं. जो वाचला होता तोहि घाईनं ओझरती नजर टाकीत वाचला होता.

तिनं कागद डोळ्यांपुढून दूर केले, व शरद्‌कडे पाहून अतिशय प्रसन्न हास्य केलं. त्याच्या त्या लिहिण्यांत कोणती कबुली होती तें तिच्या त्या ध्यानांत यायला वेळ का लागणार होता ?

तिनं डावा हात सहजगत्या खालीं केला तो त्याचा उजवा हात अंथरुणावर टेकला होता त्यावर पडला. पण तिनं तो उचललला नाहीं. कमलपुष्पाच्या पाकळ्या मिटाव्या त्याप्रमाणें त्याचीं बोटं तिच्या मनगटाभोंवतीं मिटलीं !...

मग तिच्या मनांत काय आलं कुणास ठाऊक, ती एकदम म्हणाली,

"तुम्हांला एक अद्‌भुत हकीगत सांगायची आहे केव्हां तरी !"

"कुणाची ?" त्यानं विचारलं.

"माझ्या वडिलांची !...आत्तां नाहीं...मग केव्हां तरी."

तिनं डोळे मिटून घेतले. शरद्ला वाटलं तिला बोलण्याचे श्रम झाले असावेत.

परंतु तसं नव्हतं. आपला हात शरद्च्या हातांत आहे यावर तिचा विश्वास सहज बसत नव्हता, व म्हणून त्या शुद्ध पवित्र सुखकारक स्पर्शाचा प्रत्यय ती डोळे मिटून शक्य तितक्या पूर्णत्वानं घेत होती !

# १७

मे महिन्याचे पहिले आठ दिवस खूपच गडबर्डीत व आनंदांत गेले, व त्यानंतर मंडळी पांगली अन् आपआपल्या ठिकाणीं गेली त्यामुळें श्यामाला अगदीं चैन पडेना.

उषाक्काच्या लग्नाच्या बेत जरी उगीच थाटाचा केला नव्हता तरी दोन दिवस आधींपासूनच वीस पंचवीस माणसांची घरांत 'र्दी झाली होती. चांदणीहून वहिनी व सिनूकाका तर आलेच होते. पण गडीमाणसं, शेतावरची कुळं अशा आठ दहा मंडळींना सिनूकाकांनीं मुद्दाम हौसेनं आणलं होतं. ही मंडळी दाखल झाली तेव्हां श्यामा सिनूकाकांना थट्टेनं म्हणाली होती,

"वा काका, एक मोर्चाच घेऊन आलां आहांत तुम्ही छोटासा!"

सिनाप्पा हसून म्हणाले होते, "अग, तरी ज्यांनीं ज्यांनीं येतों म्हटलं त्या सगळ्यांना घेऊन आलों नाहीं! तसा आलों असतों तर पुण्याच्या लोकांना पाह्यला मिळालं असतं आमचं खरं वऱ्हाड!

आक्काचं लग्न निघालंय हें कळल्यावर लहान लहान पोरंसुद्धां मागं लागली आम्ही येणार लाडू खायला म्हणून!"

मुंबईची पार्टी आदल्या दिवशीं दाखल झाली होती तिच्यांत डॉक्टरकाका, काकू, अशोक ही मंडळी तर होतीच. पण शिवाय अशोकच्या ज्या स्नेह्यांच्या ओळखी झाल्या होत्या त्यांनाहि श्यामानं आमंत्रण पाठविलं होतं व त्यांतल्या दोघांना अशोक घेऊन आला होता. प्रभाकर येईल कीं नाहीं अशी श्यामाला शंका होती. पण तो कामं बाजूला ठेवून लग्नाच्या दिवशीं आला होता, व तिच्या आग्रहावरून सबंद दिवस राहिलासुद्धां होता. आक्काच्या शाळेंतील शिक्षक-शिक्षकिणी व विद्यार्थिनी, वसंतचा मित्रपरिवार, आणि शरद् व त्याच्या सहकाऱ्यांपैकीं बहुतेक सगळे— अशांची पानसुपारीच्या वेळेस केवढी तरी दाटी झाली होती; आणि दोन्ही पक्षांकडील म्हणून एकच मोठी मेजवानी करण्यात आली त्या वेळीं देखील अगदीं लक्षांत राहण्यासारखा निवडक समाज पंक्तींत दिसला होता. वरातीच्या मिरवणुकीला फाटा देण्यांत आला होता, तथापि सुनमुखाचा समारंभ जवळ जवळ जुन्या पद्धतीनंच झाला होता. त्या वेळीं नववधूवरांना आशीर्वाद देतांना आपल्या वहिनीच्या डोळ्यांतून अश्रुधारा सारख्या चाललेल्या पाहून श्यामाच्या मनांत आलं होतं, लेकीचे वडील आशीर्वाद देतांना द्यायला हजर नसावेत याचंच तिला फार दुःख होत असणार. लग्नाचा मुहूर्त ठरला तेव्हां तिच्या स्वतःच्या मनांत एकदां आलं होतं कीं उषाक्काला म्हणावं थोडा धीर धरलास तर कदाचित् आपले वडील प्रत्यक्ष हजर असतांना— परंतु ती तसं कांहीं बोलली नव्हती. कारण आपले वडील आतां केव्हां तरी मायदेशाला परत येतीलच अशी

जरी मनांतल्या मनांत तिला खात्री वाटली होती तरी अमुक एका अवधींत ते येतीलच असं तिला कुठं सांगतां येत होतं ?

गेल्या दोन महिन्यांत तिला आपल्या वडिलांची नवीन अशी कांहींच बातमी कळली नव्हती. एकदां एका दुकानांत तिला मिळाली तेवढी हॉलीवुडचीं नियतकालिकं तिनं विकत घेऊन घरीं आणलीं होतीं व आपल्या खोलीचं दार बंद करून तीं काळजीपूर्वक चाळलीं होतीं. हिज हायनेस दि महाराजा ऑफ विद्यापुरम् यांच्या हॉलिवुड येथील मुक्कामाचे त्रोटक उल्लेख तिला त्यांपैकीं एकदोन नियतकालिकांत वाचायला मिळाले होते. परंतु महाराज व त्यांच्याबरोबरची मंडळी हॉलिवुड सोडून हिंदुस्थानाकडे केव्हां निघणार याबद्दलची निश्चित बातमी त्यांत सापडली नव्हती...

तिला स्वतःलाहि उषाक्काच्या एकंदर लग्नसमारंभांत आपल्या वडिलांची किती तरी वेळां आठवण झाली होती. तिला आनंदरावांच्याविषयीं कळलेली सारी माहिती ज्यांना तिनं सांगितली होती अशा दोनच व्यक्ती लग्नासाठीं जमलेल्या त्या समाजांत होत्या. तिचे सिनूकाका आणि शरद्. त्या दोघांच्या नजरेला तिची नजर सहज मिळावी आणि परस्परांच्या मनांत आलेले आनंदरावांविषयींचे विचार परस्परांनीं ओळखावे असं समारंभाच्या त्या दोन दिवसांत कितीदां तरी झालं होतं....

उषाक्कानं आणि वसंतनं सिनूकाकांना नमस्कार केला तेव्हां त्यांचाहि कंठ दाटून आला होता, व त्यांनींहि आपल्या वहिनीप्रमाणेंच अश्रु पुसलेले तिला दिसले होते. ती सिनूकाकांना हलकेंच म्हणाली होती,

"मघांशी वहिनीला रडूं आलं तेव्हां मला वाटलं होतं बायकांचा तो स्वभावच. पण काका तुम्हीसुद्धां—"

ते तिला म्हणाले होते, "बायका अन् पुरुष हा भेद या बाबतींत करणं चुकीचं आहे. वय मोठं झालं, संसारांतले टक्के-टोणपे खाऊन अनुभव आला, कीं अंतःकरण नरम होतं, अन् अशा प्रसंगीं ते विरघळल्यावांचून राहत नाहीं."

श्यामा म्हणाली होती, "पण काका, आतां उषाक्कासारखी वाढलेली मुलगी सासरीं जायची म्हणजे कांहीं पूर्वींच्या लहान मुलींसारखी नव्हे. मग तिला आशीर्वाद देतांना वडीलधाऱ्या माणसांना इतकं दुःख व्हावं ?

"अग दुःख होतं तें मुलगी सासरीं चालली म्हणून नव्हे. आजपर्यंतचे ऋणानुबंध मनांत येतात, आणि ते आतां संपले, निदान त्यांचं स्वरूप आतां बदललं अशा विचारानं साहजिकच फार वाईट वाटतं. शिवाय वहिनींना कोणत्या विचाराचं विशेष दुःख आतां होत असेल हें मीं तुला सांगायला का पाहिजे ? खरं म्हणशील तर मला देखील आनंदरावाची आठवण पुनः पुन्हा होते, अन् वाटतं—आतां तुझ्या लग्नापर्यंत मात्र तुझे वडील घरीं येतील..."

शरद् दूर एका बाजूला कोणाशीं तरी बोलत उभा होता तिकडे सिनूकाकांनीं अर्थपूर्ण दृष्टि टाकली, व मग त्यांची नजर आपल्या-कडे वळेल तेव्हां आपण काय बोलायचं असं मनांत येतांच श्यामा कांहीं तरी निमित्त करून त्यांच्याजवळून दूर झाली होती.

अशा प्रकारें लहान मोठ्या सुखाच्या प्रसंगांनीं भरलेले ते सात आठ दिवस केव्हां निघून गेले ते श्यामाला कळलं देखील नाहीं.

समारंभ आटोपल्यानंतर दुसऱ्या दिवशीं पाहुणे मंडळींपैकीं एकेक निरोप घेऊं लागली तेव्हां घरांत आठ दिवस उडालेल्या गर्दीला ओहोटी लागल्यासारखं तिला वाटलं. प्रथम मुंबईची सारी मंडळी निघून गेली होती. तिनं आपल्याबरोबर मुंबईस यावं म्हणून अशोकनं तिला फार आग्रह केला होता. परंतु ती त्याला म्हणाली, "वहिनी व काका इतक्या दिवसांनीं भेटायला आलीं असतांना तीं इथें आहेत तंवर मी कशी येऊं? तीं गेलीं कीं मी येईन." "बघ हं; नाहीं तर मागच्यासारखंच खुशाल कळवशील कीं मला सवड नाहीं. मी ऐकणार नाहीं आतां." असं तिला बजावून अशोकनं तिचा निरोप घेतला होता. नंतर तीन दिवसांनीं वहिनी व सिनूकाका इत्यादि चांदणीची सगळी मंडळी तिकडे रवाना झाली होती. लग्नानंतर आठ दहा दिवस वेंगुर्ल्याकडे प्रवासास जाण्याचा बेत वसंतनं व उषाक्कानं बरेच दिवसांपूर्वींपासून केला होता, त्याप्रमाणें तीं दोघंहि नंतर निघून गेलीं होतीं. श्यामा आपल्या वहिणीला चेष्टेनं म्हणाली होती,

"अग येतेस का म्हणून नुसतं मला विचारायचं तरी होतंस? तूं विचारलं असतंस तरी मीं कांहीं हो म्हटलं नसतं, पण—"

"इश्श; मग चल कीं!" उषाक्का हसून म्हणाली होती, "मला वाटलं तुला कुठला वेळ असायला? तुझी प्रतिज्ञा कचेरी, तुझीं कामं—"

"कामांचं काय एवढं मोठं? तूं जर अगदीं आग्रहच केला असतास कीं सारीं कामं सोडून तूं आलंच पाहिजेस तर मीं केला असता विचार— "

"मग अजून चल. खरंच चल."

" आतां बोलावण्यांत काय अर्थ आहे ? " 'बूंदसे गयी वो हौदसे नही आती.' जा, तुम्ही दोघंच जा. अन् परत आल्यावर सांगा आम्हांला काय काय मजा केलीत ती."

वसंत व उषाक्का गेल्यानंतर दोन दिवसांनीं मुंबईस जाण्याचा बेत श्यामानं केला, व नेहमींप्रमाणें दुपारीं प्रतिज्ञा कचेरींत गेल्यावर तिनं तो शरद्‌जवळ बोलून दाखविला. तो म्हणाला,

" एकदमसा बेत केला मुंबईस जाण्याचा ? "

" एकदम कुठला ? अशोकचा किती दिवस तरी आग्रह चाललेला आहे, अन् मी त्याला दर वेळेस म्हणतें आहे पुढें केव्हां तरी येईन."

" परत केव्हां येणार ? " त्यानं विचारलं.

" परत होय ? पाहूं या. लौकर यायला पाहिजे काय ? "

शरद्‌नं तिच्याकडे क्षणभर पाहिलं व मग पेन्सिलीच्या टोकानं आपल्या डाव्या अंगठ्यावर एखादं अक्षर गिरविल्यासारखं करीत म्हटलं, " हं. तुम्हीं हलके हलके इथलं इतकं काम पाहायला लागला आहांत कीं तुम्ही बरेच दिवस दूर राहिलात तर अवघड वाटेल आम्हांला. अर्थात् याचा अर्थ असा नव्हे कीं तिकडे राहावंसं वाटत असलं तरी तुम्ही इकडे यायला हवं."

श्यामा हसली व म्हणाली, " शक्य तों लवकरच येईन मी. पण अशोक लवकर सोडणार नाहीं, अन् त्याचा आग्रह मोडायचं जिवावर येईल माझ्या."

तिनं हे शेवटचे शब्द मुद्दामच खवचटपणानं उच्चारले होते. त्यांचा परिणाम त्याच्या चर्येवर दिसतो का म्हणून तिनं त्याच्याकडे निरखून पाहिलं. तसा कांहींच परिणाम तिला दिसला नाहीं.

ती मनाशीं म्हणाली, 'माझाच हिशेब चुकीचा होता. चार दोन शब्दांनीं मत्सर वाटूं देणाऱ्या सामान्य माणसाप्रमाणें शरद् नाहीं हें मला कळायला हवं होतं.' तिच्या मनांत ही कल्पना ज्या क्षणीं आली त्या क्षणीं त्यानं तिच्याकडे प्रसन्न मुद्रेनं पाहून म्हटलं,

"अशोक तुम्हांला दहा पंधरा दिवस तरी सोडतीलसं मला नाहीं वाटत. ते मला म्हणाले कीं तुमचीं दोन तीन चित्रं तयार करणार आहेत ते. तुम्हीं आणि त्यांनीं मिळून या बाबतींत सहकारी धंदा करायचं ठरवलं आहे म्हणे?"

तो प्रश्न ऐकतांच श्यामा म्हणाली, "काय बाई तरी अशोक! हें कशाला त्यानं तुम्हांला सांगितलंन्?"

जणूं तिच्या त्या उद्गारांतल्या गर्भित निंदेचं निरसन करण्यासाठीं शरद् म्हणाला, "अशोक फार चांगले आहेत. त्यांचा माझा सहवास थोड्या तासांचाच झाला, पण तेवढ्यांत मला ते फार आवडले.

"होय, तुमचीं आणि त्याचीं मतं फार जुळण्यासारखीं आहेत खरीं." ती म्हणाली अन् मग तिच्या मनांत काय आलं कुणास ठाऊक, तिनं विचारलं, "आमचे प्रभाकर कसे वाटले तुम्हांला? त्यांची तुमची ओळख करून दिलीन् कीं नाहीं अशोकनं?"

"दिली तर!"

"मग?"

"ते काय बडे कॉंग्रेसवाले आहेत. त्यांचा आमचा मोठा वाद झाला एकदां परवांच्या त्यांच्या इथल्या मुक्कामांत."

"होय? मला सांगितलं नाहींत तें कुठें?"

शरद् हसला व म्हणाला, "सांगायचं केव्हां? तुम्ही इतक्या घांदलींत होता कीं लग्न उषाक्काचं आहे कीं--

"चला! इतकी मी घांदलींत होतें काय?" श्यामा मान वेळावून म्हणाली, "बरं तें जाऊं द्या. काय वाद झाला सांगा."

"वाद असा निघाला कीं मी स्वतः कॉंग्रेसमन आहे. म्हणजे कॉंग्रेसची चार आणे वर्गणी भरणारा आहे. आणि असं असून मी स्वतः तर कायद्याचं उल्लंघन होणार नाहीं अशा बेतानं शस्त्र धारण करतोंच, परंतु कुणाहि कॉंग्रेसवाल्यानं धारण करावं अशा मताचा मी आहे. मीं त्यांना म्हटलं, माझ्या 'प्रतिज्ञे'मधून शस्त्रधारणाचा प्रचार मी करणार आहें. तेव्हां ते म्हणाले कॉंग्रेस-च्या भूमिकेशीं हें विसंगत आहे अन् मग त्यावरून पुष्कळ वाद झाला."

श्यामा म्हणाली, "प्रभाकर गांधींचे अगदीं कट्टे चेले आहेत. त्यांना कसचीं तुमचीं मतं पटणार? बाकी मतं पटण्याची गोष्ट सोडली तर प्रभाकर मोठे गोड गृहस्थ आहेत असं नाहीं तुम्हांला वाटलं?"

शरद्नं हसून फक्त मान हालविली.

त्याची उत्तर देण्याची ती गमतीदार तऱ्हा आतांशा तिच्या फार लक्षांत येऊं लागली होती. नुसती नजरेला नजर लावून तो हसला कीं त्याच्याकडे आपणहि पाहत राहवं असं तिला वाटे. आतांहि तिला तसंच वाटलं, व तिच्या मनांत आलं, थोड्याच दिवसांपूर्वी प्रभाकर आपल्यावर अनुरक्त होता, व कांहीं गोष्टी आपल्या मनासारख्या घडल्या असत्या तर आपण त्याच्या म्हण-ण्याला रुकार देऊन आतां स्वतंत्रहि राहिलों नसतों, याची किंचित् तरी शंका शरद्ला असेल काय?...प्रभाकराची मागणी तिनं मान्य केली असती तर ती आज या क्षणीं शरद्शीं अशी बोलत बसली असती काय?...किंबहुना तिची व शरद्ची भेट

तरी झाली असती काय?...मानवी जीविताचे प्रवाह किती चमत्कारिक रीतीनं वाहत असतात!...

तोहि आपल्या मनाशीं कसल्या तरी आठवणी काढीत असावा. कारण त्यानं एकदम म्हटलं,

"तुमचे सिनूकाका मला फार आवडले."

तिनं नजर वर केली व हसून विचारलं, "होय?"

"हो; जुन्या सरदारी थाटाची आठवण करून देणारा त्यांचा तो पोशाख, ती करारी पण प्रेमळ मुद्रा, अन् तें बोलणं, यामुळें एक नमुनेदार माणूस आपण पाहतों आहोंत असं वाटे मला सारखं त्यांच्याविषयीं. आतां केव्हां येणार आहेत पुन्हा ते इकडे?"

कांहीं न बोलतां नुसतं हसून उत्तर देण्याच्या त्याच्या तऱ्हेची नक्कल करावीसं तिला वाटलं.

कारण सिनूकाकांना जेव्हां तिनं स्वतः 'काका आतां पुन्हा केव्हां येणार?' असा प्रश्न केला होता तेव्हां त्यांनीं जें उत्तर दिलं होतं तें शरद्‌ला सांगण्यासारखं थोडंच होतं!

ती फक्त म्हणाली, "काकांचं काय, तुम्ही बोलवाल तेव्हां ते येतील."

या तिच्या उत्तरांतला खोल अभिप्राय अर्थातच त्याच्या लक्षांत आला नाहीं; व शिवाय त्याच वेळीं बापू एक लठ्ठ पुस्तक घेऊन आंत आला त्यामुळें तिच्याशीं पुढें बोलण्याऐवजीं, "आणलंस काय? शाबास!" असं त्याला म्हणून शरद्‌नं तें पुस्तक हातीं घेतलं. तें उघडीत तो श्यामाला म्हणाला,

"कायद्याचा अभ्यास करणार आहे थोडासा."

"म्हणजे काय?" तिनं विचारलं.

"शस्त्र धारण कारणं अगर वापरणं गुन्ह्याच्या सदराखालीं केव्हां केव्हां येतं तें नीट समजून घेणार आहे मी."

'Bearing an arm is not an offence when' असं अर्धवट स्वतःशीं पण जरा मोठ्यानं पुटपुटत तो त्या पुस्तकांतल्या एका पानावरचा मजकूर अगदीं लक्ष देऊन वाचल्याप्रमाणें वाचूं लागला.

त्यानं नजर खालीं केली असल्यामुळें त्याच्या रुंद कपाळाचा थोडासाच भाग व केसांची ठेवण तिला दिसत होती. त्याकडे पाहतां पाहतां श्यामाच्या मनांत आलं, शस्त्रधारणाच्या हक्काबद्दल लिहिण्यांत व प्रचार करण्यांत शरद्‌नं जरा जपूनच बोलायला अगर लिहायला नको काय ? तें करतांना त्यानं स्वतःवर एखादं संकट ओढवून घेतलं म्हणजे ? त्याबद्दल त्याला हळूच सुचना देणं हें तिचं कर्तव्य नव्हतं काय ? तशी सूचना तिनं केली तर त्याच्या दृष्टीनं ती भित्री ठरेल काय ? ... आतां जरी नाहीं तरी मुंबईस गेल्यावर तिकडून त्याला पत्र लिहितांना याबद्दल आपण कांहीं तरी लिहिलं पाहिजे असा तिनं मनाशीं निश्चय केला.

तितक्यांत पुस्तक दूर करून शरद् बापूकडे बघून म्हणाला, "ह्या उद्यां मुंबईला जाताहेत."

"होय ?" बापू म्हणाला, "तुझी परवानगी घेतल्यावांचूनच ?"

"अरे परवानगी दिली नाहीं तरी त्या जाणारच, तेव्हां 'बरं आहे जा' असं म्हणून आपला आब आपण राखून घ्यावा हें चांगलं नाहीं का ?"

तो हसला व बापूहि हसला.

श्यामा चटकन् म्हणाली, "वा वा, असं नाहीं हं. तुम्ही नको म्हणाल, तर मी नाहीं जाणार, बघा अजून."

शरद् म्हणाला, "नको नको. जाच तुम्ही. शक्य तितक्या लवकर या म्हणजे झालं."

हें कांहीं त्यानं तिला सांगायला नको होतं.

मुंबईस गेल्यानंतर दोन दिवसांनींच ती अशोकला म्हणाली, "मला फार दिवस इथं राहतां येणार नाहीं हें तुझ्या लक्षांत आहे ना?"

अशोक म्हणाला, "या मुक्कामांत मी पाहतों आहे तूं पूर्वीची राहिली नाहींस. आल्या दिवसापासून परत जाण्याची भाषा चालली आहे तुझी. अशी कशानं बदललीस?"

ती म्हणाली, "शीः बदललीय कसली? परंतु आपल्या अंगावर कांहीं तरी कामाची जबाबदारी आहे अशी जाणीव असली म्हणजे साहजिकच नाहीं का मनांत येत कीं फार दिवस केवळ चैनीसाठीं दूर राहणं चांगलं नाहीं."

"दूर अन् जवळ हे शब्द तुझ्या बोलण्यांत पूर्वी येत नसत."

असं म्हणतांना तो हसला, पण त्यानं तिच्याकडे पाहिलं नाहीं. ब्रशावर रंग घेऊन हात लांबवून तसाच धरून ती रंगछटा नक्की कोठें टाकावी याचा अदमास तो घेऊं लागला. तिचं हें नवं चित्र तयार करतांना तो विशेष रंगून गेला होता. जेव्हां जेव्हां तिच्या चर्येतील एखादा सूक्ष्म भाव पकडायसाठीं तो तिच्याकडे कांहीं वेळ नजर लावी, अन् मग कॅन्व्हसकडे वळे तेव्हां तेव्हां तो म्हणे, "हें चित्र माझ्या मनाजोगं होणार अगदीं. खरा दर्दी

मी मागेन तेवढे पैसे ओवाळून टाकील यावरून. त्यांतले अर्धे अर्थातच तुझे."

ती हसून म्हणे, "सारे तूंच घे. मला नकोत."

"अग पैसे कधीं नको म्हणूं नयेत."

"पण मला करायचे आहेत काय?"

"करायचे नसले तरी घ्यावे अन् जवळ ठेवावे. शस्त्र करायचं काय असं वाटण्याइतकी सुरक्षितता ब्रिटिश अमदानींत असली तरी तें जवळ ठेवण्याच्या आपल्या हक्काचा विसर पडूं देऊं नये, असं शरद् म्हणतात ना? माझ्या मतें पैशाचंहि तसंच आहे. पैसा म्हणजे तरी शस्त्रासारखी एक शक्तिच कीं!"

"तूं मोठा पंडित व्हायला लागला आहेस, अशोक!" श्यामा म्हणे.

तिच्या त्या शब्दांत वरवर उपहास दिसला तरी कौतुकाचाच भाग अधिक असे. तो अशोकच्या ध्यानांत येई, व मग तिच्याकडे एकदां Thank you अशा अर्थाचा कटाक्ष टाकून तो मोठ्या उल्हासानं हसत हसत आपल्या कामाकडे वळे.

ती आणि अशोक सिनेमाला म्हणून निघालीं होतीं खरीं, परंतु वाटभर अशोक तिच्याशीं बोलत होता 'प्रतिज्ञे'च्या ताज्या अंकांतल्या शरद्च्या अग्रलेखाबद्दल. त्याला तो अग्रलेख फारच आवडला होता. दुपारीं तर त्यानं गड्याला मुद्दाम पाठवून आठ दहा अंक विकत आणवले होते. तिनं त्याबद्दल त्याला विचारलं तेव्हां तो म्हणाला होता, "माझ्या स्नेहीमंडळींत वाटणार आहे

मी हा अंक." जेवणाच्या वेळीं त्यानं त्या अग्रलेखाबद्दलच बोलणं काढलं होतं; आणि त्याचे वडील जेव्हां त्याला प्रतिपादूं लागले तेव्हां तो म्हणाला होता,

" यांतला हा भाग मी तुम्हांला वाचून दाखवितों तो ऐका, आणि मग सांगा शरद्चं म्हणणं कुठं चूक आहे तें."

आणि त्यानं वाचायला प्रारंभ केला होता,

" ... कॉंग्रेसचें अहिंसेचें ब्रीद ज्याला पाळायचें आहे त्यानें देखील शस्त्र धारण कां करूं नये, आणि शस्त्र चालविण्याची विद्या अवगत कां करून घेऊं नये या प्रश्नाला समाधानकारक उत्तर देतां येईल असें आम्हांस वाटत नाहीं. हिंदुस्थान देशांतील लोकांना राणी सरकारनें निःशस्त्र करून टाकलें हे त्यांवर त्या सरकारनें मोठे उपकार केले असें अहिंसेचे जे अगदीं कट्टे पुरस्कर्ते असतील ते देखील म्हणणार नाहींत. महात्मा गांधींच्याकडे अखिल भारताचें धुरीणत्व गेल्यापासून राष्ट्रीय राजकारणाचा गाडा अहिंसेच्या मार्गानें हाकण्यांत आलेला आहे, व त्यामुळें राष्ट्राचें हित झालेलें आहे याबद्दल वाद नाहीं. परंतु ज्या देशाला सहस्रावधि वर्षांची पराक्रमांची परंपरा आहे, अशा देशांतील पस्तीस कोटी लोक कायद्यानें निःशस्त्र केले गेलेले असावेत, व त्या सक्तीच्या शस्त्रसंन्यासांत त्यांनीं संतोष मानावा हें दृश्य कुणालाहि अत्यंत विषादकारक व अपमानास्पद वाटण्यासारखें आहे! या दृश्याचें गुणवर्णनच आम्ही करीत राहणार काय? शस्त्रधारण म्हणजे हिंसावृत्ति असें समीकरण आम्ही वेडेपणानें किती दिवस गृहीत धरणार आहोंत?

आम्ही असें विचारतों, कीं शस्त्रधारण केल्यानें अहिंसेच्या व्रताला लगेच बाध येतो ही कुठली कल्पना? दाखला देऊन बोलावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, अहिंसेचे आचार्य

महात्मा गांधी शारीरिक बलसंवर्धनाच्या कल्पनेला जर विरोध करीत नाहींत, तर शस्त्रधारणाची कल्पना तरी अहिंसेच्या व्रताशीं तत्त्वतः विसंगत कां ठरावी ? ज्याच्या ठिकाणीं हिंसेची प्रवृत्ति आहे त्याचें शरीरसामर्थ्य वाढलें तर त्याच्या हातून हिंसा होण्याचा संभव वाढणार, परंतु उलट ज्यानें मनानें अहिंसेची शपथ घेतलेली आहे तो शरीरानें कितीहि बलिष्ठ झाला तरी त्याच्या हातून हिंसा घडणार नाहीं, असें महात्मा गांधी गृहीत धरतात व आखाडे काढण्याला व चालविण्याला परवानगी देतात. मग त्याच न्यायानें कॉंग्रेसच्या सभासदांनीं शस्त्रें धारण केलीं व आत्मसंरक्षणार्थ शस्त्र चालविण्याची विद्या संपादन केली तर त्यांच्या अहिंसेच्या प्रतिज्ञेला बाध कोठें येतो ?

शस्त्र धारण करण्यांत हेतु इतकाच असतो कीं, केवळ शरीरबलानें जें साधत नाहीं तें साधण्याची तयारी करावी. नुसता हात फार तर किती पोंचेल ? परंतु हातांत शस्त्र असेल तर हाताचा पल्ला दसपट वाढेल ! अर्थात् अशा प्रकारें सामर्थ्याची झेप वाढली तर केवळ तेवढ्यामुळें अहिंसेच्या तत्त्वाविरुद्ध आचरण घडलें असें कसें म्हणतां येईल ? आपल्या अंगच्या सामर्थ्यावर संयम चालविणें हा अहिंसेच्या तत्त्वाचा गाभा. ज्याच्या ठिकाणीं असा संयम नसेल तो शरीरबलानेंहि हिंसेचें आचरण करील असा संभव आहे; व ज्याच्या अंगीं संयमशीलता पूर्ण बाणलेली आहे त्याच्या हातीं शस्त्र असलें, आणि तें चालविण्याची विद्या त्याला माहीत असली तरी तो अहिंसाव्रत सोडणार नाहीं ! मग कॉंग्रेसच्या तत्त्वाशीं एकनिष्ठता ठेवूनहि शस्त्रधारणाचा आपला हक्क स्त्रीपुरुषांना बजावण्यास प्रत्यवाय कां असावा ? शस्त्रसज्जता हा एक मूलभूत नागरिकत्वाच्या हक्काचा भाग आहे, सायुधता ही राष्ट्राची एक

दिव्य शोभा आहे, ही जाणीव आपल्या हिंदी लोकांच्या मनांत जितकी अधिक प्रबल करतां येईल तितकी करावी हा विचार कॉंग्रेसच्या अगदीं कट्टया अनुयायांनादेखील कां पटूं नये हें समजणें कठीण आहे !..."

इतकं वाचून झाल्यावर अशोकनं वर दृष्टि करून पाहिलं आणि म्हटलं, "मला तर हें लिहिणं फार सुसंगत आणि राष्ट्राच्या आजच्या परिस्थितींत अत्यंत आवश्यक असं वाटतं."

त्यानं ज्या तऱ्हेनं हे शब्द उच्चारले त्यांत 'तुम्हांला वाटत नाहीं का ?' असा प्रश्न उघडच सूचित होता. तें ओळखून डॉक्टर म्हणाले,

"अशोक, तुम्ही लोक चूक करतां ती अशी कीं, गांधींदेखील दुर्बलांची अहिंसा मला हवी असं म्हणत नाहींत हें तुम्ही विसरतां. महात्माजी सतत असंच म्हणत आले आहेत, कीं सबलांची अहिंसा हीच खरी अहिंसा."

अशोकनं श्यामाकडे अशा अभिप्रायाचा कटाक्ष टाकला कीं, 'बघ आतां यांना त्यांच्याच बोलण्यांत कसं पकडतों तें', आणि तो आपल्या वडिलांना म्हणाला,

"मग फारच चांगलं कीं. शस्त्रावांचूनच्या सबलतेपेक्षां सशस्त्र सबलता अधिक मोठी हें तर गांधींना कबूल करावंच लागेल. मग सर्व नागरिकांनीं शस्त्रधारणाचा आपला हक्क बजावण्याविषयीं दक्ष राहून अहिंसाव्रत आचरावं असं गांधींनीं वास्तविक म्हटलं पाहिजे, या शरद्च्या म्हणण्यांत दोष कुठें राहिला !"

डॉक्टर क्षणभर गप्प राहिले, व तुम्हां पोरांना कसं एवढं समजत नाहीं अशा तऱ्हेची जी ठराविक चर्या वडील माणसं पुष्कळदां करतात ती करून ते म्हणाले,

" दोष नाहीं कसा ? शरद्च्या लिहिण्यांत एक मोठा हेत्वाभास आहे."

" झालं ! " अशोक हसून म्हणाला, " पराभूत पक्षाचं हें ठराविक हत्यार आहे "

" बरं बुवा आमचा पक्ष पराभूत ! तसं का म्हणेनास " असं उद्गारून डॉक्टरकाका उठले होते. त्यांना पुरता वाद घालायला वेळ होता कुठें ?

परंतु अशोक दिवसभर ज्याच्या त्याच्याशीं तोच विषय काढून बोलत राहिला होता.

आणि आतां सिनेमाला जातांना व परत येतांनाहि तो पुनः पुन्हा तोच विषय काढून श्यामाजवळ शरद्ची स्तुति करीत होता.

श्यामाला अर्थातच ती स्तुति फार प्रिय होती. ती मधेंच त्याला म्हणाली, " शरद्ना कल्पनाहि नसेल तूं त्यांचा एवढा स्तुतिपाठक बनला आहेस याची."

तो म्हणाला, " मी त्यांना उद्यां पत्र लिहिणार आहे. किंवा तूंच पोंचीव माझी शाबासकी आपल्या पत्रांत. तूं लिहिणारच असशील ना उद्यां पत्र ? "

" नाहीं बाई, मी कशाला लिहूं ! "

" आहा, जसं कांहीं खरंच. बरं मी लिहीन पत्र. मला त्यांचा आजचा अग्रलेख इतका आवडला आहे कीं त्यांना समक्षच भेटावंसं फार फार वाटतं."

त्याच्या असल्या बोलण्यानं अतिशय आनंदित होऊनच श्यामा रात्रीं घरीं परत आली. तो आपल्या खोलीकडे गेला व तीहि आपल्या खोलीकडे जाऊन कपडे बदलूं लागली. तितक्यांत बाळू येऊन तिला सांगूं लागला.

" तुमाल्नी टेलिफोन केला होता कुनीसा."

" होय ? कुणी रे ? आणि केव्हां ? "

" अर्धा तास झाला असल. मी नांव इचारलं तर म्हनालं नांव नाही सांगत. पुन्हा करीन जरा येळानं मीच टेलिफोन."

" त्यांनीं आपला नंबर नाहीं का रे दिला ? "

" हां दिलाय तर ?" असं म्हणून त्यानं एक कागदाचा कपटा तिच्या हातीं दिला.

त्यावर पेन्सिलीनं लिहिलेले ते त्याच्या हातचे आकडे वाचतां वाचतां श्यामानं त्याला विचारलं, " हा आकडा काय रे ? पांच कीं सहा, कीं—? "

" फाइव्ह फाइव्ह " त्यानं इंग्रजींत उत्तर दिलं, " फोर, फाइव्ह, नॉट, वन, सिक्स."

त्याच्या त्या उत्तराचं श्यामाला हसूं आलं.

ती टेलिफोनपाशीं गेली व डायलवरचे आंकडे फिरवून लक्षपूर्वक ऐकूं लागली.

दुसऱ्या बाजूनं आवाज आला, " हलो ! हलो !—मी शरद् "

तिला वाटलंच होतं !

ती म्हणाली, " मी श्यामा बोलते आहे. हं. केव्हां आलांत ? "

" आत्तांच संध्याकाळीं."

त्याच्या त्या आवाजांत इतका कांहीं निकटपणा तिला वाटला, कीं जणूं तो खोलींतच तिच्याजवळ होता, आणि तिच्याशीं बोलत होता.

बोलणं संपल्यावर त्यानं तिकडे रिसीव्हर टेलिफोन वर ठेवल्याचा जेव्हां क्लकदिशीं आवाज झाला तेव्हां श्यामाला कांहींसं चमत्कारिक वाटलं. क्षणापूर्वी तो आपल्याजवळ होता व आतां

एकदम दूर गेला असा तिला भास झाला. तो भास जरासा क्लेशकारकच होता. तथापि शरद् मुंबईस आला असून तो आपल्याकडे उद्यां सकाळीं येणार आहे या जाणीवेचं सुख मोठं होतं. ती हसत सैंपाकघराकडे जाऊं लागली तोंच अशोक आपल्या खोलींतून दिवाणखान्यांत आला. त्याला पाहतांच ती म्हणाली,

"ए, तुझी इच्छाशक्ति जोराची खरंच हं!"

तिच्या बोलण्याचा रोख न समजल्यानं त्यानं विचारलं, "ती कशी?"

"शरद्‌ची भेट व्हावी असं तुला फार वाटत होतं ना? ते आले आहेत इथें."

"इथें?"

"त्यांचं काम आहे वाटतं कांहीं."

"हं, काम आहे! तूं सांग अन् मी ऐकतों." असं म्हणून अशोक हसला व हातांतला टॉवेल फिरवीत न्हाणीघराकडे गेला.

श्यामानं भुवया चढवून रागानं त्याच्याकडे पाहण्याचा अभिनय केला. परंतु मनांतल्या मनांत ती फार आनंदित झाली होती. कारण तीहि आपल्या मनाची अशीच समजूत करून घेत होती कीं शरद् आला तो तिला भेटण्यासाठींच!

# १८

सकाळच्या एक्स्प्रेसनं मुंबईहून निघून ती घरीं येऊन दाखल झाली तों बारा वाजले. स्नान व जेवण आटपतांच ती बाहेर निघाली तेव्हां उषाक्का म्हणाली,

"अग प्रवासाची दगदग झाली असेल. घटकाभर पड तरी. हातावर पाणी पडल्याबरोबर इतक्या उन्हांतनं कुठें निघालीस?"

पण श्यामानं तें ऐकलं न ऐकलंसं केलं, व "जायला पाहिजे." येवढंच म्हणून ती घराबाहेर पडली.

आपण येणार अशाबद्दलचं पत्र तिनं शरद्‌ला लिहिलं नव्हतं. प्रतिज्ञा कचेरींत अकस्मात् प्रगट होऊन त्याला चकित करण्याचा तिनं बेत केला होता. तो या क्षणीं काय करीत असेल, व आपणांस पाहतांच कोणत्या उद्‌गारांनीं तो आपलं स्वागत करील, याबद्दल मनाशीं तर्क करीत ती वाट चालूं लागली. तिचीं पावलं झपाझप पडत होतीं, व तिच्या तोंडावर हास्य होतं.

सकाळीं गाडीवर तिला निरोप देतांना अशोक म्हणाला होता, "पोंचल्याचं पत्र धाड असं तुला सांगतच नाहीं मी."

"तें कां?" तिनं विचारलं होतं.

"पुण्यास गेल्यावर तुला आमची आठवण देखील राहणार नाहीं याबद्दल खात्री आहे माझी."

"वा रे वा! असं कसं म्हणतोस?"

"खोटं कीं काय? शरद् एक दिवस इथें आला होता तर माझ्या वांट्याला पांच मिनिटंसुद्धां आली नव्हतीस तूं, हें तूं विसरली असलीस तरी मी नाहीं विसरलों."

"अन् ते पुण्यास परत गेल्यावर पंधरा दिवस तुझ्यासाठीं राहिलें हें मी पण विसरूं द्यायची नाहीं तुला!"

"पण ते पंधरा दिवस केव्हां सरले तें मला कळलंसुद्धां नाहीं, अन् आतां तूं निघालीस तर वाटतंय किती थोडं राहणं झालं तुझं. आणखी रहा म्हणून आग्रह करणार होतों तुला, पण इकडे या अन् मला अशोकच्या छळांतून सोडवून घेऊन चला असं तूं शरद्ला पत्रंच लिहिलं असतंस मग—" असं म्हणून तो हसला होता.

तिनं मान वेळावून उत्तर दिलं होतं,

"इश्श, त्यांना कशाला लिहिलं असतं? माझी मी निघून जायला खंबीर नव्हतें कीं काय तुझ्या छळांत सापडल्यासारखं वाटलं असतं तर!"

"मग अजून बेत बदल. रहा आणखी आठ दिवस. काढूं का सामान डब्याखालीं?" त्यानं मिस्किलपणानं विचारलं होतं.

ती हसून म्हणाली होती, "वा, आतां कसा बेत बदलतां येईल मला? काल रात्रीं मुद्दाम पार्टी करून तूं मला जाहीर निरोप दिलास ना?"

"अरे हो, खरंच." अशोक डोकं खाजवल्यासारखं करून

म्हणाला होता, "चुकलंच तें माझं. पण तुला आमची पार्टी आवडली कीं नाहीं?"

"फार आवडली." ती झटकन् म्हणाली होती.

खरंच पार्टीच्या वेळचे तिचे दोन तास अतिशय आनंदांत गेले होते.

अशोकनं त्या पार्टीची व्यवस्था 'चर्च गेट रिक्लेमेशन'वर राहणाऱ्या आपल्या एका मित्राच्या 'फ्लॅट'वर केली होती, व आपल्या शेलक्या वीस पंचवीस मित्रांना निमंत्रण दिलं होतं. त्यांत दोघे तिघे मुसलमान होते, दोघे ख्रिश्चन होते, तीन चार पारशी होते. त्यांची ओळख करून देण्याच्या वेळीं अशोक तिला हसून म्हणाला होता, "आमची सगळ्यांची जात एकच— कलावंत." त्या परिवारांत चार पांच स्त्रियाहि होत्या. त्यांतली एक पोरसवदा ज्यू होती. ती म्हणे मार्च महिन्यांत हिटलरनं ऑस्ट्रिया-वर चढाई केली तेव्हां तेथून पळून आलेली होती. तिनं तिकडे चित्रकलेंत प्रावीण्य संपादन केलं होतं, व मुंबईस आपल्या चित्रांचं छोटंसं प्रदर्शन चार पांच दिवसांपूर्वींच उघडलं होतं. त्या सर्व मंडळीच्या हास्यविनोदानं व गप्पांनीं आधुनिक पद्धतीचा तो प्रशस्त दिवाणखाना दोन तास गजबजून गेला होता. कुणी जादूचे प्रयोग करून दाखविले, कुणी गाऊन दाखविलं, अन् एकानं चार्ली चॅप्लिनसारखा वेष करून जमिनीवरच काल्पनिक तारेवरची कसरत करून दाखविली तेव्हां सर्वांची हसतां हसतां मुरकुंडी वळली होती. ऑस्ट्रियांतून आलेल्या त्या ज्यू मुलीनं एकाचा तळहात पाहून भविष्य सांगितलं तेव्हां तो चकितच झाला, अन् मग साऱ्यांनींच हात पुढें करून "माझा पहा, माझा पहा" म्हणत तिला गराडा घातला होता. ती स्वतः आपल्या

जागेवरच बसून राहिली होती. पण अशोकनं तिचा हात पकडून तिला उठवलं होतं व तिला त्या ज्यू मुलीपुढें नेऊन म्हटलं होतं,

"हिचा हात बघ."

त्या मुलीनं खवचटपणानं विचारलं होतं, "हिच्यावर तुझं प्रेम जडलं आहे कीं काय?"

अशोक म्हणाला होता, "फार जडलंय्, पण काय करूं, ही माझी बहीण आहे."

तें ऐकून सारेजण खो खो हसत सुटले होते.

मग त्या ज्यू मुलीनं तिचा हात हातीं घेतला होता व न्याहाळून पाहतां पाहतां ती म्हणाली होती,

"तूं फार महत्त्वाकांक्षी आहेस. सामान्य पुरुषाचं प्रेम तुला रुचायचं नाहीं."

श्यामानं फक्त हसत मान हालविली होती. तिच्या मनांत आलं होतं, बहुधा प्रत्येक मुलीला ही हेंच सांगून खुष करीत असेल.

परंतु ती ज्यू मुलगी पुढें म्हणाली होती,

"तुझी ज्यावर फार भक्ति आहे असं एक माणूस फार दूर साता समुद्रापलीकडे होतं का इतके दिवस?..."

होतं नव्हे, अजूनहि आहे असं म्हणायची जबरदस्त इच्छा श्यामाला झाली होती; पण ती कांहींच बोलली नव्हती. फक्त आत्यंतिक जिज्ञासेची नजर तिनं त्या मुलीकडे टाकली.

ती पुढें म्हणाली, "...तें माणूस इकडच्या वाटेवर आहे आतां; तुझ्या जवळ जवळ येतं आहे..."

आपला असल्या सामुद्रिकावर विश्वास आहेसं लोकांना वाटावं अशी श्यामाची इच्छा नव्हती. तिचा मनापासून विश्वास नव्हताहि.

पार्टीच्या वेळेस असल्या गोष्टी केवळ गंमत म्हणून चालतात हेंहि तिला माहीत होतं.

त्यामुळें " थँक यू " असं त्या ज्यू मुलीला हसत म्हणून तिनं आपला हात काढून घेतला होता, व दूर होऊन ती दुसऱ्या घोळक्याच्या हास्यविनोदांत मिसळली होती.

पण त्या मुलीनं जें सांगितलं तें तिच्या मनांत घोळत राहिलं होतं. तिला तें एखाद्या अद्‌भुत चमत्कारासारखं वाटलं होतं. शरद् भेटल्याबरोबर त्याला पार्टीची ही सारी हकीगत ती सांगणार होती.

अन् त्या हकीगतीप्रमाणेंच गेल्या पंधरा दिवसांतल्या आणखी किती तरी इतर गोष्टी.

त्या तिच्या मनांत आतां येत होत्या, व त्यामुळेंच चालतां चालतां ती स्वतःशीं हसत होती.

" प्रतिज्ञा " कचेरींत ती पोंचली तेव्हां पुढच्या दालनांत बापू शेवडे बसला होता; त्यानं हातांतल्या प्रुफांसकट हात जोडून तिला नमस्कार केला. त्याच्या नमस्कार करण्याच्या तऱ्हेंतच " कमाल केलीत " असा अभिप्राय स्पष्ट होता.

श्यामानं हसून विचारलं, " कां ? "

" कां काय ? तुमचं हें रजेवर जाणं कीं काय म्हणायचं ? आम्ही इकडे कामाखालीं जेरीला आलों आहोंत, अन् तुम्ही तिकडे मुंबईला खुशाल तीन आठवडे—"

" असं म्हणतां होय ? " श्यामा हसून म्हणाली, " बरं, आतां द्याल तितकं काम संभाळून तुम्हांला विसांवा देणार आहे मी. अगदीं या क्षणापासून ! "

" फार छान. मग घ्या तर हीं प्रुफं अन् तपासा. बाहेर जाऊन चहा केव्हां घेईन असं झालंय मला."

असं म्हणून त्यानं हातांतलीं प्रुफं तिच्यापुढें धरलीं.

त्याच्या त्या बोलण्याचं श्यामाला फार हसूं आलं. तिनं प्रुफं हातीं घेतलीं, व तो खुर्चीच्या पाठीला लावलेला आपला कोट काढूं लागला तेव्हां ती म्हणाली,

" पण...हें...? "

" काय ? "

पार्टिशनच्या आंतल्या बाजूकडे बोटानं खुणवून श्यामानं नेत्र-पल्लवी केली. आंत शरद् आहे काय असा तिचा अर्थ होता तो बापूच्या लक्षांत आला. त्यानंहि मानेनंच सांगितलं, नाहीं.

" अजून आलेच नाहींत ? " श्यामानं विचारलं.

" आला होता. पण बंगलोरचे एक मराठा गृहस्थ त्याच्याकडे आले होते त्यांच्याबरोबर मघांशी गेला. आमच्या 'सावधान संघा'च्या नमुन्यावर तिकडे एक संघ स्थापन करण्याची त्या गृहस्थांची इच्छा आहे. असा गृहस्थ भेटल्यावर शरद्ची त्याची दोस्ती व्हायला काय अवकाश ? राममंदिराच्या चळवळीचा वृत्तान्त त्या गृहस्थानं वर्तमानपत्रांत वाचला होता. त्याबद्दल तो विचारूं लागला तेव्हां शरद म्हणाला, चला, तुम्हांला मंदिरच दाखवतों, अन् त्यांना घेऊन गेला. जातांना उद्यांच्या अंकांतल्या अग्र-लेखाचीं हीं प्रुफं तपासायसाठीं दिलीन् माझ्याजवळ. तीं तपाशीत होतों इतक्यांत तुम्ही आलांत! आतां तीं तपासा तुम्ही!"

" बरं बरं. आपण सावकाश चहा पिऊन या."

ती हसली, व पार्टिशनच्या आंत जायसाठीं वळली.

बाहेर पडतां पडतां बापू म्हणाला,

"शस्त्रधारणाच्या प्रश्नाबद्दलचे मागचे दोन अग्रलेख कसे वाटले तुम्हांला ?"

"अति सुंदर ! तुम्हांला ?"

"इतकं सुंदर आमच्या शरद्‌नंच लिहावं येवढंच म्हणतों. शरद्‌चा हा अखेरचा लेख तर अगदीं अप्रतिम झाला आहे."

"होय ?"

"पाहा." असं म्हणून बापू गेला.

श्यामा आंतल्या भागांत गेली, व एका खुर्चीवर बसली.

तिनं इकडे तिकडे पाहिलं.

शरद्‌वांचून ती जागा अगदीं ओकीओकी वाटली तिला. त्याच्या रिकाम्या खुर्चीकडे पाहत ती मनाशीं म्हणाली, 'आम्हीं इतक्या ह्यानं यावं, अन् तुम्हीं नसावं काय ? बऽऽरं !'

अंतःकरणांत एकदम जडपणा आल्यासारखं तिला झालं.

हा अनुभव तिला नवा होता. त्यांत एक सूक्ष्म चमत्कारिक सौख्यहि होतं !

ती कांहीं वेळ टेबलावर दोन्ही कोपरं टेकून तशीच बसली !

पण मग भानावर येऊन तिनं शरद्‌च्या अग्रलेखाची प्रुफं वाचण्यास प्रारंभ केला.

पहिले दोन परिच्छेद वाचतांना मुद्रणदोष दुरुस्त करण्याचं अवधान तिनं राखलं. पण नंतर शरद्‌च्या प्रतिपादनाकडेच तिचं चित्त इतकं वेधलं गेलं कीं तिच्या हातांतला टाक हातांत तसाच राहिला व ती पुढें पुढें वाचीत गेली.

शरद्‌नं लिहिलं होतं,

"...कांहीं माणसें असें म्हणतांना आम्हांला आढळलीं आहेत, कीं आजघटकेला निःशस्त्र प्रतिकारानेंच झगडून राजकीय

स्वातंत्र्य मिळविण्याची प्रतिज्ञा राष्ट्रानें केली आहे ना? सशस्त्र युद्ध करून क्रांति घडवून आणण्याचा कार्यक्रम अशक्य, अव्यवहार्य व अनिष्ट म्हणून आपण दूरच ठेविला आहे ना? मग आज हातांत शस्त्र धारण करण्याचें प्रयोजन काय? आपण कायद्यानें निःशस्त्र झालों असलों तरी बिघडलें कोठें? आपलें स्वातंत्र्याचें उद्दिष्ट साधण्यासाठीं आपल्याला शस्त्र वापरावयाचेंच जर नाहीं, तर आपल्या हातीं शस्त्र नाहीं याची खंत वाटण्याचें कारण काय? ज्या वेळीं सशस्त्र प्रतिकाराच्या मार्गानें जावयाचें ठरविणें आपणांस भाग पडेल त्या वेळीं शस्त्राची भाषा बोलतां येईल, शस्त्र धारणाच्या मूलभूत हक्काबद्दल जनतेंत जागृति करतां येईल, शस्त्रें वापरतां येतील! या कल्पनांचा आज प्रचार हवा कशाला?

परंतु ही विचारसरणी अनेक दृष्टींनीं चुकीची आहे.

पहिली गोष्ट ही कीं आपलें स्वातंत्र्याचें उद्दिष्ट साधण्यासाठीं आपल्यास शस्त्र वापरावयाचें नाहीं असें आपण ठरविलें–स्वेच्छेनें, राजीखुषीनें, तत्परतेनें ठरविलें, व म्हणून आपल्या हातीं आज शस्त्र नाहीं, असें नव्हे. तर हातीं शस्त्र नाहीं म्हणून आपण तसें ठरविलें आहे! सशस्त्र युद्ध व निःशस्त्र प्रतिकार हे दोन्ही मार्ग आपल्या-पुढें खुले होते, व आपण निःशस्त्र प्रतिकाराचा मार्ग अधिक चांगला ठरवून पत्करला असें नव्हे, तर एक मार्ग बंदच दिसला म्हणून आपण दुसऱ्या मार्गानें निघालों आहोंत! आणि दुर्दैव असें कीं त्या मार्गानेंच चालण्याची सवय झाल्यामुळें शस्त्रसज्जता हा जिवंत राष्ट्रांतल्या प्रत्येक नागरिकाचा जन्मसिद्ध हक्क आहे या गोष्टीची आपली आठवणदेखील बुजली आहे!

दुसरी गोष्ट अशी कीं सशस्त्र युद्धाचा प्रसंग कधीं काळीं यावयाचाच असेल, तर तो येईल तेव्हां घेतां येईल हातीं शस्त्र,

हा कोटिक्रम भ्रामक आहे. शस्त्र म्हणजे कांहीं ताडपत्राचा पंखा नव्हे कीं उकडावयास लागेल तेव्हां हातीं घ्यावा आणि हालवावा! एखाद्या मंत्राचे शब्द वेळ येतांच मुखावाटे बाहेर पडावेत यासाठीं त्यांचा जप अहर्निश करावा लागतो! शस्त्र म्हणजे देखील एक अमोघ मंत्रच आहे. त्याची नित्य उपस्थिति असल्यावांचून संकट-काळीं तें नीट चालवितां येणार नाहीं! शस्त्रांचेंच कशाला, साध्या शरीरबलाचेंहि असेंच आहे. हात उगारून तडाखा लगावायची, अगर पाय उचलून ठोकर देण्याची सवय ज्याला नाहीं, तो काय आयत्या वेळीं त्या गोष्टी करूं शकेल? आत्मसंरक्षणाचा क्षण प्राप्त झाल्यावर एखाद्याच्या हातीं जंबिया दिला, व त्याला खूप सांगितलें कीं हूं, चालव शस्त्र, या वेळीं तुला परवानगी आहे हिंसा करण्याची, तरी तो काय चालविणार तें शस्त्र! जंबिया कोणत्या बाजूनें धरावयाचा याचाच निश्चय त्याला आधीं मनाशीं करावा लागेल, व तेवढ्यांत संकटाला त्याच्या प्राणांचा बळी पडूनहि जाईल!..."

याप्रमाणें श्यामा वाचीत गेली.

अग्रलेखाच्या अखेर अखेरच्या भागांत युरपमध्यें पेटूं पाहणाऱ्या महायुद्धाच्या वणव्याच्या चिन्हांचं वर्णन शरद्नं मोठ्या चित्तवेधक शैलीनं केलं होतं; आणि हिंदुस्थानच्या प्रतिष्ठेच्या व सामर्थ्याच्या दृष्टीनंच नव्हे तर इंग्लंडच्याहि हिताच्या दृष्टीनं "आमच्या हातीं शस्त्र द्या" अशी हिंदी लोकांनीं जोराची मागणी करणं किती आवश्यक आहे व त्यासाठीं सबंद राष्ट्रभर प्रचंड चळवळ कशी करतां येईल इत्यादि गोष्टी तर शेवटच्या परिच्छेदांत अत्यंत आवेशपूर्ण शब्दांत त्यानं पुढें मांडल्या होत्या!

लेख वाचून पूर्ण झाला तरी कांहीं वेळ ती त्यांतील प्रभावी विचारसरणीच्या तंद्रींत तशीच बसून राहिली !

मग तिला आठवण झाली, कीं अरे, आपल्याला नुसतं वाचायचं नव्हतं, प्रुफं तपासायचीं होतीं.

तिनं हातांतला टाक दौतींत बुडवून घेतला, अन् ती तिसऱ्या परिच्छेदापासून पुन्हा वाचूं लागली.

खालून छापखान्याचा माणूस येऊन तिच्यापुढें उभा राहिला व प्रुफं तपासलीं असलीं तर द्या म्हणाला, तेव्हां तिनं प्रुफं तपासून टेबलावर ठेवलेलीं होतीं. पण तिनं तीं दिलीं नाहींत. ती म्हणाली,

" शरद्नीं तीं एकदां पाहिलीं पाहिजेत असं मला वाटतं. ते येतीलच इतक्यांत."

अग्रलेखाचा शेवटचा भाग वाजवीपेक्षां कडक झाला आहे कीं काय, व त्या लिहिण्यानं सरकारी रोषाचं संकट तर उद्भवणार नाहीं, अशी कल्पना प्रुफं वाचतांना तिच्या मनांत आली होती. तो तेवढा भाग तिनं पुन्हा तिसऱ्यांदा वाचला होता अन् तिला वाटलं होतं, आपल्या मनांत जें आलं तें शरद्ला सांगावं हें चांगलं. त्याच्या मतानं आपण भित्र्या ठरलों तर ?...ठरलों तरी हरकत नाहीं. पुढें खरंच कांहीं संकट निर्माण झालं तर असं वाटायला नको कीं शरद्ला सावध करण्याचं कर्तव्य आपण केलं नाहीं म्हणून असं झालं...

बाहेर पावलं वाजलीं.

त्याची चाहूल तिनं आतां दुरूनहि ओळखली असती.

टेबलावर पडलेलं एक वर्तमानपत्र तिनं झटकन् उचलून हातीं घेतलं, अन् तोंड लपविलं.

" अरे ! " तिला पाहतांच शरद् आश्चर्यानं म्हणाला, " मुंबई केव्हां आली ? "

तिनं वर्तमानपत्र खालीं केलं. तिच्या तोंडावर साहजिकच हास्य उमटूं लागलं. पण त्याच्याशीं जरा खोटं भांडण करायची तिची इच्छा होती. ती आली त्या वेळीं त्यानं हजर असायला नको होतं काय ? म्हणून हसण्यानं विलग होऊं लागलेले ओठ प्रयत्नानं दाबून " राहूं द्या ! आपल्या त्या तसल्या बघण्यानं मला नका हसवूं " अशा अर्थानं तिनं मानेला झटका दिला.

असल्या कलहक्रीडेंत शरद् निपुण नव्हता. तिच्या त्या मानेच्या झटक्याचा अन् नजरेंतल्या अवखळ रोषाचा अर्थच त्याला नीटसा कळला नाहीं. त्यानं आपल्या खुर्चीवर बसतां बसतां हसून विचारलं,

" सकाळच्या एक्सप्रेसनं निघालां असाल ? कळवलं नाहींत मला येणार म्हणून ? "

" कळवायचं काय ? स्टेशनवर मला उतरवून घ्यायला या असं थोडंच लिहायचं होतं ! "

अरे बापरे !...आतां शरद्च्या डोक्यांत उजेड पडला कीं भांडायची लहर आलेली आहे !...आतां कशा तऱ्हेनं बोललं पाहिजे हें अजमावीत तो क्षणभर स्तब्ध राहिला.

" अन् कळवलं नाहीं त्याबद्दलची शिक्षा भोगलीच कीं. तासभर वाट पाहत बसलें आहे इथें !" असं म्हणतांना तिनं आपल्या कपाळाला आठ्या घातल्या होत्या.

शरद्च्या मनांत आलं, अस्सं, एकूण आपण बाहेर गेलों होतों याबद्दल ही सारी गोड धुसफुस आहे तर !...

तो एकदम मोठ्यांदा हसूं लागला.

श्यामानं त्याच्याकडे नजर टाकली. आपल्या कपाळावरच्या आठ्या उलगडूं नयेत असा तिनं जोराचा प्रयत्न केला. मघांच्या-सारखा मानेला झटकाहि दिला. पण मग एकदम तिचं तिलाच हसूं लोटलं.

हसणं थांबलं तेव्हां रागाचं खोटं अवसानहि संपलं होतं. आठवण झाल्यासारखं करून ती म्हणाली,

" तुमच्या अग्रलेखाचीं प्रुफं तपासा आधीं. खालीं खोळंबा झालाय. मीं तपासलीं आहेत, पण तुम्ही एकदां पाहा. विशेषतः त्यांतला शेवटचा भाग."

" होय ? " असं म्हणत तिनं पुढें केलेलीं प्रुफं त्यानं हातांत घेतलीं, व तो वाचूं लागला.

श्यामा स्वस्थ बसली. तिनं खोलींत इकडे तिकडे पाहिलं तों आतां मघांसारखी ती जागा तिला ओकीओकी वाटली नाहीं. आतां किती निराळी वाटत होती ती जागा ! प्रकाशानं, उल्हासानं भरल्यासारखी !

त्यानं वर पाहिलं तेव्हां त्याच्याकडे लावलेली नजर तिनं झटकन दूर केली. तरी ती थोडीशी सापडलीच. आपला संभ्रम लपविण्यासाठीं तिनं हसत विचारलं,

" वाचलंत ? "

" हं. ठीक आहे कीं. कां सांगितलंत मला वाचून पाहायला ? "

श्यामानं आपल्या मनांतली शंका त्याला सांगितली, व म्हटलं, " मला भित्री म्हणाल तुम्ही, पण—"

" छे, भित्री कसं म्हणेन मी ? " तो चटकन् म्हणाला.

" पण आपलं वाटतं कीं उगीच कां संकट ओढवून घ्यावं ? "

" इतकं कडक लिहायलाच पाहिजे असा हा प्रश्न आहे.

शक्यतों जपून लिहिलं आहे मीं. आतां त्यांतूनहि संकट निर्माण झालं तर डगमगून कसं चालेल? नाहीं का?—जाऊं देत प्रुफं खालीं."

तो हसला. त्याच्या वृत्तीचं कौतुक मनाशीं करीत तिनंहि हसून त्याच्याकडे पाहिलं. छापखान्याचा माणूस पुन्हा प्रुफांसाठीं वर आला, व तीं घेऊन गेला.

"किती दिवसांनीं तुम्ही इथें आलांत ठाऊक आहे का?" शरद्नं विचारलं, "फार रमलां होतात तिकडे मुंबईस? किती चित्रं तयार केलीं अशोकनं?"

"पांच."

"होय? सगळीं विकलीं गेलीं का?"

श्यामानं हसून मान हालवली.

"म्हणजे तुमच्या वांट्याला दोन अडीच हजार रुपये आले असतील!"

श्यामा म्हणाली, "शीः! मी घेणार का आहे माझा वांटा अशोकपासून? विनोदानं बोलण्यापुरतंच तें!"

"बरं आम्हांला गमती तरी सांगा कीं मुंबईच्या."

"खूपच सांगायच्या आहेत. घरीं येतां? आतां इथें काम नाहींच आहे. येतां?"

"हं जाऊं या. कारण आज ऐकल्या नाहींत तुमच्या गोष्टी तर मग आणखी दहा दिवस वाट पाहावी लागेल आम्हांला." असं म्हणत त्यानं उठून कोट चढविला.

श्यामा उठून खालीं वाकून चपला पायांत सरकवीत होती. तिनं एकदम वर पाहून विचारलं,

"म्हणजे काय?"

" आज बंगलोरला जाणार आहे मी."

तो हसला तरी ती हसली नाहीं.

" हं, मी जाऊं देतेंय !..." असं पुटपुटून तिनं मान वेळावली.

" बंगलोरचे ते पाहुणे आले आहेत ना ? त्यांचं—"

" मला कांहीं ऐकूं येत नाहीं !" असं म्हणून श्यामानं दोन्ही कानांवर हात टेकले.

शरद् तें पाहून मोठ्यांदा हसूं लागला.

  

बापू शेवडेकडून आलेली ती चिठी वाचून श्यामा स्तंभितच झाली. क्षणभर तिच्यांतल्या मजकुराचा अर्थच तिला कळेना !

" तारीख ५ जूनच्या 'प्रतिज्ञे'चे अंक जप्त करून नेण्यासाठीं सरकारी अंमलदार वॉरंट घेऊन आले आहेत ! शरद्ला तार करावी काय ? तुम्ही असाल तशा इकडे कचेरींत निघून या."

ती वाटेनं गेली ती एखाद्या भ्रमिष्टासारखीच.

आणि ती कचेरींत पोंचली व तिला बापू भेटला तेव्हां तिला कळलं कीं, केवळ अंकाच्या जप्तीचंच संकट नव्हतं.

ता. ५ जूनच्या अंकांतील लेखाबद्दल प्रेस इमर्जन्सी पॉवर्स ॲक्टाखालीं सरकारनं प्रतिज्ञेकडून दोन हजार रुपयांचा जामीन मागितला होता !

सरकारी अंमलदार व शिपाई निघून गेल्यावर बापू म्हणाला,

" केवढं संकट हें ! शरद्जवळ तर एक पैसा सुद्धां नाहीं. त्यानं

होता नव्हता तेवढा पैसा सावधान संघांत अन् प्रतिज्ञेंत घालून टाकला आहे. आतां कसं करायचं? शरद्ला तार करूं या काय?"

"नको. तिकडचं काम टाकून त्यांना इकडे यायला लावणं बरं नाहीं. नाहीं तरी चारच दिवस अवकाश आहे त्यांना यायला. तार गेली कीं चिंता केवढी वाटेल त्यांना..."

"पण मग तो येईपर्यंत जामिनाच्या रकमेची व्यवस्था..."

"करूं आपण; काढूं कांहीं तरी मार्ग. आपण धीर सोडला तर शरद्ना आवडेल का?"

बापू तिच्याकडे पाहतच राहिला!

तिच्या धैर्याचं त्याला अतिशय आश्चर्य वाटलं.

आणि दुसऱ्या दिवशीं ती त्याच्या घरीं गेली, व दोन हजार रुपये त्याच्या हातीं ठेवून म्हणाली, "हे संभाळा. शरद्ना द्या. मला उद्यां सकाळीं मुंबईस जायला हवं." तेव्हां तर त्याच्या आश्चर्याला सीमाच उरली नाहीं.

तो हळूच म्हणाला, "पण मला नीट सांगा तरी. शरद्नं विचारलं तर—"

"सांगतां येण्यासारखं नाहीं तुम्हांला. माफ करा." येवढंच हसत म्हणून तिनं त्याचा निरोप घेतला.

ती त्याला खरंच काय सांगणार?

अशोकला तिनं काल तार केली होती, माझे दोन हजार रुपये मला उलट तारेनं पाठव. त्याच्याकडून आज ते आले होते!

आणि आजच्या 'टाइम्स'मधें तिनं वाचलं होतं कीं शुक्रवारीं मुंबईस दाखल होणाऱ्या "रूझवेल्ट" बोटीवरच्या बड्या उतारूंत महाराजा ऑफ विद्यापुरम् होते. तें वाचल्याबरोबर तिनं मुंबईस जाण्याचा निश्चय केला होता.

ती मुंबईस पोंचली त्याच्या तिसरे दिवशीं रात्रीं जेवण झाल्यावर ती आपल्या खोलींत गेली न गेली तोंच अशोक धावत आला, व तिला म्हणाला,

" तुझा टेलिफोन आहे; पुण्याचा."

" छे ! " असा उद्‌गार काढून ती धावली.

टेलिफोन उचलून ती म्हणाली,

" मी श्यामा बोलतें आहे."

" मी शरद् ! "

" बंगलोरहून केव्हां आलांत ? "

" आजच ! तूं मुंबईस कां गेलीस ? "

" महत्त्वाचं काम आहे, परत आल्यावर सांगेन तुम्हांला. फार आनंद होईल ! "

" अन् श्यामा—"

तिची छाती धडधडूं लागली. त्यानं तिला नांव घेऊन अशी हाक प्रथमच मारली होती !...

" श्यामा ! "

" काय ? "

" हें तूं काय केलंस ? "

" काय केलं ? "

" दोन हजार रुपये काय म्हणून—"

" कां ? ते घ्यायला संकोच वाटतो होय ? किती वेडेपणा ? माझे म्हणजे तुमचेच कीं ! मी तुमची नाहीं का ?..."

" होय...तूं...माझीच !..."

जे शब्द ऐकण्यासाठीं तिचा जीव उत्कंठ व आतुर होता ते ऐकल्याबरोबर श्यामानं डोळे मिटले. ती स्वतःशीं पुटपुटली—

" तूं...माझीच..."

# १९

ती आगबोटीच्या 'डेक'वर कठड्याला रेलून उभी होती. वाऱ्याच्या झोतानं उडणारे केस ती सावरीत नव्हती, किंवा बोटीच्या अंगावर धडकणाऱ्या लाटा संतप्त नागांच्या फण्यांप्रमाणें आपलं मस्तक शक्य तेवढं उभारून मग खालीं कोसळतां कोसळतां फुत्कारल्यासारखं करून पाण्याचे जे फवारे फेकीत ते तोंडावर पडले तरी ती ते पुशीत नव्हती...

" सारं अंग भिजवून घ्यायचंय वाटतं तुला ! पुरे झालं इथं उभं राहणं. चल, केबिनमध्यें जाऊं...."

तिनं मानेनं नको म्हटलं. तो इतका सुद्धां दूर नसावा असं तिला वाटलं. त्याच्या कमरेभोंवतीं हात टाकून त्याला जवळ ओढण्याचा विचार मनाशीं करीत तिनं हसत त्याच्याकडे पाहिलं. पण — काय आश्चर्य ! तो एकदम तेथून नाहींसा झाला ! तिनं बावरून इकडे तिकडे बघितलं तेव्हां दूर अंतरावर त्याची पाठमोरी आकृति तिला दिसली.

तिनं ओरडून विचारलं, " शरद् ! शरद् ! कुठें निघालास ? "

त्यानं वळून म्हटलं, " आनंदराव कुठें दिसत नाहींत, त्यांना शोधून आणतों," अन् तो दिसेनासा झाला !

तिनं उजव्या हाताला पाहिलं तों तिचे वडील मघांपासून उभे होते तसेच उभे असलेले तिला दिसले !

मग त्यांना शोधून आणायला कुठें गेला हा शरद् ?... "

" शरद् ! " अशी तिनं हाक मारली, अन् तिनं पुढें पाऊल टाकलं.

तितक्यांत विलक्षण गार खारट वाऱ्याचा झोत तिच्या अंगावरून गेला, लाटेच्या पाण्याची चूळ तोंडावर आपटली, अन् आगबोटीला भला मोठा हेलकावा बसून ती खालीं पडली...

तिला वाटलं डेकवर आपण गरंगळत जाणार ! ती ओरडली. पण आपला आवाज आपल्यालाच कसा ऐकूं येईना याचं तिला विलक्षण आश्चर्य वाटलं. तिनं पुन्हा ओरडून पाहिलं—

त्याच क्षणीं ती जागी झाली. तिनं एकदां साशंक दृष्टीनं इकडे तिकडे पाहिलं. पण मग तिची खात्री झाली कीं आपण आपल्या अंथरुणावर आहोंत.

आगबोटीचं 'डेक', आपले वडील, शरद्—हें सारं स्वप्नच होतं तर !

मात्र स्वप्नांतल्या त्या गार वाऱ्याचा, अन् अंगावर येणाऱ्या पाण्याच्या फवाऱ्याचा प्रत्यक्षाशीं थोडा संबंध होता !

कारण बाहेर पाऊस धो धो पडत होता, अन् वाऱ्याचे वाकडे तिकडे गार झोत घोंगावत खिडकींतून आंत शिरतांना पाऊसपाण्याचे तुषार बरोबर आणून तिच्या अंगावर फेकीत होते.

काल निजण्यापूर्वीं श्यामानं खिडकींतून बाहेर पाहिलं तेव्हां आभाळ ढगांनीं खचलेलं तिला दिसलं होतं. वारा अगदीं

पडलेला होता. दूर अंतरावरच्या समुद्रतीरावरच्या नारळींचे झुपकेबाज माथे अगदीं निश्चल दिसले होते. सारी हवा उबल्यासारखी झाली होती. एखादं हिंस्र श्वापद पुढच्या पायांत तोंड लपविलेलंच ठेवून गुरगुरावं तद्वत् मधूनच मेघगर्जना होत होती, ती इतकी अस्पष्ट कीं तिची दिशाहि धड कळत नव्हती. पण बरसात सुरू मात्र झाली नव्हती.

ती पहाटे केव्हां तरी सुरू झाली असली पाहिजे. अन् आतां तर तिला पावसाळ्यांतल्या पहिल्या वादळी वृष्टीचं स्वरूप आलं होतं. मृगनक्षत्राचे दहा दिवस जवळ जवळ कोरडे गेले होते. अन् जणूं त्या चुकीची भरपाई करण्यासाठींच पर्जन्य धाडधाड कोसळत होता. दिशा धुंद झाल्यामुळें खोलींत धड प्रकाशहि दिसत नव्हता. पण उजाडलं होतं खास. कारण अशोकची आई बालूला ओरडून सांगत होती "परटाकडून कपडे आणायचं लक्षांत आहे ना तुझ्या? आठ वाजायच्या आंत—"

श्यामा मग अंथरुणांत रेंगाळली नाहीं.

तावदान ओढून बंद करण्यासाठीं ती खिडकीजवळ गेली. बाहेर संततधार लागली होती. वर आभाळांत निळ्या रंगाची बोटभर देखील फट दिसत नव्हती, किंवा रेखीव ढगही दिसत नव्हता. सारंच आकाश मेघरूप झाल्यामुळें गडद धुरकट रंगाखेरीज वर कांहींच उरलं नव्हतं, अन् पृथ्वीवरच्या सबंद नभोवितानाला गळती लागल्याप्रमाणें झालं होतं. समुद्राकडच्या नारळींच्या आकृती जलधारांच्या पडद्याआडून काळ्या छायांसारख्या भासत होत्या. अलीकडच्या रुंद डांबरी रस्त्याचं काळंभोर अंग स्वच्छ धुऊन निघालं होतं. रहदारी अगदीं थंड पडली होती.

श्यामाला तें दृश्य आवडलं नाहीं.

तिला हा दिवस असा उजाडायला नको होता; जिकडे तिकडे सूर्यप्रकाश भरलेला आहे, पक्ष्यांची किलबिल चालली आहे, माणसं धावतपळत आहेत, रस्ते गजबजले आहेत, असा आजचा दिवस तिला असायला हवा होता.

कारण आज तिचे वडील तिला भेटणार होते !

दहा बारा तासांचाच काय तो अवधि मधें उरला होता. तेवढा सरला कीं अठरा वर्षांची ताटातूट संपणार होती, आपल्या वडिलांचं प्रत्यक्ष दर्शन ती घेणार होती, ज्या भेटीच्या क्षणाची तिनं उत्कंठेनं प्रतीक्षा केली होती, तो विलक्षण हर्षाचा क्षण येणार होता !

त्या भेटीबद्दल तिच्या मनांत आतां किंचित्‌हि शंका उरली नव्हती.

अशोकनं तिला कल्पनेपलीकडे साहाय्य केलं होतं.

शुक्रवार ता. १७ जूनला मुंबई बंदरांत दाखल होणाऱ्या 'रूझवेल्ट' बोटीनं येणाऱ्या उतारूंत महाराजा ऑफ विद्यापुरम् आहेत ही बातमी 'टाइम्स'मधें वाचल्याबरोबर ती पुण्याहून निघाली होती ती सर्वस्वी उतावळेपणानं. महाराजा ऑफ विद्यापुरम् येताहेत, व त्यांच्याबरोबर आपले वडील असण्याचा फार संभव आहे, तेव्हां आपण आतां मुंबई गाठली पाहिजे येवढीच तिची कल्पना होती, अन् त्या कल्पनेच्या भरांत ती मुंबईस निघाली होती.

परंतु मुंबईच्या गाडींत बसल्यावर, अन् तिचं मन जरा स्वस्थ झाल्यावर तिला वाटूं लागलं, आपले वडील महाराजांबरोबर येत

आहेत हें जरी गृहीत धरलं तरी आपल्याला त्यांची गाठ कशी घेतां येणार ? आपण काय सरळ बंदरावर जाऊन "मला विद्यापुरम्च्या महाराजांना भेटायचं आहे" असं म्हणणार आहोंत ? (इंग्लंड-अमेरिकेहून येणाऱ्या बोटी कुठल्या बंदरावर येतात हें देखील तिला माहीत नव्हतं! 'भाऊचा धक्का' तिनं ऐकला होता. पण तिथें का येत असतील त्या ?... ) अन् समजा विद्यापुरम्चे महाराज भेटले तर त्यांना आपण असं का म्हणणार आहोंत, "तुमच्याबरोबर तिलकानंद आहेत ते माझे वडील! त्यांची माझी भेट करवून द्या ?..."

छे छे, इतकी ती वेडी नव्हती...

आजपर्यंत आपल्या वडिलांचा शोध तिनं एकटीनं केला होता. पण आतां ती एकटी कांहीं करूं शकत नव्हती. सिनूकाका तिकडे चांदणीला होते. त्यांचा कांहीं उपयोग नव्हता. ... शरद् ? ... आपल्या वडिलांची हकीगत तिनं त्याला सांगितली होती. तो आज जवळ असता तर ती एकटी मुंबईस निघालीच नसती. पण तो बंगलोरला होता ... अन् तिला कुणाचं तरी साहाय्य घेणं तर आवश्यक होतं ... तिनं साहजिकपणेंच ठरविलं होतं कीं अशोकला आपल्या वडिलांच्या साऱ्या गोष्टी सांगून टाकायच्या, अन् त्याची मदत घ्यायची.

ती डॉक्टरकाकांच्या बंगल्यावर पोंचली तेव्हां अशोक घरांत नव्हता. तो घरीं आला तेव्हां बाहेर दिवाणखान्यांत त्याची चाहूल ऐकल्याबरोबर सैंपाकघरांत काकूंशीं बोलत बसलेली श्यामा बाहेर आली. "नमस्कार हो!" हे तिचे शब्द ऐकतांच रेडिओ लावण्यासाठीं वाकलेल्या अशोकनं चमकून वळून पाहिलं, अन् तिला बघतांच तो उद्गारला—

"म्हणजे काय ?"

"केलं कीं नाहीं चकित तुला ?" तिनं विचारलं.

"शरद्‌ला घेऊन आली आहेस कीं काय ?"

"अंहं. एकटीच..."

"मग विशेष नाहीं चकित केलंस."

"चल !" तिनं मानेला झटका देऊन डोळे वटारले.

"बरं, हें अकस्मात् आगमन किंनिमित्त म्हटलं ?"

त्याचं तें संस्कृत बोलणं ऐकून ती हसली, व त्याची नक्कल करून म्हणाली,

"आपल्या खोलींत गमन करूं म्हटलं! मग विदित करता येईल आगमनाचं प्रयोजन म्हटलं !"

"इत इतो देवी !" त्यानं दोन्ही हात पसरून अभिनय केला, व मग तीं दोघंहि हसत हसत त्याच्या खोलींत गेलीं.

त्यानं कोट काढला, अन् नेकटायची गाठ सोडीत विचारलं "खरंच कांहीं काम काढून आली आहेस ?"

"होय. अन् तें तुझ्याशिवाय दुसरं कुणीच करूं शकणार नाहीं असं आहे."

"म्हणजे काय ?"

"इथें बैस, म्हणजे सांगतें."

त्यानं पलंगावर तिच्याजवळ बसून सिगरेट पेटवली व काय अशा अर्थानं वर पाहिलं तेव्हां ती म्हणाली होती,

"आजपर्यंत आपल्या कुटुंबांतलं एक रहस्य तुला मीं सांगितलं नव्हतं, तें आज मी तुला सांगणार आहे..."

त्यानं किंचित् विस्मयानं तिच्याकडे दृष्टि टाकली होती, अन् मग तो तिचं बोलणं अगदीं लक्षपूर्वक ऐकूं लागला होता.

सारी हकीगत सांगिल्यावर ती थांबली तेव्हां तो उद्गारला होता, " किती विलक्षण ! "

आणि कांहीं वेळ स्तब्ध राहून मग तो म्हणाला होता,

" पण विद्यापुरम्च्या महाराजांबरोबर काका येणार हा तुझा केवळ तर्कच ? "

" तर्कच. पण त्या तर्काला भरपूर कारण नाहीं का ? "

" आहे." असं म्हणून तो पुन्हा गप्प राहिला होता.

तीहि गप्प बसली होती. पण ती स्तब्धता तिला नकोशी झाली तेव्हां तिनं विचारलं होतं,

" मग ? आतां कसं करूं या ?

" काकांचं नांव—म्हणजे तिलकानंद हें नांव उतारूंच्या संपूर्ण यादींत आहे कां पाहिलं पाहिजे."

" तें कुठें ? "

" मला माहीत आहे. उद्यां मिळवतों बघ सारी माहिती."

मग दुसऱ्या दिवशीं सकाळीं दहा वाजतांच तो व ती मुंबईस जायसाठीं घराबाहेर पडलीं होतीं.

आधीं फोर्टमधील " फोर्ब्स, फोर्ब्स, कॅंपबेल अँड को."च्या ऑफिसमधें तो तिला घेऊन गेला होता. तेथें 'रूझवेल्ट'वरील उतारूंची समग्र यादी त्यानं मिळवली होती. त्या भव्य इमारतींतल्या कामाच्या निःशब्द धांदलीकडे बघत श्यामा एका बाकावर बसली होती, तिच्याजवळ येऊन तो म्हणाला होता,

" ही बघ यादी."

मग त्यानं व तिनं डोक्याला डोकं लावून त्या यादींतलीं नांवं वाचलीं होतीं—

" टॅम्पेल, टेंपल मिस्टर अँड मिसेस, थॉम्सन..."

श्यामाचं अंतःकरण धडधडत होतं. तिच्या दृष्टीपुढें विरळ पडदा उभा राहूं लागला होता. तिलकानंद हें नांव नसलं तर आपल्याला मूर्च्छाच येईल अशा भयानं तिचे हात कापूं लागले होते.

पण तितक्यांत अशोक एका नांवावर बोट ठेवून म्हणाला होता,

"आहे. हें बघ."

होय. "तिलकानंद"—अगदीं स्पष्ट दिसलं होतं तिला तें नांव!

तिनं झटकन अशोकचं मनगट आपल्या हातांत घट्ट पकडलं होतं. कारण या आनंदानंहि आपल्याला एकदम मूर्च्छा येणारसं तिला वाटलं होतं.

मग अशोक तिला म्हणाला होता.

"तूं बसतेस जरा इथें? मी मॅनेजरला भेटून येतों. विद्यापुरमचे महाराज मुंबईत कांहीं दिवस राहणार असले तर त्यांची उतरायची व्यवस्था या कंपनीकडूनच झालेली असणार. आलोंच मी. बसतेस जरा?"

तो काय बोलला तें तिला धड कळलंच नाहीं. तो गेला येवढंच तिच्या लक्षांत आलं. भोंवतालच्या देखाव्याकडे शून्य दृष्टीनं पाहत ती बसून राहिली.

कारकून आपापल्या टेबलावर कामात गुंतले होते, पट्टेवाले पावलं न वाजवितां लगबगीनं कागदाचे जुडगे इकडे तिकडे पोंचवीत होते, बिनआवाजाच्या टाइपरायटिंग यंत्रांची दबलेली खटखट होत होती, मधेंच एखाद्या वरिष्ठ ऑफिसरच्या खोलींत घंटा ठण्‌दिशीं वाजत होती, किंवा तावदानी झुलतं दार लोटून कुणी बाहेर पडत होतं, उजव्या हाताकडच्या मोठ्या दारासमोर

खालून वर आलेला " लिफ्ट " क्षणभर थबकत होता अन् पुन्हा " सूंऽऽ " असा विचित्र आवाज करून खालीं जात होता, दहा वीस पंख्यांचीं फिरतीं पातीं उजेडांत चमकत होतीं...

श्यामाच्या आत्तां प्रथमच लक्षांत आलं कीं तिच्या डोक्यावरही एक पंखा गरगर करीत होता.

ती बसली होती तिथें आजूबाजूला निरनिराळया देशांतील देखाव्यांचीं मोठालीं चित्रं भिंतींवर लावलेलीं होतीं. इटली, नॉर्वे, मेक्सिको, जर्मनी, फ्रान्स असे किती तरी देश आपापल्या विशिष्ट सृष्टिसौंदर्याचं प्रदर्शन करून म्हणत होते, आमच्याकडे या, मौज करा! श्यामाच्या मनांत आलं, हिटलरनं ऑस्ट्रिया गिळंकृत केला. आतां त्याची दृष्टि युरपमधल्या छोट्या राष्ट्रांकडे वळल्यावांचून थोडीच राहील? अन् मग समजा इंग्लंडला युद्धांत पडावं लागलं, व शरद् म्हणतो त्याप्रमाणें खरोखरच पुढें जगभर रणसंहार सुरू झाला तर या, सुंदर सुंदर देशांचं हें वैभव असंच टिकेल? " आमच्याकडे या, मौज करा " असं हे देश म्हणूं शकतील ?...

भिंतींवरच्या त्या चित्रांत जपानचाहि एक भव्य देखावा होता. चेरीब्लॉसमच्या फुलांची केवढी बाग त्यांत बहरली होती! Japan : The Paradise of the East !...

श्यामाला एकदम योशिदाची आठवण झाली होती.

तिला वाटलं होतं, आपले वडील हिंदुस्थानांत आले हें त्याला कळवितां आलं तर त्याला केवढा आनंद होईल! असेल तिथून धावत येईल तो आपल्या वडिलांना भेटायसाठीं! पण तो कुठें होता कोण जाणे! किती तरी दिवसांत त्याचं कांहीं पत्रंच नव्हतं. त्याची सर्कस हिंदुस्थानांतच होती कीं नव्हती हें सुद्धां तिला ठाऊक नव्हतं...

अशोक तिच्यापुढें येऊन उभा राहिला तेव्हां ती आपल्या विचारांतून जागी झाली होती.

" चल, जाऊं या." तो हसत म्हणत होता.

" झालं काम ? "

त्यानं मान हालविली होती.

मग खालीं जाऊन गाडींत बसल्यावर तो म्हणाला होता, " विद्यापुरमच्या महाराजांचा आठ दिवस मुक्काम होणार आहे मुंबईत. ताजमहाल हॉटेलमधल्या सहा खोल्या शुक्रवारपासून रिझर्व झाल्या आहेत त्यांच्यासाठीं. महाराजांचे खाजगी कारभारी विद्यापुरमहून गुरुवारीं दाखल होणार आहेत इथें येऊन."

" होय ? "

" हं." सिगरेट पेटवीत त्यानं म्हटलं होतं. " आतां आपलं काम सोपं आहे. गुरुवारीं त्या खाजगी कारभाऱ्यांची गाठ घेणार मी. त्यांना सांगणार मला महाराजांना एक चित्र नजर करायचं आहे अन् माझ्या स्टूडिओला भेट देण्याबद्दल आमंत्रण द्यायचं आहे. इतका शिरकाव झाल्यावर काकांच्यापर्यंत पोंचायला कितीसा उशीर ! बरोबर आहे कीं नाहीं माझी सारी मोहीम ? "

श्यामा हसली होती.

त्यानं विचारलं होतं, " कां हसलीस ? "

" नाहीं, माझ्या मनांत एकदम आलं कीं, तूं नामांकित चित्रकार झाला नसतास तर पटाईत डिटेक्टिव्ह झाला असतास ! "

तिच्या त्या उत्तरानं खूष होऊन तो हसला होता, अन् पुढें म्हणाला होता, " बघ तरी त्या खाजगी कारभाऱ्याला कसा खिशांत घालतों तें. शुक्रवारींच महाराजांची मुलाखत मला मिळालीच पाहिजे."

"मी येणार हं तुझ्याबरोबर."

"अर्थात्."

"पण मला बाहेर बसवून ठेवून एकटाच नाहीं ना जायचास महाराजांच्या खोलींत ?"

"तें कां ? महाराजांना तुझी ओळख करून देईन, कीं या महाराष्ट्रांतल्या एक नामांकित लेखिका, धडाडीच्या समाजसेविका, केसरी साडी नेसल्या नसल्या तरी कळकळीच्या देशसेविका— बरोबर पडताहेत ना सारीं विशेषणं ?"

तिनं हातांतल्या रुमालाचं टोक चाबकाच्या वादीसारखं त्याच्या तोंडावर मारून त्याला गप्प केलं होतं.

पण नंतरच्या चार दिवसांत असलीं विनोदाचीं बोलणीं त्या दोघांत किती तरी वेळां झालीं होतीं. इतकंच काय, काल रात्रीं-देखील निजण्यापूर्वीं त्यांनीं याच विषयावर गप्पा मारल्या होत्या. विद्यापुरम्‌च्या खासगी कारभाऱ्यांची भेट अशोकनं घेतली होती, व त्याच्याकडून वचन मिळविलं होतं, कीं महाराज हॉटेलांत येऊन दाखल झाल्यानंतर शक्य तितक्या लवकर तुमची मुलाखत करवितों. महाराजांच्या भेटीला जातांना कोणती साडी नेसावी, उंच टाचांच्या 'सँडल्स' घालाव्या कीं नाहीं, केस मोकळे ठेवावे कीं बांधावे, इत्यादि गोष्टी देखील श्यामानं अशोकला विचारून घेतल्या होत्या. आणि महाराजांपुढें जातांच शरीर किती अंशांच्या कोनांत वाकवायचं त्याचीसुद्धां तालीम त्यानं तिला दिली तेव्हां दोघांनीं हसून हसून भरपूर करमणूक घेतली होती.

त्यामुळें आजचा दिवस अगदीं उल्हासाचा उजाडला पाहिजे अशी साहजिकच तिची इच्छा होती; अन् जागं झाल्याबरोबर जेव्हां सृष्टीचं गारठलेलं ओलंचिंब स्वरूप तिला दिसलं तेव्हां तिची निराशा झाली. खिडकीबाहेरच्या त्या पावसाळी देखाव्याचं गांभीर्य अन् उजाड हमरस्त्याची अवकळा हा कांहीं चांगला शकुन नव्हे, असं तिच्या मनांत आलं.

तिनं दोन्ही खिडक्या झटकन् लावून घेतल्या अन् स्विच दाबून दिवा लावला तेव्हां तिला बरं वाटलं.

त्या दिवशीं पावसाला खळ पडण्याचं लक्षण दिसेना. बारा वाजल्यानंतर त्याचा जोर कमी झाला तरी झिमझिम सुरूच होती, अन् दीड वाजतां अशोक अन् श्यामा निघालीं तेव्हां तर फारच जोराच्या सरीवर सरी कोसळूं लागल्या. वारा तर असा सुटला कीं जणूं जुन्या कामिक पुस्तकांतल्या तीन राक्षसांची आठवण करून द्यायचं त्यानं ठरविलं होतं. टॅक्सी बंद होती तरी तिच्या कांचा-वर पाणी ताडताड वाजत होतं, अन् फटीफटींतून फवारे आंत येत होते. अशोकनं डॉक्टरांचा रेनकोट घातला होता, व आपला श्यामाला घालायला लावला होता. तरी तिला गारठा असह्य वाटत होता. डांबरी रस्त्यावर एखाद्या नदीच्या पात्रासारखं पाणी खळाळत होतं. समोर पाहिलं कीं रस्ता कोणता अन् बाजूचा भाग कोणता तें धड कळतहि नव्हतं! श्यामा ड्रायव्हरला उद्देशून सारखं म्हणत होती, "सावकाश रे बाबा!"

मधेंच ती अशोकला म्हणाली, "आपण मुंबईस धड पोंचूं असं कांहीं लक्षण दिसत नाहीं मला."

अशोकनं तिला धीर दिला. "न पोंचायला काय झालं? असा पाऊस पुष्कळदां होतो. नाहीं का रे ड्रायव्हर?"

“ हां हां साहेब.” ड्रायव्हरनं म्हटलं.

पण त्याच्या त्या शब्दांत आत्मविश्वास नव्हता अशी श्यामाला शंका आली.

तितक्यांत माहीमच्या अलीकडचा पूल ओलांडून गाडी वळणावर आली, अन् तिचा वेग जो एकदम कमी झाला तो ड्रायव्हरनं भराभर “ गिअर ” बदलले तरी कमी कमीच होत गेला, आणि अखेर गाडी उभीच राहिली.

“ काय रे ? ” अशोकनं विचारलं.

“ पेट्रोल खलास...” ड्रायव्हरनं शरमून उत्तर दिलं.

“ चागलं...” श्यामा उद्गारली.

“ निघतांना पाह्यचं नाहीं रे ! काय अक्कल तुझी ! ” अशोकच्या मनांत आलं त्याला खूप शिव्या द्याव्या. परंतु शिव्या दिल्यानं गाडी थोडीच सुरू होणार होती ? तो गप्प राहिला, अन् मनाशीं विचार करूं लागला, आतां पुढें कसं करायचं ?

भर दुपारच्या प्रहरीं तिन्हीसांजा झाल्या होत्या. पाहावं तिकडे पाणी दिसत होतं. वारा घोंघों वाहत होता. वृष्टि चालूच होती. आणि रस्त्यावर सचैल स्नान करीत मोटार उभी होती !

आंत बसलेल्या अशोकला व श्यामाला एकेक मिनिट तासा-एवढं वाटत होतं.

दुसरी टॅक्सी करावी तर या ठिकाणीं ती कोठून मिळणार ? रस्त्यानं एखादी जाईल म्हणावं तर या वादळांत तो संभव कुठला ?...

जवळ जवळ पाऊण तास असा गेला.

मग पावसानं कृपा केली. वर आभाळ उघडलं नाहीं, पण धार थांबली.

आणि तितक्यांत एक ट्रक अंधेरीच्या बाजूनं येतांना दिसली.

टॅक्सीचा ड्रायव्हर म्हणाला, "या ट्रकमधून जातों अन् मिळेल त्या पहिल्या पंपावरून पेट्रोल घेऊन येतों."

गाडींतला 'कॅन' काढून घेऊन तो उतरला. ट्रक थांबवून तो तिच्यांत चढला अन् गेला.

अर्धा तास होऊन गेला तरी तो आला नाहीं.

पुन्हा पाऊस सुरू झाला होता.

श्यामा अगदीं रडकुंडीस आली. अशोक पुनः पुन्हा म्हणत होता, "आपल्याला पोंचायला उशीर झाला तरी कांहीं हरकत नाहीं. आपलं काम होणार याबद्दल शंका नाहीं." पण मनांतल्या मनांत तोहि ड्रायव्हरवर चिडला होता.

अखेर पाऊण तासानं समोरून एक ट्रक येऊन थांबली व तिच्यांतून ड्रायव्हर खालीं उतरला.

"येतांना बहुतेक वाट धावत आलों. ट्रक त्या कोपऱ्यावर आलों तेव्हां मिळाली..." त्यानं सांगितलं.

बिचारा भिजून ओलाचिंब झाला होता. श्यामाला त्याची अतिशय दया आली. त्या क्षणीं ती स्वतःच्या मनांतली निराशा, चीड, सारं कांहीं पार विसरून गेली.

ड्रायव्हरनं गाडींत पेट्रोल टाकलं, आणि ती सुरू केली. नंतर कांहीं विघ्न आलं नाहीं. तथापि अखेर ताजमहाल हॉटेलसमोर गाडी थांबली व तीं दोघं झटकन् खालीं उतरलीं त्या वेळीं साडे-चार वाजून गेले होते!

घड्याळाकडे पाहून श्यामा पुटपुटली "काय हें!"

अशोक हलकेच म्हणाला, "तूं चिंता करूं नकोस. आपल्याला

उशीर झाला असला तरी महाराजांशीं आपली मुलाखत होईल. माझी खात्री आहे."

त्याच्या त्या बोलण्यानं धीर येऊन श्यामा हसली, व हॉटेलच्या मुख्य प्रवेश-द्वारांतल्या पायऱ्या चढत त्याच्याबरोबर गेली.

तीं दोघं लिफ्टमध्यें शिरलीं. त्यांच्या मागोमाग एक लठ्ठ गाजरासारख्या तांबड्या लाल तोंडाचा साहेब लिफ्टमध्यें आला, व तोंडांत कायमच घालून ठेवलेल्या भल्या मोठ्या चिरुटाला ओठांनीं हिसके देत म्हणाला, "आग लागो एकदांची या हवेला! मला तीन वाजतां इथं यायचं होतं, अन् आलों तो आतां पांच वाजायला आले! बघा म्हणजे झालं."

ज्यांची आपली ओळखदेखसुद्धां नाहीं अशा माणसांची सहानुभूति मिळविण्याची इच्छा गांजलेल्या, चिडलेल्या मनःस्थितींत मनुष्याला पुष्कळ वेळां होते. तशी इच्छा त्या गृहस्थाला झालेली दिसली. तो कोठून आला होता कोण जाणे, पण अगदीं भिजून, दमून घामाघूम होऊन आला होता. त्याच्या त्या डवडवलेल्या चकाकणाऱ्या चेहऱ्याकडे पाहून श्यामाला पुण्याच्या मंडईत भाजीवाल्यांनीं पाणी शिंपडून ढीग करून मांडलेल्या गाजरांची एकदम आठवण झाली, आणि ती स्वतःशींच किंचित् हसली.

अशोक त्या साहेबाला हवी ती सहानुभूति दाखवून म्हणत होता, "आमचीहि तीच गत झाली आहे. अगदीं डोकं फिरल्यासारखंच चालवलं आहे आज पावसानं."

त्या लठ्ठ गृहस्थानं 'हुं:!' असा उद्गार काढला, खांदे उडवले आणि डाव्या हातांच्या चिमटींनं चिरूट तोंडावेगळा करून तंबाखूचा चोथा थुंकल्यासारखं केलं.

आपण किती मजले वर आलों ते श्यामाला समजलं नाहीं.

परंतु लिफ्टमधून बाहेर पडल्यावर तिनं उजव्या बाजूच्या फरसबंद जिन्याकडे सहज वाकून पाहिलं तो खोलच खोल विहिरींत डोकाव-ल्यासारखं तिला वाटलं. आपण चौथ्या किंवा पांचव्या मजल्यावर असलों पाहिजे असा मनाशीं तर्क करीत ती दूर झाली, आणि अशोकबरोबर चालूं लागली.

तो तिच्या कानांत म्हणाला, "विद्यापुरम्च्या महाराजांसाठीं राखून ठेवलेल्या खोल्या या मजल्यावर आहेत."

श्यामाचं अंतःकरण धडधडूं लागलं. आतां तिच्या वडिलांची व तिची भेट होण्यास घटका दोन घटकांचा देखील अवकाश नव्हता !...

ताजमहाल हॉटेलमध्यें प्रत्येक मजल्यावर एकेक मॅनेजरचं ऑफिस आहे. या मजल्यावरचं ऑफिस ज्या ठिकाणीं होतं तिथें जाऊन टेबलाच्या पलीकडच्या बाजूस उभ्या असलेल्या इसमास अशोक म्हणाला, "येवढी माझ्या नांवाची चिठी पोंचती करतां काय ?"

त्या इसमानं विचारलं, "कुणाकडे ?"

"विद्यापुरम्चे महाराज उतरले आहेत ना ? त्यांच्या खासगी कारभाऱ्याकडे."

त्या इसमानं अशोकची चिठी शिपायाबरोबर धाडली, आणि नंतर दहा मिनिटांनीं तो शिपाई परत आला व म्हणाला, "आपल्या-ला जरा बसायला सांगितलं आहे. कृपा करून इकडे या."

त्याच्या मागोमाग अशोक व श्यामा गेली, आणि त्यानं दाख-विलेल्या खोलींत शिरली. त्या ठिकाणीं विद्यापुरम्चा एक संस्थानी नोकर दरबारी पोशाख करून उभा होता. त्यानं आदबीनं प्रणाम केला व म्हटलं,

" आपण इथें बसावं. सरकारस्वारीशीं बोलण्यांत कारभारी गुंतले आहेत. इतक्यांत येतील."

त्यानं बटनं ओढून दिवे लावले, पंखा सुरू केला, व पाहुण्यांना अवघड वाटूं नये म्हणून तो तेथून निघून गेला.

अशोकनं सिगारेट पेटवली, व खोलींत दोन तीन चित्रं लावलेलीं होतीं तीं तो बसल्याबसल्याच न्याहाळून पाहूं लागला. श्यामाला वाटलं अशा ठिकाणीं एकमेकांशीं बोललं तर तें रिवाजाला धरून होईल कीं नाहीं कुणास ठाऊक! शिवाय अशोकशीं बोलण्यासारखं तिला कांहीं धड सुचतहि नव्हतं. ती एखाद्या धरून आणलेल्या पांखरासारखी कोचावर अवघडून गप्प बसली, अन् मनाशीं कल्पना करूं लागली, पलीकडच्या एखाद्या खोलींत माझे वडील या क्षणीं असतील...काय करीत असतील ते! ...त्यांना कल्पना तरी असेल का इथें जवळच त्यांची मुलगी त्यांना भेटायसाठीं...

आंतल्या दालनांतल्या रुजाम्यावर पावलांची चाहूल झालेली तिनं ऐकली तेव्हां तिनं वर पाहिलं.

संस्थानी पोशाख केलेला एक वयस्क गृहस्थ आंत आला, व प्रणाम करीत पुढें पावलं टाकीत इंग्रजींत म्हणाला, " आपल्याला वाट पाहत बसावं लागलं, माफ करा."

श्यामानं तर्क केला, हाच खाजगी कारभारी असला पाहिजे. तिच्या मनांत आलं, केवढा हा विनय, किती हें भाषेचं आर्जव. अशोक उठून उभा राहिला तेव्हां तीहि उभी राहिली खरी. पण अशोकनं नंतर तिचा परिचय करून दिला, व " आपल्या परिचयानं फार आनंद झाला " असं खाजगी कारभारी इंग्रजींत म्हणाला

तेव्हां तिच्या तोंडून घड शब्द बाहेर पडले नाहींत. त्या गृहस्थाच्या सौजन्यानं ती विलक्षण गोंधळून गेली होती.

अशोक व श्यामा यांना बसायला सांगून कारभारीसाहेब एका खुर्चीवर टेकले, व बाहेर पाहिल्यासारखं करून म्हणाले,

" काय हा पाऊस ! "

" विलक्षण ! " अशोक म्हणाला, " त्यामुळेंच लवकर येणं अशक्य झालं आम्हांला. फार उशीर झाला. माफ करा."

" होईना का ! कांहीं बिघडलं नाहीं. मी महाराजांना आपल्या कामाची वर्दी दिली—"

" होय ?—"

" महाराजांना फार आनंद होईल आपला परिचय करून घेण्यांत."

" माझं काम केल्याबद्दल मी आपले कसे आभार मानूं ? "

कारभारीसाहेब म्हणाले, " नाहीं, तुमचे आभार मला घेतां यायचे नाहींत. कारण तुमची मुलाखत महाराज घेऊं शकत नाहींत."

अशोक चपापला.

ते पुढे म्हणाले, " घेऊं शकत नाहींत म्हणजे या मुक्कामांत घेऊं शकत नाहींत. सप्टेंबर महिन्यांत सरकारस्वारी पुन्हा मुंबईस येणार आहे त्या वेळीं तुमची मुलाखत नक्की होईल. पण या वेळीं तुमचं काम होत नाहीं. कारण इथें आठ दिवसांचा मुक्काम होणार होता तो सरकारनीं रद्द केलाय्. विद्यापुरम्ला सगळं तातड-तोब जायला पाहिजे असं तातडीचं काम तिकडे निघालं आहे. आजच गेली असती स्वारी. पण तब्येत जरा नादुरुस्त आहे म्हणून एक दिवस विश्रांति घेण्यासाठीं राहणं भाग पडलं. उद्यां

स्वारी निघणार इथून. बोटीवर महाराजांच्या परिवारांत जी मंडळी होती त्यांची रवानगी तर बोटीवरून उतरल्याबरोबर परस्पर मद्रास एक्स्प्रेसनं झाली विद्यापुरम्‌कडे. फक्त खाशी स्वारी अन्‌ दोघे ए. डी. सी..."

अशोकनं एकदम विचारलं, "काय म्हणतां, महाराजांच्याबरोबरची कुणीच मंडळी इथें मुंबईत राहिली नाहींत ?"

"कशाला राहतील ?... ती सारी गेली आज—"

"अमेरिकेंत तिलकानंद नांवाचे एक योगी महाराजांना भेटले अन्‌ महाराजांनीं त्यांना आपल्याबरोबर आणलं आहे असं आम्हीं ऐकलं, तेहि—"

"तेहि रवाना झाले विद्यापुरम्‌ला. महाराजांचा फार लोभ जडलेला दिसतो त्यांच्यावर. त..."

परंतु त्याच्या बोलण्याकडे अशोकचं व श्यामाचं लक्षच आतां राहिलं नव्हतं.

श्यामाला निराशेचा एवढा धक्का बसला होता कीं कारभारीसाहेबांचा निरोप घेतांना तोंडावर हास्य आणणं तिला अशक्य झालं, अन्‌ कोचावरून उठल्यावर आपल्याला पायांवर धड उभं राहतां येईल अशी तिला खात्री वाटेना. केवढ्या आशेनं अन्‌ किती उत्कंठेनं ती या ठिकाणीं आली होती ! आणि तें सारं व्यर्थ ठरलं होतं ! दैवानं तिच्याशीं असा दुष्ट खेळ कां खेळावा ! आजचा दिवसच अशुभ उजाडलासं तिला वाटलं होतं तें खरं ठरलं !

लिफ्टपर्यंत ती आली ती अशोकच्या हाताचा आधार घेऊन मूर्च्छेतच पावलं टाकल्याप्रमाणें. लिफ्ट खालीं जाऊं लागला तेव्हां तिला वाटलं निराशेच्या खोल गर्तेत आपण पडत आहोंत. तिनं क्षणभर डोळेच मिटून घेतले !

# २०

पाच्छापूर स्टेशनावरून गाडी हालली. श्यामाच्या मनांत आलं आतां दोनच स्टेशनं राहिलीं. सुळधाळ, सुळेभावी झालीं कीं बेळगांव. तरी एक तास जायला हवा. आणि तिचं मन तर आतां अगदीं अधीर झालं होतं. सकाळीं आठ वाजतां पुण्याहून निघाल्यापासून तिनं दहा तास काढले होते, पण आतां उरलेला एक तासाचाच अवधि तिला केवढा वाटूं लागला. तिनं पुन्हा पुन्हा बाकाखालची पेटी अन् ज्या वळकटीला टेकून ती बसली होती ती चाळवल्यासारखं केलं. जणूं तिनं आपलं सामान खालीं काढायसाठीं तयार ठेवल्यानं गाडी बेळगांवला अधिक जलदीनं पोंचणार होती !

खिडकींतून वाऱ्याचा जोराचा झोत मारीत होता, पण तिनं फक्त पदर डोक्यावरून ओढून दाबून धरला, अन् तोंड जरा आंत घेतलं. खिडकी बंद केली नाहीं. कारण बाहेर फार रम्य दृश्य पसरलं होतं. सूर्यबिंब दिसेनासं झालं होतं, पण क्षितिजावरच्या ढगांनीं त्याची अखेरची रक्तप्रभा अजून आपल्या संपुटींत धरून

ठेवल्यासारखी दिसत होती. मृगनक्षत्र याहि भागांत उत्तम झाल्याची साक्ष देणारे लहान मोठे जलाशय, पोटभर पाऊसपाणी प्यालेल्या शेतजमिनी, वर्षाकालांतला विवक्षित गंध पसरविणारीं झाडंझुडपं इत्यादींनीं नटलेली सृष्टि गंभीर व शांत भासत होती. मधेंच हिंगणबेटाच्या झाडांचा एक विस्तीर्ण पट्टा डोळयांपुढून सरकला. पुलावरून जातांना गाडीच्या चाकांचा आवाज अधिक खोल व गंभीर होतो तसा झाला. खालीं ओढ्याचं पाणी खळाळत होतं. तीरावर मातीचे घडे घेऊन उभ्या असलेल्या शेतकरणींनीं थबकून माना वर केल्या. त्यांच्याबरोबरच्या पोरांनीं आरोळया ठोकल्या. पूल ओलांडून गाडी पुढें झाली तेव्हां एक मोठा विस्तीर्ण तलाव दिसला; पण त्याकडे नीट न्याहाळून पाहतांच श्यामा स्वतःशींच हसली. कारण तो तलाव नव्हता. भिजून चिंब झालेल्या शेत जमिनीवरचं पाणी चकाकल्यामुळें तो आभास निर्माण झाला होता. आतां सूर्य पार अस्तंगत झाला होता, रात्र पडली होती, पण चंद्राच्या मृदु प्रकाशानं साऱ्या वस्तू उजळून निघाल्या होत्या. श्यामानं दृष्टि वर केली. मग ती कांहीं वेळ चंद्राभोंवतीं जमणाऱ्या, त्याला क्षणभर झांकून पुढें सरकणाऱ्या ढगांची गंमत पाहत राहिली. गेल्या पंधरा दिवसांत त्या ढगांप्रमाणेंच तिच्या मनावरहि निराशेचं पटल यावं, दूर व्हावं, पुन्हा यावं असं झालं होतं! या क्षणीं ती आनंदांत होती खरी पण गेल्या दोन आठवड्यांत...

मुंबईस तिच्या दादांची व तिची चुकामूक झाली तेव्हांची निराशा तिला अजून आठवत होती. ताजमहाल हॉटेलमधून घरीं येईपर्यंत ती अशोकशीं चार वाक्यंसुद्धां बोलली नव्हती. दिवसभरच्या श्रमानं थकलेलं अंग तिनं रात्रीं अंथरुणांत टाकलं,

पण तिला झोंप येईना. एकच विचार तिच्या डोक्यांत घोळत होता. आतां दादानां गाठायचं कसं? सरळ विद्यापुरम्‌ला जावं काय?

आतुरतेनं तिचं मन इतकं व्यथित झालं होतं कीं ती गेली देखील असती.

पण अशोकनं तिची ती कल्पना खोडून काढली होती.

आणि दोन दिवसांनीं ती पुण्यास परत आली, व तिनं सारी हकीगत शरद्‌ला सांगितली तेव्हां त्यानंहि असाच सल्ला दिला कीं उगीच विद्यापुरमला धांव घेण्यांत अर्थ नव्हता. त्याचंहि म्हणणं असंच पडलं, कीं आतां थोडे दिवस आपण स्वस्थ बसावं. आनंदरावच कदाचित् घरीं येण्याची कांहीं तरी हालचाल करतील असा संभव होता.

पण दोन दिवस गेले. दोहोंचे तीन झाले, चार झाले, आणि हा अदमास खरा ठरण्याचं चिन्ह दिसेना! श्यामा शरद्‌ला म्हणाली, "बघ!"

जणूं आनंदरावांकडून काहीं बातमी येऊं नये हा त्याचाच गुन्हा होता!

शरद् हसला होता, पण लगेच गंभीरपणें म्हणाला होता, "तूं एक गोष्ट विसरतेस."

"कोणती?"

"तुझे दादा सुखरूप स्वदेशाला येऊन पोंचले आहेत हें खरं, पण अगदीं निःशंकपणें प्रगट होण्यापूर्वी ते थोडा अदमास घेतील कीं तसं करण्यांत खरोखरच कांहीं धोका नाहीं ना."

हें बोलणं श्यामाला पटलं होतं. पण तिला आपल्या आतुरतेचा

इष्ट सोडावासा वाटत नव्हता. एखाद्या वस्तूचा छंद घेतलेल्या मुलासारखी तिची मनःस्थिति झाली होती. ती म्हणाली होती,

"आणखी फार तर दोन दिवस वाट पाहीन. तेवढ्यांत दादांकडून कांहीं बातमी आली नाहीं तर आपण विद्यापुरमूला जायचं."

"कबूल." शरद् हसून म्हणाला होता.

परंतु ते दोन दिवस सरण्याच्या आंत अशोककडून तिला एक पत्र आलं होतं. त्यानं लिहिलं होतं,

"तुझ्या नांवाची तार आली ती सोबत पाठवीत आहे. तार योशिदाची आहे, व तिच्यावर मद्रासचा छाप आहे. आंतल्या मजकुरावरून योशिदाची सर्कस सध्यां मद्रासला असावी असा मीं तर्क केला, अन् लगेच लायब्ररींत जाऊन "हिंदु"चा अंक पाहिला तों त्यांत "दि ग्रेट निपॉन सर्कस"ची जाहिरातहि दिसली. इतकंच नव्हे तर "Personal and Social" या सदरांत विद्यापुरमूच्या महाराजांचा मुक्काम मद्रासला असल्याचंहि वृत्त आढळलं.

तूं अजूनहि मुंबईतच असशील अशी योशिदाची कल्पना असावी, अन् पुण्याचा पत्ता तूं त्याला कधीं लिहिला नसावास, म्हणून त्याची तार इकडे आली."

ती पत्र वाचीत होती तंवर शरद्नं तार वाचली होती. तिनं त्याच्याकडे पाहिलं तेव्हां त्यानं हसत तारेचा कागद तिच्या हातीं देऊन अशोकचं पत्र तिच्या हातून घेतलं होतं. योशिदानं तारेंत लिहिलं होतं,

"His Highness Vidyapuram graced performance last night. Your lost treasure found.

Cherries will blossom in your garden soon. Accept congratulations."

(विद्यापुरम्‌चे महाराज काल रात्रीं सर्कसला आले होते. तुमचा हरवलेला 'ठेवा' सापडला. तुमच्या घरच्या बगीचांत लवकरच 'चेरी'चीं फुलझाडें फुलतील! तुमचें अभिनंदन करतों.)

श्यामा वर पाहून म्हणाली होती, " बघ! "

जणूं कांहीं आनंदरावांची कांहीं तरी बातमी लवकरच कळेल हा तिचाच अदमास होता आणि तो खरा ठरला होता!

शरद् हसला. गेल्या चार सहा दिवसांत ती अगदीं एखाद्या मुग्ध बालकासारखी वागूं लागली होती!

तो कांहीं बोलला नव्हता.

आणि मग काल सिनूकाकांची तार आली होती, " Start immediately " ( असशील तशी निघून ये. )

अर्थातच तिचे दादा चांदणीला आले असले पाहिजेत.

शरद् संघाच्या कामासाठीं सातार्‍यास गेला होता. तो रात्रीं परत येणार होता, पण आला नव्हता. एकदां तिच्या मनांत आलं त्याला तार करावी अन् तो आल्यावर रात्रीं निघावं. पण एक दिवस उशीर करायला तिचं अधीर मन तयार होईना. तिनं शरद्‌ला पत्र लिहून ठेवलं होतं, अन् सकाळच्या गाडीनं ती पुण्याहून निघाली होती...

या सर्व गोष्टी आठवतां आठवतां मधलीं दोन स्टेशनं केव्हां गेलीं तें श्यामाला कळलंहि नाहीं. रुळाच्या सांध्यांवर गाडीचीं चाकं खाड्‌खाड् वाजलीं, अन् समोरच्या बांकावर बसलेल्या बाईनं किटणानं काळे केलेले दांत दाखवून तिला कानडींत म्हटलं,

"तुम्हांला ब्यळगांवला उतरायचंय ना?" तेव्हां ती चमकून विचाराच्या तंद्रीतून जागी झाली.

"म्हणजे! बेळगांव आलं?" तिनं उठत विचारलं.

"मग काय तर?—" ती कानडी बाई उटीपोटापासच्या मुटकळ्यांतून पैसे व तिकीट काढीत हसली.

गाडी स्टेशनांत शिरून थांबली.

ती उतरून हमालाला हाक मारूं लागली तोंच गर्दीतून वाट काढीत येणारे सिनाप्पा तिला दिसले.

"काका!—काका!—" ती ओरडली.

ते अगदीं जवळ आले तेव्हां तिनं खालीं वाकून नमस्कार केला. तिला धीर निघेना. तिनं हलकेच त्यांच्या कानांत विचारलं, "दादा आलेत ना घरीं?"

सिनाप्पांनीं हसत मान हलविली.

मग त्यांनीं एकदम म्हटलं, "मला वाटलं होतं शरद् येतील तुझ्याबरोबर."

ती हसली. "मग सांगतें..."

स्टेशनाच्या आवारांत सिनाप्पांचा टांगा उभा होता. गड्यानं श्यामाचं सामान मागच्या बाजूला ठेवलं. श्यामा पुढच्या बाजूस बसली. घोड्याला थोपटून सिनाप्पा म्हणाले,

"लालू, आपली ताई आली पाहिलीस ना! तिला घाई आहे फार हं! अर्ध्यापाऊण तासांत घर गाठलं पाहिजे."

लालूनं कान पुढें मागें केले अन् त्यांच्या हाताला हिसका देऊन मान वर करून मोठ्यांदा फुर्रर केलं. जणूं त्यानं म्हटलं "सोडा मला म्हणजे निघालोंच पहा वाऱ्यासारखा."

सिनाप्पा वर चढून बसले. त्यांनी 'रेन' हातीं घेतल्याबरोबर पुन्हा एकदां फुरफुरून 'लालू' भरवेगानं निघाला. गडी थोडीं पावलं टांग्याला धरून धावला, अन् मग उडी मारून मागच्या जागीं बसला.

आतां चंद्र क्षितिजावर दोन तीन कासरेच राहिला होता. अजूनहि ढग फिरतच होते पण चंद्रकोर क्वचितच झाकली जात होती. श्यामानं एकदम विचारलं,

" आज तिथि कोणती काका ? "

" आषाढ शुद्धांतली चतुर्थी आज. नऊ दिवसांपूर्वी आर्द्रा नक्षत्र लागलं ना ! गेले चार पांच दिवस पाऊस अगदीं उघडलाय. पण मृगाचा पाऊस अगदीं उत्तम झाला. आम्हांलाहि अशी उघडीप हवीच होती. तुला वारं झोंबतंय का ? मीं शाल आणली आहे बरोबर. वाटल्यास..."

" नको नको. मी मजेंत आहे."

खरोखरच तिचं मन या क्षणीं अतिशय प्रसन्न होतं. गेल्या वर्षी दसऱ्यानंतर ती आक्काबरोबर घरून निघाली त्या दिवसाची तिला आठवण होत होती, अन् तिच्या मनांत येत होतं, गेल्या नऊ दहाच महिन्यांच्या अवधींत तिच्या आयुष्यावर मोठा परिणाम करणाऱ्या किती गोष्टी घडल्या होत्या ! नऊ महिन्यांपूर्वीं तिनं पदवी मिळवलेली होती, पण आजच्या मानानं त्यावेळीं तिच्या मनाचा विकास किती अल्प झालेला होता. या कालावधींत अशोकशीं तिचा पूर्वी कधीं नव्हे इतका निकट संबंध आला होता; प्रभाकर, योशिदा, अशोकची मित्र-मंडळी इत्यादि अनेक व्यक्ती तिच्या आयुष्यांत कमी अधिक वेळ आल्या होत्या; आपल्या वडिलांचं रहस्य उलगडण्याची व

नंतर त्यांचा शोध काढण्याची धडपड करण्यांत आशानिराशा तिनं अनुभवली होती; अन् नऊ महिन्यांपूर्वी जो शरद् तिला अकस्मात् मिरजेच्या स्टेशनावर भेटला त्याची प्रीति जिंकण्याचा अवघड डाव ती खेळली होती, अन् आतां त्यानं तिला पूर्णत्वानं आपली म्हटलं होतं.... नऊ महिन्यांनीं चांदणीला परत आलेली श्यामा फार बदलली होती, वाढली होती. शरीराची वाढ वर्षांनीं मोजायची असते, पण मनाची वाढ सुखदुःखांतून मिळणाऱ्या अनुभवांच्या खोलीनं...

"झोप आली होय ग?"

काकांच्या त्या प्रश्नानं ती आपल्या विचारांतून जागी झाली.

"कुठें?"

"मग बोल ना! शरद् कां आले नाहींत सांग."

"सांगतें ना. पुष्कळच सांगायचंय तुम्हांला."

ताजमहाल हॉटेलमधें ती अशोकबरोबर गेली तेव्हांपासून पुढची हकीगत तिनं सिनाप्पांना कळविलेली नव्हती, ती सांगण्यास तिनं प्रारंभ केला. बोलतां बोलतां ती समोर बघे. तेव्हां चंद्रकोर आणखी खालीं सरकलेली तिला दिसे. झाडांच्या छाया आतां फार लांबट झाल्या होत्या.

आपली हकीगत संपवून ती म्हणाली,

"आतां इकडचं सारं सांगा मला, काका. दादा केव्हां आले, कसे आले, तुम्ही त्या वेळीं कुठें होतां, काय करीत होतां— सगळं सगळं सांगा."

"सांगतों."

तितक्यांत घोड्यानं ठोकर खाल्ली म्हणून त्याला उद्देशून ते म्हणाले, "आस्ते, आस्ते बेटा," आणि त्यांनीं 'रेन' सैल करून

इशारा देतांच 'स्पीड' बदललेली मोटर जोरांत निघावी तद्वत् लालू अधिक वेग घेऊन साफ निघाला तेव्हां " परवां संध्याकाळची गोष्ट " असं म्हणून त्यांनीं आनंदराव अकस्मात् चांदणीला येऊन दाखल झाले त्या प्रसंगाचं वर्णन सुरू केलं.

श्यामा अगदीं एकाग्र चित्तानं ऐकत होती. तिची दृष्टि समोर स्थिर होती. चंद्रकोर आतां क्षितिजावर दहा बारा हातच राहिली होती. आधींच मृदु वाटणारा प्रकाश आतां आणखी मंद झाल्यासारखा दिसत होता. दूर अंतरावरचे डोंगर अधिक भव्य वाटत होते. रस्त्यावर झाडांच्या छायांचे पट्टे मोठे झाले होते. आणि ती शांत स्तब्ध सृष्टि वेगानं सरकत येऊन आपल्याला प्राशीत आहे असा जो एक चमत्कारिक भास होत होता तो श्यामाला सुखाचा वाटत होता. घोड्याच्या टापांचा लयबद्ध शब्द सारखा चालू होता, अन् त्याच्या परिपुष्ट पुठ्याचा उजवा-डावा भाग त्या लयींतच डौलानं खालींवर होत होता. मधेंच लालूनं धावतां धावतांच शेपटीचा झुपका वर करून लीद टाकली. आणि—

तितक्यांत सिनाप्पा हकीकत संपवून गप्प राहिले, अन् श्यामानं झटकन् प्रश्न केला,

" काका, दादांना तुमचा लालू आवडला का ? "

" फार."

" दादा म्हातारे दिसतात का ? " तिनं एकदम प्रश्न केला.

ती चार वर्षांची होती त्या वेळीं तिनं वडिलांना पाहिलं होतं तेवढंच, अन् त्याच्या आठवणी अगदींच पुसट होत्या. आपले वडील आतां आपल्याला भेटतील तेव्हां कसे दिसतील त्याच्या कल्पना करीत बसण्याचा चाळा तिनं पुष्कळदां केला होता. पण आपल्या

दादांचं स्पष्ट चित्र तिला कधींच उभं करतां आलं नव्हतं. ते कसे दिसतात तें माहीत करून घ्यायसाठीं ती फार उत्सुक होती.

सिनाप्पांनीं वर्णन केलं तें ऐकून ती मनाशीं म्हणाली, "होय, माझे दादा असेच दिसले पाहिजेत." त्यांचं शक्य तितकं स्पष्ट चित्र तिनं डोळ्यांपुढें आणून त्याकडे पाहत ती स्तब्ध राहिली.

आणि मग अर्ध्या घटकेनं तिला आपल्या वडिलांची मूर्ति प्रत्यक्षच दृष्टीस पडली!

सिनूकाकांबरोबर टांग्यांतून उतरून तिनं घरांत प्रवेश केला तों ओटीच्या पायऱ्या उतरून एक उंच कृश जटाधारी मूर्ति अंगणांत आलेली तिला दिसली.

"दादा—" म्हणून ती धावली.

तिनं चटकन त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवलं. त्यांनीं तिला उचलून हृदयाशीं धरलं. तिनं त्यांच्या कुशींत मस्तक ठेवलं. तिला हुंदके आवरेनात. त्यांनीं तिच्या मस्तकावर हात फिरविला, व कांहींसं पुटपुटून मान खालीं केली. त्यांचा स्वर सद्‌गदित झाला होता.

तें पाहून सिनाप्पांच्या डोळ्यांत अश्रु दाटले. त्यांच्या आयुष्यांत याहून अधिक भाग्याचा क्षण दुसरा कोणता असेल!

हुंदक्यांचा आवेग ओसरल्यावर श्यामानं पुन्हा एकदां "दादा—" असा उद्‌गार काढला, व मग प्रथमच त्यांच्याकडे पुरतेपणीं पाहून ती हसली.

आनंदरावहि हसले.

"तूं एकटीच आलीस?" त्यांनीं एकदम प्रश्न केला.

क्षणार्धच असेल, पण त्यांचा तो प्रश्न लक्षांत न आल्यासारखी श्यामाची चर्या झाली. आपल्या वडिलांविषयीं अतीव आदराच्या व प्रीतीच्या भावनांनीं तिचं मन इतकं भरलेलं होतं, त्यांच्या

भेटीची ओढ तिच्या अंतःकरणाला इतकी लागलेली होती, अन् पित्याच्या आलिंगनांत अशा कांहीं उत्कट सुखाचा तिला अनुभव आला होता, कीं आपल्या प्रियकराचंहि भान तिला उरलं नव्हतं.

त्यांच्या प्रश्नाचा अर्थ ध्यानांत आल्यावर मात्र तिला एकदम लाजल्यासारखं झालं. "तुम्ही दादांना सारं सांगितलं वाटतं!" अशा अर्थाचा कटाक्ष तिनं सिनूकाकांकडे टाकला व दादांकडे हसत पाहून ती म्हणाली,

"शरद् उद्यां येतील."

  

नंतरच्या दहा दिवसात आनंदरावांचं घर खरोखरीचं आनंद-भुवन होऊन गेलं. कित्येक वर्षे वठलेल्या अवस्थेत उभ्या राहि-लेल्या एखाद्या वृक्षाला अकल्पित संजीवन मिळून त्याच्या शाखा पल्लवित व्हाव्या अन् त्यांवर पक्ष्यांची किलबिल ऐकूं यावी, तद्वत् त्या जुन्या वास्तूवर अठरा वर्षे पसरलेली दुःखाची व निराशेची छाया एकदम दूर झाली व तें स्थल आनंद, उत्साह, चैतन्य, हास्य यांनीं गजबजून गेलं. पुण्याहून शरद् आला; वसंत व उषाकाही आलीं. मुंबईहून डॉक्टरकाका, काकू, अशोक ही मंडळी आली. बोलण्याला, हसण्याला खळ पडेनासा झाला. सखू मालकीण, जानू गडी इत्यादींची परसांतून पुढच्या अंगणापर्यंत अन् पुन्हा परत परसांत अशी धावाधाव चालूं राहिली. गोठ्यांतलीं गुरं देखील आनंदून हंबरत होतीं.

ज्या गांवकऱ्यांनीं आनंदरावांना तरुणपणीं पाहिलं होतं ते भेटायला येत. त्यांच्याबरोबर नव्या पिढींतलीं माणसंहि येत. क्वचित् लहान पोरंहि अंगण ओलांडून ओटीवर चढण्याचं धाडस करीत अन् आपल्याला कोणी हटकीत नाहीं असं वाटल्यावर मोठ्यांना चिकटून टकमक पाहत बसत. म्हातारी मंडळी देखील फार तर "आलासा घरला ! खुशाल हयेसा ?" येवढं विचारीत अन् मग उगीच बसून राहत. आनंदराव फार फार दूरच्या कुठल्या देशाहून—'इलायतहून'—परत आले येवढीच त्यांची कल्पना. त्यांचा वेष पाहून त्यांना वाटे ते साधु बनून आले आहेत. ओटीच्या पायऱ्या चढून ते वर येत ते औघीं आनंदरावांचे पाय धरीत !

या प्रकाराचा अतिरेक होऊन त्याला उपसर्गाचं स्वरूप येणार अशीं लक्षणं दिसूं लागलीं तेव्हां मात्र सिनाप्पांनीं ही वर्दळ बंद करून टाकली. पण घरोघर, चावडीवर, शेतखाचरांतहि गांवकरी एकमेकांना विचारीत होते, "आनंदराव घरला आलं म्हनं. त्येंच्या पाया पडून आलास का ?"

एके दिवशीं भरदोनप्रहरीं एक मध्यम उंचीचा पण मजबूत बांध्याचा म्हातारा ओटीवर येऊन कपाळावरचा घाम पुशीत उभा राहिला. "रावजी हायती ?" त्यानं ओरडून विचारलं.

आंत मंडळी जेवायला बसली होती. "रावजी" हें नांव ऐकल्याबरोबर आनंदरावांचा घास हातांतच राहिला. त्यांनीं ओरडून विचारलं, "हां हां. कोण आहे रे ?"

"मी साधू आलोंय्. देव घरला आलं म्हून ऐकलं फारिष्ठाच्या हपीसांत तवा—"

"अरे ये ये. आंत ये."

" हतं ट्येकतों जी वटीवरता—"

" नाहीं आंत ये. जानू, त्याला चूळ भरायला पाणी दे. आणखी एक पान मांडा रे इथें."

साधू दिवसभर राहिला अन् रात्रीं जेवल्यावर निरोप घेऊन गेला.

श्यामा, शरद्, अशोक यांना उद्देशून आनंदराव म्हणाले, " जंगलांतले हे लोक एके काळीं माझे दोस्त झाले होते. भाला, बरची, परशु इत्यादि हत्यारं वापरण्यांत हे पटाईत. मी त्यांना म्हणे आपला देश परक्यांनीं खाऊन टाकला आहे, तो आपण सोडवायला नको ? ते म्हणत, रावजी तुम्ही सांगाल तिथें उडी घेऊं आम्ही..."

येवढंच सांगून ते स्तब्ध झाले. पंचवीस तीस वर्षांपूर्वींच्या अनेक आठवणी त्यांना एकदम झाल्या असाव्या, परंतु त्यांचा परिस्फोट आत्तां नको असं त्यांच्या मनांत आलं असावं हें हें श्यामानं ओळखलं. ते तिच्याकडे पाहून हसले व म्हणाले,

" हं चला, खेळायचं ना ? "

" हो तर ! उद्यां डॉक्टरकाका, अशोक जाणार. आज खूप खेळून घ्यायचं ! होय ना रे ? " असं म्हणत खुर्चीवरून उठून श्यामानं टेबलावरचा पत्त्यांचा डाव डबींतून काढला.

गेल्या पांच सहा दिवस रात्रीच्या जेवणानंतर गद्धेकोटाचा डाव साऱ्यांनीं खेळण्याचा क्रम सुरू होता. शरद्ला मुळींच खेळतां येत नसे, पण त्याला पानंच सोईचीं येत अन् तो चटकन सुटून बसे. गद्धा होण्याची पाळी इतर सर्वांवर येऊन गेली होती, पण शरद् एकदांहि बनला नव्हता.

श्यामानं डाव काढतांच अशोक म्हणाला, " हां चला बसा.

ए ताई, डाव इकडे दे. मी वाटतों. अशी भारी पानं देतों शरद्‌ला कीं कसा गद्धा होत नाहीं पाहूं. साऱ्यांनीं एकजुटीनं खेळायचं बरं का मंडळी! आज शरद् गद्धा झाला तरच उद्यां आनंदानं परत जाईन मी मुंबईला."

अशोकनं पत्ते पिसून वाटले. झब्बू देण्याचा ओरडा सुरू झाला. इतर सारी मंडळी सुटत जाऊन अखेर शरद् अन् अशोक उरले. अशोकनं पानं लपवलीं, खोटे झब्बू दिले, अन् अखेर शरद् गद्धा झाला तेव्हां साऱ्यांची हसतां हसतां मुरकुंडी वळली.

दुसरे दिवशीं मुंबईची मंडळी चांदणीहून निघाली.

निरोप देतांना श्यामा अशोकला म्हणाली,

"काल रात्रीं तुझी इच्छा पुरी झाली. आतां आनंदानं जातो आहेस ना?"

अशोक तिच्या कानांत हळूच म्हणाला,

"शरद् तुझ्या नादीं लागला तेव्हांच त्याची अक्कल समजली. पण तो रीतसर ठरेना म्हणून मी इरेस पेटलों होतों ग!"

"चल, फाजील!" श्यामानं त्याला हळूच चापटी मारून म्हटलं.

त्या बहीण-भावांतला तो हास्यविनोद इतरांना मोठा कौतुकास्पद वाटला. अशोककडे पाहून सिनूकाकांनीं हसून म्हटलं,

"इतक्या लवकर तूं परत चाललास हें कांहीं बरं नाहीं."

अशोक म्हणाला, "ताईनं आग्रह केला असता तर राहिलों असतों आणखी! पण तिला उलटी घाई झाली आहे आमचं इतर माणसांचं वऱ्हाड केव्हां जाईल, अन् एकटा शरद् केव्हां राहील अशी!"

शरद् मागच्या बाजूस जवळच उभा होता त्याच्याकडे मान वळवून बघून श्यामा म्हणाली, " इश्श्, पहा हो ! "

अशा प्रकारें हास्यविनोद कांहीं वेळ झाला व मग पुन्हा पुन्हा " येतों ", " बरं जाऊं ? ", " संभाळून हं ", " ए, पत्र धाड रे गेल्याबरोबर ! " अशीं बोलणीं उलटबोलणीं चालू असतांनाच मोटार हालली, आणि धुळीचा लोट मागें उठवून शेवटीं दिसेनाशी झाली.

रात्रीं आनंदराव सिनूकाकांना म्हणाले,

" उद्यां आपण खानापूरच्या जंगलांत जाणार आहोंत. ज्या ठिकाणीं तीस वर्षांपूर्वी मी मायदेशाला स्वतंत्र करण्याची प्रतिज्ञा केली त्या ठिकाणीं. मीं साबूला सांगून ठेवलं आहे. तो सारी तयारी ठेवील."

सिनाप्पांनीं मान हालविली. त्यांना वाटलं आनंदरावाच्या दृष्टीनं पवित्र असलेलं तें ठिकाण मुलांना दाखविण्याची त्याची इच्छा असेल. ते कांहीं बोलले नाहींत. शरद्, वसंत, उषा, श्यामाहि तशाच कल्पनेनं स्तब्ध राहिलीं.

पण आनंदराव पुढें म्हणाले,

" ताई, शरद्सारखा पति तूं मिळविलास हें पाहून मला किती आनंद होतो हें मला शब्दांनीं सांगतां येणार नाहीं. ज्या ध्येयाची प्रतिज्ञा करून मी वागलों त्याची परंपरा तुम्ही पुढें चालू ठेवाल याबद्दल मला शंका नाहीं. तुम्हांला माझे आशीर्वाद आहेतच. तुम्हीं दोघांनीं प्रीतीच्या आणाभाका घेतल्या असतील. पण तुमच्या वाङ्निश्चयाचा विधि एका विशिष्ट प्रकारानं व्हावा अशी माझी इच्छा आहे. त्यासाठीं आपण सगळीं उद्यां रात्रीं

जंगलातल्या त्या ठिकाणीं जाणार आहोंत. साधू दुपारीं येईल :
आपण संध्याकाळीं निघूं. उद्यां पाऊस न पडो म्हणजे झालं."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं पावसाच्या सरी आल्या. पण ı दुपारीं आभाळ अगदीं स्वच्छ झालं. रात्रीं पूर्णिमेच्या चांद्रिवे सारी सृष्टि उजळून निघाली.

घटप्रभा नदीच्या मैल दीड मैल अलीकडे जंगल फारच दा आहे. परंतु त्या गर्द झाडींत मधेंच एके जागीं दहा वीस खोपटांच एक झुरका आहे, व खोपटांपासून सुमारें पाव मैलाच्या अंतराव जो पाणवठा आहे तिथें फक्त एक पिंपळाचा पार असून आज बाजूची जागा अगदीं मोकळी आहे. ही जागा साधूच्या लोकांनं झाडून सारवून एखाद्या अंगणासारखी लखलख केली होती. हळदी· कुंकवाचा सडा शिंपडलेला दिसत होता, अन् पाण्यानं भरलेल्या मातीच्या घागरी चार ठिकाणीं रचून त्यांवर रानफुलांच्या माळा बांधल्या होत्या. चांदणं अगदीं टिपूर पडलं होतं, अन् भोंवतींच्या जंगलांतल्या वाऱ्याची सळसळ अन् खालीं मैलभर जाऊन घट-प्रभेला मिळणाऱ्या त्या ओढयाचा खळखळाट यांखेरीज जंगलां-तल्या ऐन मध्यावरचं तें रहस्यमय स्थान अगदीं स्तब्ध होतं. आनंदरावाचं भाषण ऐकत उभीं राहिलेलीं तीं सारीं माणसं एखाद्या चित्रासारखीं भासलीं असतीं.

आनंदराव शेवटीं म्हणाले,

" या स्थानाचं माझ्या आयुष्यांत काय महत्त्व आहे तें तुम्हां मंडळींना आतां कळलं असेल. अठरा वर्षांपूर्वी परागंदा होण्याचा प्रसंग आला तेव्हां या स्थलाचं अखेरचं दर्शन घेण्यासाठीं असाच रात्रीं आलों होतों. पुन्हा कधीं इथें येईन असं त्या वेळीं वाटलं नव्हतं. पण— "

त्यांचा कंठ भरून आला व ते क्षणभर गप्प राहिले.

मग त्यांनीं शरद् व श्यामा यांना हातानं धरून पुढें आणून मधोमध उभं केलं, अन् ते म्हणाले,

" तुमची ती संघाची प्रार्थना म्हणा."

शरद्नं श्यामाकडे हसत पाहिलं. त्याचा प्रश्न समजून तिनं हसून मान हालविली. अन् मग दोघांनीं मिळून गंभीर स्वरांत प्रार्थना म्हणण्यास प्रारंभ केला—

नमस्ते सदा वत्सले मातृभूमे । त्वया हिंदभूमे सुखं वर्धितोऽहम् ॥
महामंगले पुण्यभूमे त्वदर्थे । पतत्वेष कायो नमस्ते नमस्ते ॥ १ ॥

... ... ... ...

... ... ... ...

प्रार्थना संपली तेव्हा त्या धीरगंभीर स्वरांचे प्रतिध्वनी जंगलांत कांहीं वेळ उठल्यासारखे वाटले. वारा थबकून उभा राहिला. वृक्षशाखांवरच्या पर्णराजींची हालचालदेखील क्षणभर बंद झाली. सिनूकाका, वसंत, उषा, साबू, त्याचे दोनचार दोस्त, इत्यादि साऱ्यांचीं अंतःकरणं दाटून आलीं. कांहीं एका स्फूर्तिकारक गहिंवरानं त्यांचे डोळे भरून आले.

आनंदराव म्हणाले,

" महामंगले पुण्यभूमे त्वदर्थे । पतत्वेष कायो नमस्ते नमस्ते ॥ याहून अधिक योग्य प्रतिज्ञा दुसरी कोणती असेल ? ताई, शरद्, तुम्ही दोघं एकमेकाला सर्वस्वीं अनुरूप आहांत. सशस्त्र स्वतंत्र हिंदुस्थानचं ध्येय साध्य व्हावं येवढ्यासाठीं आमची पिढी झटली, खर्ची पडली. आतां देशाचं भाग्य तुमच्यासारख्यांनीं घडवायचं आहे. देशसेवेच्या अन् परस्परप्रीतीच्या अशा दुहेरी वाङ्निश्चयानं

तुम्ही हातांत हात घेत आहांत. माझे तुम्हांला पूर्ण आशीर्वाद आहेत. एखाद्या शूर भिल्ल झुंजाराच्या अंगठ्यांतलं रक्त काढून त्याचा तिलक राजपुरुषाच्या कपाळीं लावण्याची पूर्वी रजपुतांच्या राज्याभिषेकांत चाल होती. माझ्या अंगठ्यांतल्या रक्ताचा तिलक मी तुम्हां दोघांना लावणार आहे."

असं म्हणून त्यांनीं झटकन् जंबियानं आपल्या अंगठ्यावर प्रहार केला, व प्रथम शरद्च्या अन् नंतर श्यामाच्या कपाळावर रक्ततिलक टेकीत ते पुटपुटले,

"सशस्त्र स्वतंत्र स्वदेशांत सुखानं नांदा..."

श्यामाचा हात शरद्च्या हातीं होता, ती त्याच्या कानांत हलकेच म्हणाली,

"मला घट्ट धर. हा आनंद मला आतां सहन होत नाहीं..."

— समाप्त —

# प्रो. फडकेकृत पुस्तकें

**चरित्रें**
१ दादाभाई नौरोजी ( ३ रा आ. )
२ टेरेन्स मॅक्स्विनी
३ डी. व्हॅलेरा

**प्रबंध**
१ मानसोपचार
२ मानसोन्नत्ति
३ सुखाचे संसार
४ संततिनियमन
५ आजचे तरुण स्त्री-पुरुष व त्यांजपुढील प्रश्न ( २ री आ. )
६ प्रतिभासाधन ( २ री आ. )
७ वाङ्मयविहार
८ आधुनिक गीता
९ मानसमंदिर
१० साहित्य व संसार
११ आकाशवाणी
१२ वेचलेले मोती

**नाटकें**
१ युगांतर
२ संजीवन
३ जडावाची देवी
४ तोतया नाटककार
५ आगलावी
६ क्षमेसाठीं अपराध

**गोष्टी**
१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ ,, ,, ,, ,, ,, २ रा
३ लोला आणि इतर गोष्टी
४ नमुनेदार गोष्टी
५ उल्हासकथा

**कादंबऱ्या**
१ अल्ला हो अकबर
२ कुलाब्याची दांडी ( २ री आ. )
३ जादुगार ( २ री आ. )
४ दौलत ( २ री आ. )
५ अटकेपार
६ निरंजन
७ कलंकशोभा
८ उद्धार
९ काश्मिरी गुलाब
१० आशा
११ प्रवासी
१२ समरभूमि
१३ उन्माद
१४ गुप्त प्रायश्चित्त
१५ इंद्रधनुष्य
१६ प्रतिज्ञा

**ललितनिबंध**
१ गुजगोष्टी ( २ री आ. )
२ नव्या गुजगोष्टी
३ धूम्रवलयें

**टीकात्मक**
१ टाकीचे घाव

**इंग्रजी**
1 Sex Problem in India (2nd Edition)
2 Psychology
3 Elements of Ethics
4 Manual of Logic (3rd Edition)
5 Birth Control (2nd Edition)
6 History of Philosophy